M-3079 युद्धकांड

शंकर ह्मणाले :– पार्वति, मारुतीचें समग्र भाषण ऐकिल्यावर रामाला अतिशय हर्ष झाला; ह्यावेळीं त्याच्या मुखांतून पुढील उद्गार निघाले :– ॥ १ ॥ "अहो! जें कार्य पार पाडणें देवांना देखील परम दुर्घट वाटलें असतें, तें मारुतीनें तडीस नेलें. भूतलावरील दुसऱ्या कोणत्याही प्राण्याला 'हें कार्य मी करीन' अशी गोष्ट नुसती मनांत आणणें सुद्धां शक्य नाहीं! ॥ २ ॥ कारण, शंभर योजनें लांबीच्या समुद्राला उल्लंघून जाईल कोण! तसेंच, अनेक राक्षस जिचें रक्षण करीत आहेत, त्या लंकेची दुर्दशा उडविण्याचें तरी सामर्थ्य कोणत्या प्राण्यांच्या आंगीं सांपडेल! ॥ ३ ॥ एकंदरींत सेवकाचें कर्तव्य ह्मणून जें कांहीं अ-

श्रीमहादेव उवाच ॥ यथावद्भाषितं वाक्यं श्रुत्वा रामो हनूमतः ॥ उवाचानन्तरं वाक्यं हर्षेण महताऽऽवृतः ॥१॥ कार्यं कृतं हनुमता देवैरपि सुदुष्करम् ॥ मनसाऽपि यदन्येन स्मर्तुं शक्यं न भूतले ॥२॥ शतयोजनविस्तीर्णं लंघयेत्कः पयोनिधिम् ॥ लंकां च राक्षसैर्गुप्तां को वा धर्षयितुं क्षमः ॥ ३ ॥ भृत्यकार्यं हनुमता कृतं सर्वमशेषतः ॥ सुग्रीवस्येदृशो लोके न भूतो न भविष्यति ॥ ४ ॥

श्रीम० उ० – रामः हनुमतः (मू.) हर्षेण आवृतः [सन्] वाक्यं उवाच – ॥ १ ॥ '(पू.) कार्यं कृतं; ॥ यत् भूतले अन्येन (मू.) न शक्यं. ॥ २ ॥ कः लंघयेत्? ॥ राक्षसैः गुप्तां (मू.)? ॥ ३ ॥ हनुमता सर्वं (पू.) कृतं. ॥ सुग्रीवस्य ईदृशः [भृत्यः] (मू.). ॥ ४ ॥

१ संपूर्णपणें. २ विचार करण्यास. ३ समुद्राला. ४ पलिकडे जाईल. ५ रक्षिलेल्या. ६ धुळीस मिळविण्यास. ७ समर्थ. ८ सेवकाचें कर्तव्य. ९ ह्याच्यासारखा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

सतें, तें सगळें मारुतीनें बजाविलें; अवशिष्ट अगदीं ठेविलें नाहीं. सुग्रीवाला जसा हा सेवक मिळाला आहे, असा आजपर्यंत जगांत कोणाला मिळालाही नाहीं व पुढें मिळणारही नाहीं. ॥ ४ ॥ मारुति जानकीचें द-र्शन घेऊन आला, - ह्या कार्याचें महत्त्व मी एवढें समजतों कीं, - त्यानें आज माझें, सगळ्या रघुवंशाचें, ल-क्ष्मणाचें व ह्या वानरराजाचें(सुग्रीवाचें) जिवावरील संकट टाळिलें ! ॥५॥ जानकीचा शोध लावण्याचें काम ह्यानें फारच चांगल्या रीतीनें केलें. खरोखर, समुद्राचें नुसतें मनांत स्मरण झालें, तरी देखील माझें मन जागच्या जागीं थिजून जातें ! ॥ ६ ॥ मगर-सुसरींनीं भरलेला शंभर योजनें लांबीचा समुद्र उल्लंघून पलिकडे जायाचें आणि शत्रूचा वध करायाचा, हें काम माझ्या हातून पार पडणार कसें ! व जानकी माझ्या दृष्टीस पडते कशी ! ! ” ॥ ७ ॥ हें रामाचें भाषण ऐकिल्यावर सुग्रीव ह्मणाला :- ‘ रघुवीरा ! समुद्रामध्यें मोठाल्या

अहं च रघुवंशश्च लक्ष्मणश्च कपीश्वरः ॥ जानक्या दर्शनेनाद्य रक्षिताः स्मो हनू-मता ॥ ५ ॥ सर्वथा सुकृतं कार्यं जानक्याः परिमार्गणम् ॥ समुद्रं मनसा स्मृत्वा सीदतीव मनो मम ॥६॥ कथं नक्रझषाकीर्णं समुद्रं शतयोजनम् ॥ लंघयित्वा [3]रिपुं हन्यां कथं द्रक्ष्यामि जानकीम् ॥७॥ श्रुत्वा तु रामवचनं सुग्रीवः प्राह राघवम् ॥

हनूमता ( मू. ). ॥ ५ ॥ [ अनेन ] ( पू. ) कार्यं सर्वथा सुकृतं. ॥ ( मू. ) मनः सीदति इव ! ॥ ६ ॥ ( पू. ) समुद्रं ॥ ( मू. ) हन्यां, जानकीं कथं द्रक्ष्यामि ! ’ ॥ ७ ॥ सुग्रीवः रामवचनं ( पू. ) प्राह - ॥

१ खिन्न होतें. २ सुसरी, मगर ह्यांनीं भरलेल्या. ३ शत्रूला. ४ मारीन. ५ पाहीन.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

सुसरी व मगर कितीही भरले असले तरी आपण त्याच्या पलिकडे जाणार, ॥ ८ ॥ लंकेची धूळधाण उडवणार व लवकरच रावणाला मृत्युपंथास लावणार, - ह्यांत अगदीं संशय नाहीं. - रघुकुलश्रेष्ठा ! चिंता अगदीं सोडून दे : काळजी बाळगिली कीं मनुष्याच्या कार्याचा नाश होतो. ॥ ९ ॥ ह्या महाशक्तिमान् व शूर वानरवीरांकडे पहा. हे तुला प्रिय वाटेल तें काम करण्यास सिद्ध आहेत. - फार तर काय, पण एवढेंच सांगून ठेवितों कीं, - तुझ्यासाठीं अग्नींत प्रवेश करण्यास देखील हे मागें घेणार नाहींत. ॥ १० ॥ प्रथम समुद्र तरून जाण्याची कांहीं युक्ति योज. पुढें, लंका दृष्टीस पडली कीं, रावण मेलाच असें आह्मी समजतों. ॥ ११ ॥ रामचंद्रा ! तूं धनुष्य घेऊन सिद्ध असलास ह्मणजे तुजपुढें युद्धांत उभा राहील ( टिकेल ) असा

समुद्रं लंघयिष्यामो महानक्रझषाकुलम् ॥८॥ लंकां च विधमिष्यामो हनिष्यामो ऽथ रावणम् ॥ चिन्तां त्यज रघुश्रेष्ठ चिन्ता कार्यविनाशिनी ॥ ९ ॥ एतान्पश्य महासत्वान् शूरान्वानरपुंगवान् ॥ त्वत्प्रियार्थं समुद्युक्तान्प्रवेष्टुमपि पावकन् ॥ १० ॥ समुद्रतरणे बुद्धिं कुरुष्व प्रथमं ततः ॥ दृष्ट्वा लंकां दशग्रीवो हत इत्येव मन्महे ॥ ११ ॥ न हि पश्याम्यहं कंचित्त्रिषु लोकेषु राघव ॥ गृहीतधनुषो यस्ते तिष्ठेदभिमुखो रणे ॥ १२ ॥

‘ ( मू. ) समुद्रं लंघयिष्यामः. ॥ ८ ॥ ( पू. ) हनिष्यामः. ॥ रघुश्रेष्ठ, ( मू. ). ॥९॥ ( मू. ) अपि प्रवेष्टुं समुद्युक्तान वानरपुङ्गवान पश्य. ॥ १० ॥ प्रथमं ( पू. ) ॥ लङ्कां ( मू ) ! ॥ ११ ॥ राघव, अहं यः रणे ( उ. ) तिष्ठेत, [ तं ] ( पू. ) न पश्यामि. ॥ १२ ॥

१ मोठ्या सुसरी, मगर ह्यानीं पूर्ण. २ धुळधाण करूं. ३ अग्नीला. ४ शिरण्यास. ५ सिद्ध. ६ मानितों. ७ युद्धांत.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पुरुष मला सगळ्या त्रैलोक्यांत एक देखील कोणी दिसत नाहीं. ॥ १२ ॥ आह्मांला सर्वथा जय मिळणार, ह्यांत संशय नाहीं. मला जिकडून तिकडून शुभ शकुनच दिसून येत आहेत.' ॥ १३ ॥ भक्तीनें भरलेलें व पराक्रमास उचित असें हें सुग्रीवाचें भाषण ऐकिल्यावर रामानें 'बरें तर; ठीक आहे.' असें ह्मटलें. हनुमान पुढें उभा होताच. राम त्याला ह्मणाला :- ॥ १४ ॥ 'मारुते! आपण कांहीं तरी युक्ति काढून महासागराच्या पलिकडे जाऊं. परंतु लंकेचा बाह्य देखावा कसा काय आहे तो मला सांग. - मी तर असें ऐकितों कीं, - लंकेंत प्रवेश करणें देवांना व दैत्यांना देखील दुर्घट आहे! ॥ १५ ॥ वानरेश्वरा! लंकेचें स्वरूप लक्ष्यांत आलेलें असलें ह्मणजे तिच्या नाशाचा उपाय योजणें

सर्वथा नो जयो राम भविष्यति न संशयः॥ निमित्तानि च पश्यामि यथाभूतानि सर्वशः ॥ १३ ॥ सुग्रीववचनं श्रुत्वा भक्तिवीर्यसमन्वितम् ॥ अंगीकृत्याब्रवीद्रामो हनूमन्तं पुरःस्थितम् ॥ १४ ॥ येन केन प्रकारेण लंघयामो महार्णवम्॥लंकास्वरूपं मे ब्रूहि दुःसाध्यं देवदानवैः ॥ १५ ॥ ज्ञात्वा तस्य प्रतीकारं[3] करिष्यामि कपीश्वर ॥ श्रुत्वा रामस्य वचनं हनूमान्विनयान्वितः ॥ १६ ॥

राम, ( पू. ). ॥ सर्वशः यथाभूतानि[1] ( मू. ).' ॥ १३ ॥ रामः ( पू. ) सुग्रीववचनं श्रुत्वा, ( मू. ) हनूमन्तं अब्रवीत् – ॥१४ ॥ ( पू. ) लंघयामः ॥ देवदानवैः दुःसाध्यं[2] ( मू. ). ॥ १५ ॥ कपीश्वर, ( पू. ).' विनयान्वितः हनूमान् ( मू. ) श्रुत्वा, ॥ १६ ॥

१ योग्य. २ वश करून घेण्यास कठिण. ३ नाशाच्या उपायाला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मला ठीक पडेल.' रामाचें वचन ऐकिल्यावर हनुमान नम्रतापूर्वक ॥ १६ ॥ हात जोडून त्याला सांगूं लागला :- 'देवा ! मी जें कांहीं पाहिलें आहे, तें सर्व यथास्थित तुला सांगतों:- प्रभो ! लंकानगरी अलौकिक तर खरीच; ती त्रिकूटपर्वताच्या शिखरावर वसली आहे. ॥ १७ ॥ भोंवतालीं सुवर्णाचे कोट बांधलेले असून आंत सुवर्णमय राजमंदिरें आहेत. सभोंवार निर्मल उदकानें भरलेले अनेक खंदक आहेत. ॥ १८ ॥ ठिकठिकाणीं नानाप्रकारचीं उपवनें असल्यामुळें ती सुशोभित दिसते. जागोजाग दिव्य पुष्करिणी भरलेल्या आहेत. तेथील गृहें रत्नस्तंभांनीं बांधलेलीं असून विलक्षण शिल्परचनेनें शोभविलीं आहेत. ॥१९॥ पश्चिमद्वारावर रक्षणासाठीं हजारों हत्ती व घोडे राहत असतात. उत्तरेकडील द्वारावर घोडेस्वार व पायदळ ह्यांसुद्धां

उवाच प्राञ्जलिर्देव यथादृष्टं ब्रवीमि ते ॥ लंका दिव्या पुरी देव त्रिकूटशिखरे स्थिता ॥ १७ ॥ स्वर्णप्राकारसहिता स्वर्णाट्टालकसंयुता[1] ॥ परिखाभिः[2] परिवृता पूर्णाभिर्निर्मलोदकैः ॥ १८ ॥ नानोपवनशोभाढ्या दिव्यवापीभिरावृता[3] ॥ गृहैर्विचित्रशोभाढ्यैर्मणिस्तंभमयैः शुभैः ॥ १९ ॥ पश्चिमद्वारमासाद्य[4] गजवाहाः[5] सहस्रशः ॥ उत्तरे द्वारि तिष्ठन्ति साश्ववाहाः[6] सपत्तयः[7] ॥ २० ॥

प्रांजलिः [ सन् ] उवाच - 'देव, ते यथादृष्टं ब्रवीमि. ॥ देव, ( १८ पू. ) निर्मलोदकैः पूर्णाभिः (१८ उ.१९ पू.) गृहैः [ युक्ता ] (१७ उ.). ॥ १७-१९ ॥ (पू.) [तिष्ठन्ति] ॥(मू.) तिष्ठन्ति. ॥ २०॥

---

१ सुवर्णमय राजमंदिरांनीं युक्त. २ खंदकांनीं. ३ उत्तम विहिरींनीं. ४ धरून; तळ देऊन. ५ हत्ती घोडे. ६ घोडेस्वारांसह. ७ पायदळासह.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

हत्तीघोडे आहेत. ॥ २० ॥ पूर्वेकडे दहा कोटि रक्षक वीर राक्षस राहत असतात. दक्षिणद्वारावर तितकेच राहिले आहेत. ॥ २१ ॥ प्रभो, नगरीच्या मध्यभागींच्या बुरुजावर तर असंख्य हत्ती, घोडे, रथ व पायदळ सिद्ध असून लंकेचें सर्वकाळ रक्षण करीत आहे. तेथील वीर अनेक प्रकारचा अस्त्रें वागविण्यांत कुशल आहेत. ॥२२॥ पाहिजे त्याला आंत शिरतां येऊं नये ह्मणून लंकेंत जाण्याचे मार्ग फार लहान, गुप्त व विचित्र प्रकारानें बांधून ठेविले आहेत. तिच्या भोंवतीं पुष्कळ तोफा ठेवून दिल्या आहेत. देवाधिदेवा! अशी स्थिति असतांही, मी तेथें काय प्रकार केले, ते सांगतों ऐक :– ॥ २३ ॥ मी रावणाच्या सैन्यसमूहाच्या

तिष्ठन्त्यर्बुदसंख्याकाः[१] प्राच्यामपि[२] तथैव च ॥ रक्षिणो राक्षसा वीरा द्वारं दक्षिणमाश्रिताः ॥ २१ ॥ मध्यकक्षे ऽप्यसंख्याता गजाश्वरथपत्तयः[३] ॥ रक्षयन्ति सदा लंकां नानास्त्रकुशलाः[४] प्रभो ॥ २२ ॥ संक्रमैर्विविधैर्लंका शतघ्नीभिश्च संयुता ॥ एवं स्थिते ऽपि देवेश शृणु मे तत्र चेष्टितम् ॥ २३ ॥ दशाननबलौघस्य चतुर्थांशो मया हतः ॥ दग्ध्वा लंकापुरीं स्वर्णप्रासादो धर्षितो मया ॥ २४ ॥

( पू. ) तिष्ठन्ति. तथा एव च ॥ वीराः ( मू. ) द्वारं आश्रिताः. ॥२१॥ (पू.) [ तिष्ठन्ति ]. ॥ प्रभो, ( मू. ) [ वीराः ] सदा लङ्कां रक्षयन्ति. ॥ २२ ॥ लङ्का विविधैः ( पू. ). ॥ देवेश, ( मू. ) मे चेष्टितं शृणु- ॥ २३ ॥ मया ( पू. ). ॥ मया लङ्कापुरीं ( मू. ). ॥ २४ ॥

१ दहा कोट संख्या ज्यांची, असे. २ पूर्व दिशेकडे. ३ हत्ती, घोडे, रथ, पायदळ. ४ अनेक प्रकारचीं अस्त्रें वापरण्यांत कुशल. ५ लहान पायवाटांनीं; किंवा चोरवाटांनीं. ६ शंभर वीरांचा वध करणाऱ्या शस्त्रांनीं ( तोफांनीं ). ७ दुर्दशा केली ज्याची, असा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

चवथ्या भागाचा फन्ना उडविला, लंकानगरी जाळिली, सुवर्णमंदिर मोडिलें, ॥ २४ ॥ रघुवीरा ! ताफा[1], फोडिल्या व जागोजाग कोट पाडून लहान वाटा[2] मोठ्या केल्या. देवा ! - मला वाटतें कां, - नुसतें तुझें दर्शन झालें तरी देखील लंकानगरीचें भस्म होईल. ॥ २५ ॥ देवाधिदेवा ! चला निघा आपण भोंवतीं बरोबर महावीर वानरांचे कळप[3] घेऊन क्षीरसमुद्राच्या[4] तीरीं जाऊं. ' ॥ २६ ॥ मारुतीचें भाषण ऐकल्यावर रामचंद्र ह्मणाला :– ' सुग्रीवा ! तूं आपल्या सर्व सैनिकांना निघण्यास आज्ञा दे[5]. ॥ २७ ॥ ह्या वेळीं विजय मुहूर्त[6] आहे ( आतांच प्रयाण केलें तर जय निश्चयानें मिळेल ). ह्मणून मी ह्याच मुहूर्तावर लंकेस जाण्यासाठीं निघतों. लंकेंत राक्षसांची वस्ती फार आहे, ॥ २८ ॥ सभोंवतीं अनेक कोट आहेत, ह्मणून तिचा नाश

शतघ्नयः[1] संक्रमा[2]श्चैव नाशिता मे रघूत्तम ॥ देव त्वद्दर्शनादेव लंका भस्मीकृता भवेत् ॥२५॥ प्रस्थानं कुरु देवेश गच्छामो लवणाम्बुधेः ॥ तीरं सह महावीरै-र्वानरौ[3]घैः समन्ततः ॥ २६ ॥ श्रुत्वा हनूमतो वाक्यमुवाच रघुनन्दनः ॥ सुग्रीव सैनिकान्सर्वान्प्रस्थानायाभिनोद[5]य ॥ २७ ॥ इदानीमेव विजयो मुहूर्तः परिवर्त्त[6]ते ॥ अस्मिन्मुहूर्ते गत्वा ऽहं लंकां राक्षससंकुलाम् ॥२८॥ सप्राकारां सुदुर्धर्षां नाशयामि सरावणाम् ॥

रघूत्तम, मे ( मू. ). ॥ २५ ॥ ' देवेश, ( मू. ) सह समन्ततः लवणाम्बुधेः तीरं गच्छामः.' ॥२६॥ रघुनन्दनः (पू.) श्रुत्वा उवाच–॥'सुग्रीव, सर्वान ( मू. ). ॥२७॥ (२८ मू.२९पू.) लङ्कां नाशयामि,॥

१ तोफा. २ लहानवाटा. ३ वानरांच्या समुदायांनीं. ४ क्षारसमुद्राच्या. ५ आज्ञा दे; सांग. ६ आहे.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

सर्वांस निघण्या-
ची आज्ञा.

होणें कठिण खरेंच; परंतु मी रावणासह तिला धुळीस मिळवीन, व सीतेला घेऊन येईन. - ही पहा - माझ्या उजव्या डोळ्याची खालची पापणी लवत आहे. ॥ २९ ॥ हें चपल वानरांचें सर्व सैन्य पुढें चालूं द्या. कळपांवरील अधिकाऱ्यांनीं पुढें, पाठीमागें व बाजूंला चालून सैन्याचें रक्षण करावें. ॥ ३० ॥ मी हनुमंताच्या खांद्यावर बसून पुढें चालतों. लक्ष्मण अंगदावर बसून मागून येईल. सुग्रीवा, तूं मजबरोबर चल. ॥ ३१ ॥ गज, गवाक्ष, गवय, मैंद, द्विविद, नल, नील, सुषेण, जांबवान तसेच दुसरे ॥ ३२ ॥ ह्या सर्व शत्रुघातक सेनापतींनीं चोहोंकडून एकदम निघावें. ' रामचंद्रानें वानरांना अशी आज्ञा देऊन व

आनेष्यामि च सीतां मे दक्षिणाक्षि[1] स्फुरत्यधः[2] ॥ २९ ॥ प्रयातु वाहिनी सर्वा वानराणां तरस्विनाम्[3] ॥ रक्षन्तु यूथपाः[6] सेनामग्रे पृष्ठे च पार्श्वयोः[7] ॥ ३० ॥ हनूमन्तमथारुह्य गच्छाम्यग्रेंगदं ततः ॥ आरुह्य लक्ष्मणो यातु सुग्रीव त्वं मया सह ॥ ३१ ॥ गजो गवाक्षो गवयो मैन्दो द्विविद एव च ॥ नलो नीलः सुषेणश्च जाम्बवांश्च तथाऽपरे ॥ ३२ ॥ सर्वे गच्छन्तु सर्वत्र सेनापाः शत्रुघातिनः ॥ इत्याज्ञाप्य हरीन् रामः प्रतस्थे सहलक्ष्मणः ॥ ३३ ॥

सीतां च ( मू. ) स्फुरति. ॥ २८ ॥ २९ ॥ ( पू. ) वानराणां वाहिनी प्रयातु. ॥ ( मू. ) च रक्षन्तु. ॥ ३० ॥ अथ [ अहं ] ( पू. ) गच्छामि. ततः लक्ष्मणः अङ्गदं ( मू. ) [ याहि ], ॥ ३१ ॥ ३२ ॥ ( पू. ) सेनापाः सर्वत्र गच्छन्तु. ' ॥ सहलक्ष्मणः रामः हरीन् ( मू. ). ॥ ३३ ॥

१ उजवा डोळा. २ लवतो. ३ वेगवान् अशा. ४ सेना. ५ चालूं लागो. ६ समुदायांचे अधिपति. ७ बाजूंकडे. ८ सेनापति.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

लक्ष्मणाला बरोबर घेऊन प्रयाण केलें. ॥ ३३ ॥ त्याच्याबरोबर सुग्रीवही निघाला. प्रभु रामचंद्र मोठ्या हर्षानें सैन्याच्या मध्यभागीं चालत होता. सर्व वानरांचीं शरीरें प्रचंड हत्तींसारखीं होतीं; त्यांना इच्छेस येतील तशीं रूपें घेतां येत असत. ॥ ३४ ॥ ते वीरांसारखे डौलानें चालत व गर्जना करीत दक्षिण दिशेकडे चालले. सर्वजणांनींही सांपडतील तीं फळें खात व मद्य प्राशन करीत पुढील मार्ग क्रमण्याचा क्रम चालविला. ॥ ३५ ॥ जो तो रामापुढें येऊन सांगे कीं, मी आतां रावणाला मारून टाकितों. अशा प्रकारें ते अतुलपराक्रमी श्रेष्ठ वानर पुढें पुढें चालले. ॥ ३६ ॥ रामलक्ष्मण दोघां वानरांच्या खांद्यावर बसले होते, भोंव-

सुग्रीवसहितो हर्षात्सेनामध्यगतो विभुः ॥ वारणेन्द्रनिभाः सर्वे वानराः कामरूपिणः ॥ ३४ ॥ क्ष्वेलन्तः परिगर्जन्तो जग्मुस्ते दक्षिणां दिशम् ॥ भक्षयन्तो ययुः सर्वे फलानि च मधूनि च ॥ ३५ ॥ ब्रुवन्तो राघवस्याग्रे हनिष्यामो ऽद्य रावणम् ॥ एवं ते वानरश्रेष्ठा गच्छन्त्यतुलविक्रमाः ॥ ३६ ॥ हरिभ्यामुह्यमानौ तौ शुशुभाते रघूत्तमौ ॥ नक्षत्रैः सेवितौ यद्वच्चन्द्रसूर्याविवाम्बरे ॥ ३७ ॥

( पू. ) हर्षात् [ जगाम ]. ॥ ( मू. ) वानराः [ ययुः ]. ॥ ३४ ॥ ( पू. ) दक्षिणां दिशं जग्मुः. ॥ ( मू. ) भक्षयन्तः [ सन्तः ] ययुः. ॥ ३५ ॥ ( पू. ) हनिष्यामः एवं ब्रुवन्तः ( मू. ) ते वानरश्रेष्ठाः गच्छन्ति. ॥ ३६ ॥ ( मू. ) चन्द्रसूर्यौ इव शुशुभाते. ॥ ३७ ॥

१ मोठ्या हत्तींसारखे. २ इच्छेस येईल तसें रूप धरणारे. ३ शूरांना योग्य गतींवर चालणारे. ४ गर्जना करणारे. ५ मद्यें. ६ ज्यांच्या पराक्रमांना तुलना नाहीं, असे. ७ दोघां वानरांनीं. ८ वाहिले जाणारे. ९ अम्बरे आकाशांत. १० शोभले.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

सैन्य कुच दर-कुच चालले.

तालीं असंख्य वानरमंडळी चालत होती, - तो देखावा पाहून असें मनांत येई कीं, - जर आकाशांत चंद्र व सूर्य एकदम उगवून त्यांच्या भोंवतीं नक्षत्रसमुदाय दिसेल तर त्या देखाव्याची उपमा ह्या रामसैन्याला बरोबर साजेल. ॥ ३७ ॥ हा प्रचंड सैन्यसमूह जिकडे जिकडे जाई, तो सर्व भूप्रदेश आच्छादून जात असे. कित्येक आपलीं शेपटांचीं अग्रें आपटीत; दुसरे झाडें उपटून उचलून घेत; ॥ ३८ ॥ कांहीं पर्वतांवर चढत व वायुवेगानें धांवत सुटत. असंख्य वानर जिकडे तिकडे भरून राहिले होते. ॥ ३९ ॥ राम त्यांचें रक्षण करीत असे ह्मणून ते मोठ्या आनंदानें पुढें चालले होते. तें सैन्य रात्रींदिवसा एकसारखें चालत असे, क्षणभर देखील कोठें गुंतलें नाहीं. ॥ ४० ॥ मलय व सह्य ह्या दोन पर्वतांवर रामाला विचित्र अरण्यें दिसून

आवृत्य[3] पृथिवीं कृत्स्नां जगाम महती चमूः ॥ प्रस्फोटयन्तः पुच्छाग्रानुद्वहन्तश्च पादपान् ॥ ३८ ॥ शैलानारोहयंतश्च जग्मुर्मारुतवेगतः ॥ असंख्याताश्च सर्वत्र वानराः परिपूरिताः ॥ ३९॥ हृष्टास्ते जग्मुरत्यर्थं रामेण परिपालिताः॥गता चमूर्दिवारात्रं क्वचिन्नासज्जत क्षणम् ॥ ४० ॥ काननानि विचित्राणि पश्यन्मलयसह्ययोः ॥ ते सह्यं समतिक्रम्य मलयं च तथा गिरिम् ॥ ४१ ॥

महती चमूः कृत्स्नां पृथ्वीं (पू.). ॥ [वानराः] पुच्छाग्रान् ( मू. ) उद्वहन्तः च ॥३८॥ (पू.) जग्मुः.॥ सर्वत्र (मू.). ॥३९॥ (पू.) ते अत्यर्थं हृष्टाः [सन्तः] जग्मुः. चमूः दिवारात्रं (मू.) न असज्जत. ॥४०॥ [रामः] मलयसह्ययोः विचित्राणि (पू.) [ ययौ ]. ॥ ते सह्यं, तथा (मू.) च समतिक्रम्य, ॥ ४१ ॥

१ सेना. २ सगळ्या. ३ वेष्टून. ४ आपटणारे. ५ वृक्षांना. ६ उचलणारे. ७ पर्वतांना. ८ वर चढणारे. ९ वायुवेगानें. १० गुंतली.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आलीं. ते सह्य पर्वत मागें टाकून व तसेच मलयगिरीलाही सोडून ॥ ४१ ॥ क्रमानें समुद्रावर येऊन पोंचले. महासागराची भयंकर गर्जना चालली होती. राम मारुतीच्या खांद्यावरून उतरला, सुग्रीवाला बरोबर घेऊन ॥४२॥उदकाजवळ आला व सुग्रीवाला म्हणालाः– 'आपण सर्वजण समुद्रावर येऊन पोंचलों. ह्या महासागराच्या उदरांत अनेक मगर राहत असतात.॥४३॥वानरहो ! निरुपायास्तव ह्याच्या पुढें आपल्याला जातां येणार नाहीं. म्हणून सध्यां येथेंच सैन्याचा तळ द्या. मग आपण ह्याला तरून जाण्याचा विचार योजूं.' ॥४४॥ रामाचें वचन ऐकून सुग्रीवानें लागलाच समुद्राजवळ सैन्याचा तळ दिला. मोठमोठे वानर सेनेचें रक्षण करीत होतेच.॥४५॥

आययुश्चानुपूर्व्येण[1] समुद्रं भीमनिःस्वनम्[2] ॥ अवतीर्य हनूमन्तं रामः सुग्रीवसंयुतः ॥४२॥ सलिलाभ्याशमासाद्य[3] रामो वचनमब्रवीत् ॥ आगताः स्मो वयं सर्वे समुद्रं मकरालयम् ॥ ४३ ॥ इतो गन्तुमशक्यं नो निरुपायेन वानराः ॥ अत्र सेनानिवेशो[5] ऽस्तु मन्त्रयामो ऽस्य तारणे ॥ ४४ ॥ श्रुत्वा रामस्य वचनं सुग्रीवः सागरान्तिके ॥ सेनां न्यवेशयत्क्षिप्रं रक्षितां कपिकुञ्जरैः ॥ ४५ ॥

(पू.) समुद्रं [3]आययुः. ॥ हनूमन्तं ( मू. ) रामः [समुद्रं जगाम]. ॥ ४२ ॥ रामः ( पू. ) – ॥ 'सर्वे ( मू. ) समुद्रं आगताः स्मः. ॥ ४३ ॥ वानराः, नः निरुपायेन ( मू. ) [ उपायान् ] [6]मन्त्रयामः.' ॥ ४४ ॥ सुग्रीवः रामस्य वचनं ( मू. ) रक्षितां सेनां न्यवेशयत्. ॥ ४५ ॥

---

१ क्रमानें. २ भयंकर शब्द ज्याचा, अशा. ३ उदकाजवळ. ४ पोंचून. ५ सैन्याचा तळ. ६ विचार करूं. ७ वानरवीरांकडून. ८ तळ देता झाला.

ते समुद्र पाहून खिन्न झाले.

मोठाल्या उंच लाटा उसळत आहेत, उग्र नक्र भीति दाखवीत आहेत, खोली किती तें कळत नाहीं, आकाशासारखाच ह्याच्या लांबीरुंदीचा अंत नाहीं, असें समुद्राचें भयंकर रूप दृष्टीस पडतांच ते सर्वजण खिन्न झाले. - समुद्राच्या दर्शनानें सर्वांना दुःख झालें. प्रत्येकाला विचार पडला कीं, वरुणाचें वसतिस्थान जो हा भयंकर समुद्र ह्याला आह्मी तरून जाणार कसे ? ॥ ४६ ॥ ४७ ॥ आमच्या मनांत त्या राक्षसाधमाचा—रावणाचा—वध आतांच करायाचा आहे. अशा चिंतेनें व्याकुल होत्साते सर्वजण रामाच्या शेजारीं येऊन बसले. ॥ ४८॥ रामचंद्राला सीतेचें स्मरण झाल्यामुळें पराकाष्ठेचें दुःख वाटूं लागलें. त्यानें जनककन्या सीतेसाठीं पुष्कळसा विलाप केला. - राम परमेश्वर खरा, परंतु त्याला घेतलेल्या वेषाचा पूर्ण अभिनय उतरण्यासाठीं विलाप करणें भाग होतें; कारण, - त्यानें कांहीं कार्यासाठीं मनुष्यरूप घेतलें होतें. ॥ ४९ ॥

ते पश्यन्तो विषेदुस्तं सागरं भीमदर्शनम्[1] ॥ महोन्नततरंगाढ्यं[3] भीमनक्रभयंकरम् ॥ ४६ ॥ अगाधं गगनाकारं सागरं वीक्ष्य दुःखिताः ॥ तरिष्यामः कथं घोरं सागरं वरुणालयम् ॥ ४७ ॥ हन्तव्यो ऽस्माभिरद्यैव रावणो राक्षसाधमः ॥ इति चिन्ताकुलाः सर्वे रामपार्श्वे व्यवस्थिताः ॥ ४८ ॥ रामः सीतामनुस्मृत्य दुःखेन महता ऽऽवृतः ॥ विलप्य जानकीं सीतां बहुधा कार्यमानुषः ॥ ४९ ॥

( पू. ) सागरं पश्यन्तः ते विषेदुः[2]. (मू.)॥ ४६ ॥ ( मू. ) सागरं कथं तरिष्यामः ! ॥ ४७ ॥ ( पू. ) रावणः हन्तव्यः.॥(मू.).॥४८॥(पू.) दुःखेन आवृतः कार्यमानुषः रामः (मू.) विलप्य[स्थितः].॥४९॥

१ भयंकर दिसणाऱ्या. २ खिन्न झाले. ३ मोठ्या उंच लाटांनीं युक्त.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

- वास्तविक म्हटलें तर - राम हा द्वैतरहित, चैतन्यरूपी, एक, सनातन (नित्य), परमात्मा होय. रामाच्या स्वरूपाचें यथार्थतः ज्ञान ज्या पुरुषाला झालें, ॥ ५० ॥ त्यालादेखील दुःखें वगैरे भोगावीं लागत नाहींत; मग त्या आनंदरूपी निर्विकार परमात्म्याला लागायाचीं नाहींत, हें काय सांगायाला पाहिजे? दुःख, हर्ष, भय, क्रोध, लोभ, मोह, मद इत्यादि ॥५१॥ हीं अज्ञानाचीं चिन्हें आहेत. - ज्ञान झालें कीं अज्ञानाचा नाश होतो; अर्थात हीं चिन्हें नष्ट होतात; - तेव्हां हीं ज्ञानस्वरूपी परमात्म्याच्या ठिकाणीं राहतील कोठून? दुःखें देहावर अभिमान ठेवणाऱ्या प्राण्याला लागू आहेत, ज्याला देहाचा अभिमान नाहीं त्या ज्ञानरूपी आत्म्याला नाहींत. ॥५२॥ - दुसरा कोणी असेल तर त्यापासून भीति वाटायाची व दुःख व्हावयाचें :- ज्ञान

अद्वितीयश्चिदात्मैकः परमात्मा सनातनः ॥ यस्तु जानाति रामस्य स्वरूपं तत्त्वतो जनः ॥ ५० ॥ तं न स्पृशति दुःखादि किमुतानन्दमव्ययम् ॥ दुःखहर्षभयक्रोध-लोभमोहमदादयः ॥ ५१ ॥ अज्ञानलिंगान्येतानि कुतः सन्ति चिदात्मनि ॥ देहा-भिमानिनो दुःखं नादेहस्य चिदात्मनः ॥ ५२ ॥ संप्रसादे[1] द्वयाभावात्[2]सुखमात्रं हि दृश्यते ॥ बुद्ध्याद्यभावात्संशुद्धे दुःखं तत्र न दृश्यते ॥

(पू.) ॥ यः तु जनः (मू.) जानाति, ॥ ५० ॥ दुःखादि (मू.) आनन्दं अव्ययं [ रामं न स्पृशन्ति इति ] किमुत? ॥५१॥ (पू.) कुतः सन्ति? ॥ (मू.) न. ॥५२॥ (पू.). ॥ संशुद्धे तत्र (द्वि.). ॥

१ ज्ञान झालें असतां; किंवा सुषुप्तींत (झोंपेंत). २ दुसरा नसल्यामुळें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

झालें असतां, किंवा सुषुप्तींत, द्वितीय कोणी नसतो ह्मणून केवल सुखच अनुभवास येतं (?); तसेंच शुद्ध आत्मस्वरूपींही बुद्ध्यादि नसल्यामुळें दुःख दिसून येत नाहीं. ह्यावरून दुःखादि सर्व बुद्धीलाच लागू आहे, ह्यांत संशय नाहीं. ॥ ९३ ॥ राम हा परमात्मा, पुराणपुरुष, नित्य सिद्ध (नाशरहित), नित्यसुखरूपी व कोणतेही व्यापार न करणारा होय. तथापि अज्ञानी लोक तो मायेच्या गुणांशीं आसक्त आहे असें मानितात; ह्मणून त्यांना तो सुखी किंवा दुःखी प्राण्यांसारखा वाटतो. ॥ ९४ ॥ इति युद्धकाण्डे प्रथम सर्गः ॥१॥

हनुमंतानें लंकेमध्यें, देवांनाही करण्याला कठिण जाईल, असें चरित्र केलें; तें पाहून रावणाला लाज वाटली व तोंड थोडें खालीं करावें लागलें! ॥ १ ॥ त्यानें आपल्या सर्व मंत्र्यांना बोलावून आणून असें

अतो दुःखादिकं सर्वं बुद्धेरेव न संशयः ॥ ५३ ॥ रामः परात्मा पुरुषः पुराणो नित्योदितो[1] नित्यसुखो निरीहः[2]॥तथापि मायागुणसंगतो ऽसौ सुखीव दुःखीव विभाव्यते[3] ऽबुधैः॥५४॥इति युद्धकाण्डे प्रथमः सर्गः ॥१॥ लंकायां रावणो दृष्ट्वा कृतं कर्म हनूमता॥दुष्करं दैवतैर्वा ऽपि ह्रिया[4] किंचिदवाङ्मुखः[5]॥१॥ आहूय[6] मन्त्रिणः सर्वानिदं वचनमब्रवीत् ॥ हनूमता कृतं कर्म भवद्भिर्दृष्टमेव तत् ॥ २ ॥

अतः सर्वं (मू.). ॥ ५३ ॥ (पू.); ॥ तथा अपि अबुधैः (मू.). ॥ ५४ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणान्वये युद्धकाण्डे प्रथमः सर्गः ॥१॥ (पू.) दैवतैः अपि दुष्करं हनूमता कृतं कर्म दृष्ट्वा (मू.) [सन्] ॥ १ ॥ सर्वान् मन्त्रिणः (पू.) – ॥ ‘ हनूमता [यत्] कर्म कृतं, तत् (मू.). ॥ २ ॥

१ नित्य सिद्ध. २ निर्व्यापार. ३ बद्दल तर्क केला जातो. ४ लज्जेनें. ५ खालीं तोंड ज्याचें, असा. ६ हांका मारून.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

सांगितलें :– ' प्रधानांनो ! मारुतीनें जें कांहीं कृत्य केलें तें तुह्मीं पाहिलेंच आहे. ॥ २ ॥ अरे ! ज्या लंकेकडे नुसतें वक्र दृष्टीनें पाहणें देखील कठिण, तींत तो शिरला ! सीतेची गांठ पडणें परम दुर्घट, पण तो तिला भेटला ! - इतकेंच नव्हे तर त्यानें आमचे वीर राक्षस मारिले, मंदोदरीच्या अक्षनामक पुत्राचा वध केला, ॥ ३ ॥ सगळ्या लंकेला अग्नि लाविला; व समुद्र उल्लंघून आणि तुह्मां सर्वांच्या हातांवर तुरी देऊन तो स्वस्थपणें परत गेला ! ! ॥ ४ ॥ आतां पुढें आपण करायाचें काय ? तुह्मी युक्ति योजण्यांत कुशल आहां, ह्या वेळीं आपलें बुद्धिसर्वस्व खर्चून असा उपाय शोधून काढा कीं जेणें करून माझें हित होईल. ' ॥ ५ ॥ रावणाचें वचन ऐकून घेतल्यावर राक्षस त्याला ह्मणाले :– " महाराज ! आपण युद्धांत लोकपालांना

प्रविश्य लंकां दुर्धर्षां[1] दृष्ट्वा सीतां दुरासदाम्[2] ॥ हत्वा च राक्षसान्वीरानक्षं मन्दोदरीसुतम् ॥ ३ ॥ दग्ध्वा[3] लंकामशेषेण लंघयित्वा च सागरम् ॥ युष्मान्सर्वानतिक्रम्य स्वस्थो ऽगात्पुनरेव सः ॥ ४ ॥ किं कर्तव्यमितो ऽस्माभिर्यूयं मन्त्रविशारदाः[4] ॥ मन्त्रयध्वं[5] प्रयत्नेन यत्कृतं मे हितं भवेत् ॥ ५ ॥ रावणस्य वचः श्रुत्वा राक्षसास्तमथाब्रुवन् ॥ देव शंका कुतो रामात्तव लोकजितो रणे ॥ ६ ॥

दुर्धर्षां लङ्कां ( पू. ) सीतां दृष्ट्वा, ॥ वीरान् ( मू. ) अक्षं च हत्वा, ॥ ३ ॥ ( पू. ) दग्ध्वा, सागरं लंघयित्वा च ॥ ( मू.) पुनः एव अगात्. ॥४॥ इतः अस्माभिः (पू.) यूयं, यत् कृतं ॥ [सत्] (मू ), [तत्] प्रयत्नेन मंत्रयध्वं.' ॥५॥ राक्षसाः (पू.) –॥ देव, रणे (मू.) तव रामात् शङ्का कुतः ? ॥६॥

१ कडे बघण्यास कठिण, अशा. २ सांपडण्यास कढिण. ३ जाळून. ४ मसलत काढण्यांत कुशल. ५ युक्ति योजा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

देखील जिंकिलें, आणि आतां ह्या रामाची भीति काय ह्मणून धरून बसलां आहां ? ॥ ६ ॥ इंद्राला तर आपल्या पुत्रानें बांधून आणून नगरांत ठेविलें आहे; आपण स्वतां कुबेराला जिंकून त्याचें पुष्पक विमान घेऊन आलां व सध्यां त्या विमानाचा उपभोग घेत आहां; ॥ ७ ॥ प्रतापशाली राजा ! आपण यमाचा पराभव केला, कालपाशाच्यानें आपलें कांहीं वांकडें झालें नाहीं; वरुणाला तर आपण नुसत्या हूंकारानेंच जिंकिलें; तीच कथा सर्व राक्षसांचीही झाली; ॥ ८ ॥ मयासुर ह्मणजे सर्व दैत्यांत मोठा, पण तो स्वतां भीतीस्तव आपली कन्या तुह्मांला देऊन सांप्रत तुमच्या स्वाधीन होऊन राहिला आहे. मग इतर महादैत्यांचा तो पाड काय राहिला ? ॥ ९ ॥ हनुमंतानें आपली जी कांहीं नासधूस केली, ती केवळ आमच्या

इन्द्रस्तु बध्वा निक्षिप्तः पुत्रेण तव पत्तने[1] ॥ जित्वा कुबेरमानीय पुष्पकं भुज्यते[2]
त्वया ॥ ७ ॥ यमो जितः कालदण्डाद्भयं नाभूत्तव प्रभो ॥ वरुणो हूंकृतेनैव जितः
सर्वे ऽपि राक्षसाः ॥ ८ ॥ मयो महासुरो भीत्या कन्यां दत्वा स्वयं तव ॥ त्वद्वशे
वर्तते ऽद्यापि किमुतान्ये महासुराः ॥ ९ ॥ हनूमद्धर्षणं यत्तु तदवज्ञाकृतं च नः ॥
वानरो ऽयं किमस्माकमस्मिन्पौरुषदर्शने[3] ॥ १० ॥

तव पुत्रेण ( पू. ) निक्षिप्तः. ॥ त्वया कुबेरं ( मू. ) आनीय भुज्यते. ॥ ७ ॥ प्रभो, यमः जितः. तव ( मू. ) [ जिताः ]. ॥८॥ ( पू. ) कन्यां दत्वा ॥ अद्य अपि ( मू. ) [वर्तन्ते इति] किमुत ? ॥ ९ ॥ ( पू. ) अवज्ञाकृतं. ॥ अयं ( मू. ) किं [करिष्यति] ? अस्मिन्, पौरुषदर्शने [ किं फलं ] ? ॥१०॥



१ नगरांत. २ भोगिलें जातें. ३ पराक्रम दाखविण्यांत.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

हलगर्जीपणामुळें. यःकश्चित् माकड हें, आमचें करणार काय ? ह्याच्यावर काय प्रताप दाखवावा, ' ॥१०॥ अशा विचारानें आह्मीं स्वस्थ बसलों. - 'थोडीशी नासधूस करीत आहेना ? करूं द्या. त्यांत काय आहे ! - मारुति ह्मणजे कःपदार्थ !' असें वाटून आह्मी अगदीं निष्काळजी राहिलों; ह्मणून त्या लांब हनवटीच्या माकडानें आम्हांला फसविलें! ॥११॥ 'हा असें करणार' हें जर आह्मांला पूर्वीं कळलें असतें तर त्याची काय छाती होती येथून परत जिवंत निघून जाण्याची ? नुसती आज्ञा द्या कीं पुरे, सगळ्या जगांतील वानरें आणि माणसें एकंदर नाहींशीं॥१२॥करून सर्वजण परत येतों. नाहीं तर एकएकाची वेगवेगळ्या प्रदेशावर योजना (नेमणूक) करा." ह्या प्रसंगीं कुंभकर्णानें राक्षसाधिपति रावणाला सांगितलें :– ॥१३॥ "रावणा ! तूं हें काम आरंभिलें

इत्युपेक्षितमस्माभिर्धर्षणं तेन किं भवेत् ॥ वयं प्रमत्ताः किं तेन वञ्चिताः स्मो हनूमता ॥ ११॥ जानीमो यदि तं सर्वे कथं जीवन् गमिष्यति ॥ आज्ञापय जगत्कृत्स्नमवानरममानुषम् ॥१२॥ कृत्वा ऽऽयास्यामहे सर्वे प्रत्येकं वा नियोजय ॥ कुम्भकर्णस्तदा प्राह रावणं राक्षसेश्वरम् ॥ १३ ॥ आरब्धं यत्त्वया कर्म स्वात्मनाशाय केवलम्॥न दृष्टो ऽसि तदा भाग्यात्त्वं रामेण महात्मना॥१४॥

( पू. ) उपेक्षितं; तेन किं भवेत् ? [ अयं ] किं [ इति ] ( मू. ) वंचिताः स्मः. ॥ ११ ॥ सर्वे [ वयं ] यदि तं जानीमः [ तर्हि सः ] ( पू. )? ॥ आज्ञापय. कृत्स्नं ( मू. ) [ च ] ॥१२ ॥ कृत्वा सर्वे [ वयं ] ( पू. ). ' ॥ तदा ( मू. ) रावणं प्राह – ॥ १३ ॥ " त्वया यत् कर्म आरब्धं, [ तत् ] केवलं ( मू. ) रामेण न दृष्टः असि. ॥ १४ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आहेस, पण ह्याचा परिणाम, केवळ तुझा स्वतांचा नाश, एवढाच होणार. - अरे ! सीतेला चोरून आणि-लेंस - त्या वेळींच तूं त्या महाशूर रामचंद्राच्या दृष्टीस पडला नाहींस हें मोठें भाग्य समज ! ॥ १४ ॥ रामानें तुला पाहिलें असतें तर, रावणा ! तूं जिवंत आला नसतास ! राम सामान्य मनुष्य नव्हे, तर देव आहे. तो साक्षात् निर्विकार नारायण होय. ॥ १५ ॥ रामाची पत्नी यशस्विनी सीता ही प्रत्यक्ष भगवती लक्ष्मी. त्या सुंदरीला तूं आणिलेंस पण त्यामुळें सर्व राक्षसांचा नाश होणार आहे, - हें पक्कें लक्ष्यांत ठेव !- ॥ १६ ॥ एखादा मोठा मासा पहिल्यानें विषयुक्त पिंड खातो आणि मागून तडफडत पडतो, त्याप्रमाणेंच तुझी स्थिति झाली आहेः— जानकीला घेऊन आलास आणि आतां 'आतां कसें होईल!' ह्मणून विचारांत पडला आहेस!॥१७॥ अज्ञानामुळें, तुझ्या हातून होऊं नये, अशी ही गोष्ट झाली. बरें; कांहीं चिंता नाहीं. समर्था!

**यदि पश्यति रामस्त्वां जीवन्नायासि रावण ॥ रामो न मानुषो देवः साक्षान्नारायणोऽव्ययः ॥ १५ ॥ सीता भगवती लक्ष्मी रामपत्नी यशस्विनी ॥ राक्षसानां विनाशाय त्वयाऽऽनीता सुमध्यमा॥ १६॥ विषपिण्डमिवागीर्य महामीनो यथा तथा ॥ आनीता जानकी पश्चात्त्वया किं वा भविष्यति॥ १७ ॥ यद्यप्यनुचितं कर्म त्वया कृतमजानता ॥**

रावण, ( पू. ) पश्यति, [ तर्हि ] जीवन् न आयासि. रामः मानुषः ( मू. ). ॥ १५ ॥ त्वया ( पू. ) सुमध्यमा सीता ( मू. ) आनीता. ॥ १६ ॥ यथा ( पू. ) त्वया जानकी आनीता '( मू. )' [ इति ] पश्चात् [ तप्यसे ]. ॥ १७ ॥ अजानता त्वया ( पू. ), ॥

१ सुंदर मध्यभाग जिचा, अशी ( सिंहकटि ). २ आगीर्य गिळून. ३ मोठा मासा. ४ न जाणणाऱ्या. ५ अयोग्य.





CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मी - आपल्या प्रभावानें, - सर्व यथास्थित होईल, अशी व्यवस्था करितों. तूं मनांत न डगमगतां स्वस्थ ऐस." ॥ १८ ॥ कुंभकर्णाचें भाषण ऐकून इंद्रजित् बोलूं लागला :– 'महाराज! मला आज्ञा द्या; ह्मणजे मी आतां राम, लक्ष्मण, सुग्रीव आणि वानर ह्या सर्वांना मारून पुन्हां आपल्या जवळ येतों.' ॥ १९ ॥ इतक्यांत तेथें भगवद्भक्तशिरोमणि व बुद्धिमान् पुरुषांत अग्रगण्य असा विभीषण येऊन पोंचला. त्याची अंतःकरणवृत्ति रामचरणयुगुलीं एकाग्र लागून राहिली होती. तो देवांच्या शत्रूला (रावणाला) प्रणाम करून त्याच्याजवळ बसला. ॥ २० ॥ सभेमध्यें एकापेक्षां एक मदोन्मत्त असे कुंभकर्णप्रभृति दैत्य बसले होते.

सर्वं समं करिष्यामि स्वस्थचित्तो भव प्रभो ॥१८॥ कुंभकर्णवचः श्रुत्वा वाक्यमिन्द्रजिदब्रवीत् ॥ देहि देव ममानुज्ञां हत्वा रामं सलक्ष्मणम् ॥ सुग्रीवं वानरांश्चैव पुनर्यास्यामि तेऽन्तिकम् ॥१९॥ तत्रागतो भागवतप्रधानो विभीषणो बुद्धिमतां वरिष्ठः ॥ श्रीरामपादद्वय एकतानः प्रणम्य देवारिमुपोपविष्टः ॥ २० ॥ विलोक्य कुम्भश्रवणादिदैत्यान्मत्तप्रमत्तानतिविस्मयेन ॥

[ तथा अपि ] प्रभो, ( मू. ). " ॥ १८ ॥ इन्द्रजित् ( पू. ) वाक्यं अब्रवीत् – ॥ 'देव, मम अनुज्ञां ( द्वि. ) रामं, ( मू. ) हत्वा, पुनः ते अन्तिकं यास्यामि.' ॥ १९ ॥ ( मू. ) विभीषणः देवारिं प्रणम्य उपोपविष्टः. ॥२०॥ अप्रमत्तः विशुद्धबुद्धिः [ सः ] मत्तप्रमत्तान ( पू. ) विलोक्य, ॥

१ अनुमोदनास. २ जवळ. ३ येईन. ४ एकाग्र. ५ देवांच्या शत्रूला. ६ वंदून. ७ जवळ बसला. ८ सावध. ९ अत्यंत शुद्ध बुद्धि ज्याची, असा. १० एकापेक्षां एक उन्मत्त.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रावणाला वि-
भीषणाची
सांगी.

विभीषणानें त्या सगळ्या समुदायावरून एकवेळ दृष्टि फिरविली. - ' रामाचे भक्त जे वानर, त्यांच्यापुढें ह्या राक्षसांचा क्षणभर देखील निभाव लागायाचा नाहीं, परंतु हे व्यर्थ फुशारक्या मारीत आहेत, ' असें मनांत येऊन - विभीषणाला पराकाष्ठेचा विस्मय वाटला. रावण कामातुर झाला आहे, हेंही त्याच्या लक्ष्यांत आलें; तथापि, विभीषणाची बुद्धि अत्यंत निर्मल असे व तो स्वतांचें कर्तव्य करण्यांत कधींच चुकत नसे, - ह्या स्वतांच्या स्वभावास अनुसरूनच त्यानें रावणाची कानउघाडणी करण्याकरितां - पुढील भाषण केलें : तो ह्मणाला :– ॥ २१ ॥ " राजा! कुंभकर्ण, इंद्रजित, महापार्श्व, महोदर, तसेच कुंभ, निकुंभ व अतिकाय हे राक्षस कितीही शूर असोत; तरी ह्यांच्यानें युद्धांत रामापुढें टिकाव धरवणार नाहीं. ॥ २२ ॥ राजा! ' सीता ' ह्या नांवाच्या प्रबल पिशाचानें तुला पछाडलें आहे, त्याच्या तावडींतून तुझी सुटका होणें

विलोक्य कामातुरमप्रमत्तो दशाननं प्राह विशुद्धबुद्धिः ॥ २१ ॥ न कुम्भकर्णे-न्द्रजितौ च राजंस्तथा महापार्श्वमहोदरौ तौ ॥ निकुम्भकुम्भौ च तथाऽतिकायः स्थातुं न शक्ता युधि राघवस्य ॥ २२ ॥ सीताभिधानेन महाग्रहेण ग्रस्तोऽसि राजन्न च ते विमोक्षः ॥ तामेव सत्कृत्य महाधनेन दत्वाऽभिरामाय सुखी भव त्वम् ॥ २३ ॥

( मू. ) [ च ] विलोक्य प्राह – ॥ २१ ॥ राजन, कुम्भकर्णेंद्रजितौ रामस्य युधि स्थातुं न [ शक्तौ ]. तथा तौ ( पू. ) [ न शक्तौ ] तथा ( मू. ) न शक्ताः. ॥ २२ ॥ राजन, त्वं ( पू. ) न. तां एव महाधनेन [ सह ] ( मू. ) दत्वा च सुखी भव. ॥ २३ ॥

१ उभा राहण्यास. २ मोठ्या पिशाचानें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

नाहीं. आतां जर तूं सीतेचा सत्कार करून विपुल द्रव्यासह तिला रामाच्या स्वाधीन करशील तर मात्र सुखी होशील. ॥ २३ ॥ जोंपर्यंत रामाच्या तीक्ष्ण बाणांनीं लंकानगर व्यापून राक्षसांचे शिरश्छेद केले नाहींत, तोंपर्यंत ( लवकरच ) बा ! तूं रामाला जानकी परत नेऊन द्यावीस, हा मार्ग मला प्रशस्त दिसतो. ॥ २४ ॥ ज्यांचीं शरीरें पर्वतासारखीं व पराक्रम मोठ्या सिंहासारखे आहेत, ते नखें व दाढा ह्या शस्त्रांनीं युद्ध करणारे वानर अद्याप तुझ्या लंकेवर चालून आले नाहींत व तिचा नाश करूं लागले नाहींत; - ह्मणून मी सांगतों कीं - असा प्रसंग येण्यापूर्वींच, बा ! तूं लवकर रघुवीराला सीता देऊन टाक. ॥ २५ ॥ मोठमोठाले देव तुझें रक्षण करीत असले, फार ..र काय प्रत्यक्ष शंकर तुला राखीत असला, किंवा तूं इंद्राच्या

यावन्न रामस्य शिताः[1] शिलीमुखा[2] लंकामभिव्याप्य शिरांसि रक्षसाम् ॥ छिन्दन्ति[3] तावद्रघुनायकस्य भो तां जानकीं त्वं प्रतिदातुमर्हसि[4] ॥ २४ ॥ यावन्नगाभाः[5] कपयो महाबला हरीन्द्रतुल्या[6] नखदंष्ट्रयोधिनः[7] ॥ लंकां समाक्रम्य विनाशयन्ति ते तावद्द्रुतं देहि रघूत्तमाय ताम् ॥ २५ ॥ जीवन्न रामेण विमोक्ष्यसे त्वं गुप्तः[8] सुरेन्द्रैरपि शंकरेण ॥ न देवराजांकगतो[9] न मृत्योः पाताललोकानपि संप्रविष्टः ॥ २६ ॥

( पू. ) शिरांसि न ॥ छिन्दन्ति, तावत् भो, त्वं ( मू. ). ॥ २४ ॥ ( पू. ) कपयः ते लङ्कां समाक्रम्य न विनाशयन्ति, ( मू. ) देहि. ॥ २५ ॥ ( पू. ) अपि गुप्तः त्वं रामेण जीवन् न विमोक्ष्यसे. देवराजाङ्कगतः अपि न, मृत्योः [ लोकं गतः अपि ] न, ( मू. ) अपि [ न विमोक्ष्यसे. ] ' ॥ २६ ॥

---

१ तीक्ष्ण. २ बाण. ३ तोडतात. ४ परत देण्यास. ५ पर्वतांसारखे. ६ मोठ्या सिंहासारखे. ७ नखें व दाढा ह्याच्यायोगें लढणारे. ८ रक्षिलेला. ९ इंद्राच्या मांडीवर बसलेला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मांडीवर जाऊन बसलास अथवा मृत्युलोकांत किंवा पाताल लोकांत शिरून राहिलास, तरी राम तुला जिवंत सोडणार नाहीं, - हें पक्कें समज ! " - ॥ २६ ॥ - शंकर ह्मणाले :– पार्वति, - हें विभीषणाचें सौम्य भाषण खरोखर हितकारक व पथ्यावह होतें. परंतु, जसा मरणोन्मुख प्राणी औषध घेत नाहीं त्याप्रमाणें, त्या दुष्टानें ह्या उपदेशाचा अंगिकार केला नाहीं. ॥ २७ ॥ - बरोबरच आहे, - कालानें जशी प्रेरणा दिली तसा तो वागला. असो. त्या दैत्यानें उलट विभीषणावर तोंड सोडिलें : - तो ( रावण ) ह्मणाला :- ' - अहो पहा काय चमत्कार ! - मी देत आलों ते भोग भोगून ह्यानें आपलें शरीर पोशिलें; हा माझ्याजवळ राहतो; ॥ २८ ॥ मी नित्य ह्याचें हित करीत असतां; आणि आज हा माझ्याशीं विरुद्ध वागत आहे ! ! मला मित्रभाव दाखवीत आहे खरा परंतु हा माझा शत्रु झाला आहे, ह्यांत संशय नाहीं. ॥ २९ ॥ ह्या नीच कृतघ्नाशीं संगति करणें मला योग्य वाटत नाहीं.

**शुभं हितं पवित्रं च विभीषणवचः खलः[1] ॥ प्रतिजग्राह नैवासौ म्रियमाण[2] इवौषधम् ॥ २७ ॥ कालेन नोदितो[4] दैत्यो विभीषणमथाब्रवीत् ॥ मद्दत्तभोगैः पुष्टांगो मत्समीपे वसन्नपि ॥ २८ ॥ प्रतीपमाचरत्येष[5] ममैव हितकारिणः ॥ मित्रभावेन शत्रुर्मे जातो नास्त्यत्र संशयः ॥ २९ ॥ अनार्येण कृतघ्नेन संगतिर्मे न युज्यते[6] ॥**

असौ खलः ( मू. ) इव न एव प्रतिजग्राह[3]. ॥ २७ ॥ ( पू. ) – ' (मू.) ॥ २८ ॥ ( पू. ) मम एव प्रतीपं आचरति ! ॥ मित्रभावेन मे ( मू. ) अस्ति. ॥ २९॥ मे ( पू. ). ॥

१ दुष्ट. २ मरणोन्मुख. ३ स्वीकारिता झाला. ४ प्रेरिलेला. ५ विरुद्ध. ६ योग्य आहे.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ज्ञाति आपल्या ज्ञातिबांधवांचा नाश व्हावा असें सर्वदा इच्छीत असतात, असा नियमच आहे. ॥ ३० ॥ ह्या समुदायांपैकीं दुसरा कोणी राक्षस जर असें केवळ एक वाक्य उच्चारील, तर मी त्याचा तत्क्षणीं नाश करीन. नीचा ! जन्मास येऊन राक्षसांच्या कुलाला कलंक लाविलास ! धिक्कार असो तुला ! ! ' ॥ ३१ ॥ रावणानें अशा कठोर शब्दांनीं निर्भर्त्सना केली, तेव्हां तो महापराक्रमी विभीषण हातांत गदा घेऊन सभेंतून तसाच उडाला. ॥ ३२ ॥ त्याच्याबरोबर त्याच्या चौघा मंत्र्यांनींही उड्या मारिल्या. विभीषणाला अतिशय क्रोध आला होता. आकाशांत गेल्यावर उभें राहून त्यानें रावणाला सांगितलें :– ' रावणा ! मी

विनाशमभिकांक्षन्ति ज्ञातीनां ज्ञातयः सदा ॥ ३० ॥ यो ऽन्यस्त्वेवंविधं ब्रूयाद्वाक्यमेकं निशाचरः ॥ हन्मि तस्मिन् क्षणे एव धिक् त्वां रक्षःकुलाधमम् ॥ ३१ ॥ रावणेनैवमुक्तः सन्परुषं स विभीषणः ॥ उत्पपात सभामध्याद्गदापाणिर्महाबलः ॥ ३२ ॥ चतुर्भिर्मन्त्रिभिः सार्धं गगनस्थो ऽब्रवीद्वचः ॥ क्रोधेन महता ऽऽविष्टो रावणं दशकन्धरम् ॥ मा विनाशमुपैहि त्वं प्रियवादिनमेव माम् ॥ ३३ ॥

( मू. ) ज्ञातीनां विनाशं अभिकांक्षन्ति. ॥३०॥ यः अन्यः निशाचरः ( पू. ) वाक्यं ब्रूयात्, ॥ [तं] तस्मिन् क्षणे एव हन्मि. ( मू. ) त्वां धिक् ! ' ॥ ३१ ॥ ( उ. ) सः विभीषणः ( पू. ) उक्तः सन् सभामध्यात् उत्पपात. ॥ ३२ ॥ ( पू. ) महता ( द्वि. ) सः दशकन्धरं रावणं, वचः अब्रवीत् – ' त्वं विनाशं ( मू. ) ॥ ३३ ॥

---

१ इच्छितात. २ राक्षसांच्या कुलांत नीच. ३ गदा हातांत ज्याच्या असा. ४ उडाला. ५ पाव.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

हिताची गोष्ट सांगत असतांही तूं माझा धिक्कार केलास, तरी तुझा नाश होऊं नये - अशीच माझी इच्छा आहे. - कारण, तूं माझा वडील बंधु, ह्मणून मला पित्यासारखा पूज्य आहेस. सर्वांचा संहार करणारा काल रामरूपानें दशरथाच्या घरीं अवतरला आहे. ॥ ३३ ॥ ३४ ॥ - सकल जगाचा संहार करण्याच्या कामीं साह्य करणारी - कालीनामक शक्ति सीता ह्या नांवानें जनकाची कन्या झाली आहे. तीं दोघें ( सीता व राम ), भूमीचा भार दूर करण्यासाठीं येथें आलीं आहेत. ॥ ३५ ॥ - राम सर्वांचा अंतर्यामी होय :- त्यानें प्रेरणा दिल्यामुळेंच तूं माझा हितोपदेश ऐकत नाहींस. श्रीराम सर्वसाक्षी आहे :- तथापि, जसें कमळ चिखलाला लागलेलें असलें तरी चिखलाचे धर्म त्यावर नसतात त्याप्रमाणें, - तो प्रकृतीहून सर्वकाळ पर आहे ( तिच्या गुणांशीं संबद्ध नाहीं ). ॥ ३६ ॥ तो भूतांच्या बाह्य

धिक्करोषि तथाऽपि त्वं ज्येष्ठो भ्राता पितुः समः ॥ कालो राघवरूपेण जातो दशरथालये ॥ ३४ ॥ काली सीताभिधानेन जाता जनकनन्दिनी ॥ तावुभावागतावत्र भूमेर्भारा[1]पनुत्तये ॥ ३५ ॥ तेनैव प्रेरितस्त्वं तु न शृणोषि हितं मम ॥ श्रीरामः प्रकृतेः साक्षात्परस्तात्सर्वदा स्थितः ॥ ३६ ॥ बहिरन्तश्च भूतानां समः सर्वत्र संस्थितः ॥ नामरूपादिभेदेन तत्त[2]न्मय इवामलः ॥ ३७ ॥

( मू. ) जातः. ॥ ३४ ॥ ( पू. ) जाता ॥ ( मू. ) आगतौ. ॥३५॥ ( पू. ) हितं न शृणोषि. ॥ श्रीरामः साक्षा[3]त् (मू.).॥ ३६ ॥ भूतानां ( पू. ). ॥ [4]अमलः ( मू. ) [ स्थितः ]. ॥ ३७ ॥

१ भार दूर करण्यासाठीं. २ तत्तत्स्वरूपी. ३ सर्वसाक्षी. ४ स्वच्छ.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

प्रदेशीं व अंतरीं अशा सर्व ठिकाणीं एकरूपानें वास करीत असतो, आणि नामें रूपें इत्यादि भेदांनीं तत्तत्स्वरूपीसा भासतो. त्याच्या ठिकाणीं रागलोभादि मल नाहींत. ॥ ३७ ॥ मोठा अग्नि ह्मटला तर एकच होय; पण तो अनेक प्रकारच्या वृक्षांच्या ठिकाणीं लागला ( लांकडें जाळीत असला ) ह्मणजे त्यांच्या लहान, मोठ्या, लांबोड्या, वाटोळ्या, चतुष्कोण इत्यादि भिन्न भिन्न आकृतींवरून अज्ञानदृष्टि जनांना त्या त्या आकारांचा दिसतो, त्याप्रमाणेंच ॥३८॥ परमात्मा - अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय हे - पांच कोश व आकाशादि भूतें ह्यांच्या भेदांमुळें तत्तत्स्वरूपी भासत असतो : ह्यालाच दुसरा दृष्टांत स्फटिकाचा— स्फटिकाला मूळचा रंग नाहीं परंतु तो निळ्या पिंवळ्या ज्या ज्या पदार्थाशीं संयुक्त होईल त्या त्या पदार्थाच्या वर्णाचा दिसतो. ॥ ३९ ॥ तोच परमात्मा नित्यमुक्त असतांही स्वतांच्या मायेच्या गुणांत प्रतिबिंबित झाला ह्मणजे काल, प्रधान, पुरुष आणि अव्यक्त ( पालनकर्ता ) असा चार प्रकारांचा होतो. ॥ ४० ॥ तो जन्मरहित परमात्मा प्रधानपुरुषांच्या योगेंकरून सर्व जगाची उत्पत्ति करितो

यथा नानाप्रकारेषु वृक्षेष्वेको महानलः[1]॥तत्तदाकृतिभेदेन भिद्यते ऽज्ञानचक्षुषाम्[2] ॥ ३८ ॥ पंचकोशादिभेदेन तत्तन्मय इवाबभौ[4]॥ नीलपीतादियोगेन निर्मलः स्फटिको यथा ॥ ३९ ॥ स एव नित्यमुक्तो ऽपि स्वमायागुणबिम्बितः ॥ कालः प्रधानं पुरुषो ऽव्यक्तं चेति चतुर्विधः ॥ ४० ॥ प्रधानपुरुषाभ्यां स जगत्कृत्स्नं सृजत्यजः ॥

(मू.) भिद्यते[3], ॥ ३८ ॥ यथा निर्मलः स्फटिकः ( उ. ), ॥ [ तथा ] ( पू. ). ॥ ३९ ॥ ४० ॥ अजः अव्ययः सः ( पू. ) जगत् सृजति. ॥

१ मोठा अग्नि. २ अज्ञानदृष्टींस. ३ भेद पावतो. ४ भासला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

व स्वतां निर्विकार ( नाशरहित ) असून कालरूपानें जगाचा संहार करितो. ॥ ४१ ॥ तोच कालरूपी भगवान् ब्रह्मदेवाच्या प्रार्थनेवरून तुझा वध करण्यासाठीं मायेनें रामरूप घेऊन येथें आला आहे. ईश्वराचा संकल्प सत्य असतो; तो आपली प्रतिज्ञा अन्यथा होऊं देईल कशी ? ॥ ४२ ॥ - ह्मणून मी तुला सांगतों कीं, - राम तुझा पुत्र, सैन्य, वाहनें ह्यांसह वध करणार. रावणा ! तुझा आणि सगळ्या राक्षसकुलाचा वध झालेला माझ्यानें पाहवणार नाहीं; ह्यासाठीं मी रामाकडे जातों. मी गेलों ह्मणजे तूं आपल्या घरांत



कालरूपेण कलनां जगतः कुरुतेऽव्ययः॥ ४१ ॥ कालरूपी स भगवान् रामरूपेण मायया ॥ ब्रह्मणा प्रार्थितो देवस्त्वद्वधार्थमिहागतः॥ तदन्यथा कथं कुर्यात्सत्यसंकल्प ईश्वरः ॥ ४२ ॥ हनिष्यति त्वां रामस्तु सपुत्रबलवाहनम् ॥ हन्यमानं न शक्नोमि द्रष्टुं रामेण रावण ॥ ४३ ॥ त्वां राक्षसं कुलं कृत्स्नं ततो गच्छामि राघवम् ॥ मयि याते सुखी भूत्वा रमस्व भवने चिरम् ॥ ४४ ॥

( मू. ) कलनां[१] कुरुते. ॥ ४१ ॥ ( पू. द्वि. ) [ सन् ] त्वद्वधार्थं मायया रामरूपेण इह आगतः देवः सत्यसङ्कल्पः ईश्वरः ( मू. ) ? ॥४२॥ ( ४३ पू. ) हनिष्यति. रावण, ॥ रामेण हन्यमानं[२] त्वां, कृत्स्नं राक्षसं कुलं [ च ] द्रष्टुं ( बा. ४३ उ. ४४ पू.) गच्छामि. ॥ मयि याते[३] [ सति, त्वं ] ( मू. ) रमस्व[४]. ॥ ४३ ॥ ४४ ॥



१ संहार. २ मारला जाणाऱ्या. ३ गेलेला. ४ सुखानें रहा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

खुशाल पुष्कळ दिवस सुखानें नांद. " ॥ ४३ ॥ ४४ ॥ रावणाच्या भाषणावरून विभीषणानें क्षणमात्रांत सर्व साहित्यानें भरलेल्या घराचा त्याग केला ! त्याच्या मनांत रामाची सेवा करावी अशी इच्छा होती; तेवढ्यासाठीं तो रामाकडे गेला. आतां त्याला स्वतांचे मनोरथ पूर्ण झाल्यासारखें वाटलें. ॥ ४५ ॥

इति श्रीमदध्यात्मरामायणार्थबोधे युद्धकाण्डे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥

महाभाग्यशाली विभीषण चौघां मंत्र्यांसहवर्तमान रामाकडे आला व आकाशांत रामासमोर उभा राहून ॥ १ ॥ उच्च स्वरानें त्याला ह्मणाला :- " हे कमलनयना रामचंद्रा, तूं माझा धनी आहेस. मी, तुझी भार्या ज्यानें

विभीषणो रावणवाक्यतः क्षणाद्विसृज्य[2] सर्वं सपरिच्छदं[1] गृहम् ॥ जगाम रामस्य पदारविन्दयोः सेवाभिकांक्षी[3] परिपूर्णमानसः[4] ॥ ४५ ॥ इति युद्धकाण्डे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥ विभीषणो महाभागश्चतुर्भिर्मंत्रिभिः सह ॥ आगत्य गगने रामसंमुखे समवस्थितः ॥१॥ उच्चैरुवाच भो स्वामिन् राम राजीवलोचन[6] ॥ रावणस्यानुजो ऽहं ते दारहर्तुर्[7]विभीषणः ॥२॥ नाम्ना भ्रात्रा निरस्तो[9] ऽहं त्वामेव शरणं गतः ॥

( पू. ) विसृज्य, ॥ ( मू. ) [ सन् ] जगाम. ॥ ४५ ॥ इति युद्धकाण्डे द्वितीयः सर्गः ॥ २ ॥ महाभागः ( मू. ) [ सन् ] ॥ १ ॥ उच्चैः उवाच – ' ( २ मू. ) रावणस्य अनुजः[8], नाम्ना विभीषणः च [ अस्मि ]. ( ३ पू. ). ॥

---

१ साहित्यासहित, अशा. २ सोडून. ३ सेवा करूं इच्छिणारा. ४ पूर्ण झाला मनोरथ ज्याचा, असा. ५ भाग्यशाली; ज्ञानसंपन्न. ६ कमलासारखे नेत्र ज्याचे, अशा. ७ स्त्री हरण करणाऱ्या. ८ धाकटा भाऊ. ९ घालविलेला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मूर्खाला उपदेश काय होय?

चोरून नेली, त्याचा (रावणाचा) कनिष्ठ बंधु. माझें नांव विभीषण - भावानें मला घालवून दिलें, ह्मणून मी तुला शरण आलों. देवा! रावणाला स्वस्वरूपाचें ज्ञान नाहीं, ह्मणून मी हिताची गोष्ट सांगितली कीं, ॥ २ ॥ ३ ॥ जनकाची कन्या सीता रामाकडे पाठवून दे. हें मी वारंवार सांगितलें, तरी तो ऐकतच नाहीं. कालपाशांनीं त्याला पूर्णपणें स्वाधीन करून घेतलें आहे, - दुसरें काय ह्मणावें? - ॥ ४ ॥ तो अधम राक्षस मला मारण्यासाठीं खड्ग घेऊन धांवून आला. इतक्यांत लागलाच मी चार सचिवांना बरोबर घेऊन भीतीस्तव ॥ ५ ॥ तुला शरण आलों. रामा! मला, मोक्ष मिळावा, अशी इच्छा आहे; माझे भवपाश तोड.' विभीषणाचें वचन ऐकिल्यावर सुग्रीवानें रामाला सांगितलें :- ॥ ६ ॥ 'रामा! हा कोणी तरी कपटी अधम राक्षस आहे. ह्याच्यावर तूं विश्वास ठेवावास, हें मला

हितमुक्तं मया देव तस्य चाविदितात्मनः[1] ॥३॥सीतां रामाय वैदेहीं प्रेषयेति पुनः पुनः ॥ उक्तोऽपि न शृणोत्येषः कालपाशवशं गतः ॥ ४ ॥ हन्तुं मां खड्गमादाय प्राद्रवद्राक्षसाधमः[2] ॥ ततोऽचिरेण सचिवैश्चतुर्भिः सहितो भयात् ॥५॥ त्वामेव भवमोक्षाय मुमुक्षुः शरणं गतः ॥ विभीषणवचः श्रुत्वा सुग्रीवो वाक्यमब्रवीत् ॥ ६ ॥ विश्वासार्हो न ते राम मायावी[3] राक्षसाधमः ॥

देव, (मू.) तस्य हितं उक्तं- ॥ २ ॥ ३ ॥ वैदेहीं (मू.) एषः न शृणोति. ॥ ४ ॥ राक्षसाधमः मां (मू.) सचिवैः सहितः भयात् ॥५॥ मुमुक्षुः [अहं] भवमोक्षाय (पू.). '॥ सुग्रीवः (मू.) -॥ ६ ॥ 'राम, बली मायावी राक्षसाधमः विशेषेण सीताहर्तुः रावणस्य अनुजः ॥

१ न्हाहीं कळलें आत्मरूप ज्याला, अशा. २ प्राद्रवत् धांवला. ३ कपटी.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

योग्य दिसत नाहीं. त्यांतूनही, - दुसरा कोणी असता तर चिंता नव्हती, पण - हा ह्मणजे ज्यानें सीता चोरून नेली त्या रावणाचा पाठचा भाऊ आहे! हा महाबलाढ्य दिसतो! ॥ ७ ॥ ह्याच्याबरोबर अस्त्रें घेऊन तयार असलेले मंत्री आहेत! त्यांच्या साह्यानें हा आह्मांला एखाद्या विवरांत कोंडून मारून टाकील!! ह्मणून, देवा! वानरांकडून ह्याचा वध करविण्याची मला आज्ञा दे. ॥ ८ ॥ मला तर असें वाटत आहे. रामा! तुझ्या बुद्धीचा कसा काय ग्रह झाला आहे, सांग.' सुग्रीवाचें भाषण ऐकून राम हांसत हांसत त्याला म्हणाला :– ॥ ९ ॥ "वानरराजा! मी मनांत आणिलें, तर अर्ध्या क्षणांत लोकपालांसह सर्व जगाचा संहार उडवीन किंवा निमिषार्धांत नवी सृष्टि करीन. ॥ १० ॥ ह्मणून - तुला सांगतों कीं, - मी

सीताहर्तुर्विशेषेण रावणस्यानुजो बली ॥७॥ मन्त्रिभिः सायुधैरस्मान् विवरे निह-
निष्यति ॥ तदाज्ञापय मे देव वानरैर्हन्यतामयम् ॥ ८ ॥ ममैवं भाति ते राम बुद्ध्या
किं निश्चितं वद ॥ श्रुत्वा सुग्रीववचनं रामः सस्मितमब्रवीत् ॥ ९ ॥ यदीच्छामि
कपिश्रेष्ठ लोकान्सर्वान्सहेश्वरान् ॥ निमिषार्धेन संहन्यां सृजामि निमिषार्धतः
॥ १० ॥ अतो मया ऽभयं दत्तं शीघ्रमानय राक्षसम् ॥ ११ ॥

ते विश्वासार्हः न. ॥७॥ सायुधैः (मू.) हन्यतां [इति] मे आज्ञापय. ॥ ८ ॥ राम, (पू.).' ॥ रामः सुग्रीवचनं (मू.) – ॥९॥ कपिश्रेष्ठ, (पू.) लोकान ॥ (मू.) संहन्यां. ॥१०॥ (मू.) आनय. ॥११ ॥

१ गुहेंत. २ मारील. ३ मारावा. ४ आज्ञा दे. ५ अर्ध्या क्षणांत. ६ उत्पन्न करितों. ७ संहार करीन.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

अ-रा-बो.
समू-सान्व.
सटिप्पण.
॥ १९ ॥

युद्धकाण्ड
सर्ग ३
रामाला विभीषण भेटतो.

ह्याला अभय दिलें आहे; राक्षसाला लवकर घेऊन ये. ॥ ११ ॥ जो प्राणी केवळ एकदां 'देवा! मी तुझा आहें' असें ह्मणतो व मजपाशीं अभय मागतो–मग तो कितीही निकृष्ट स्थितींतला किंवा कोणत्याही योनींत जन्मलेला असो–त्याला अभय द्यावयाचें, हें माझें व्रत आहे." ॥ १२ ॥ रामाचें वचन ऐकून सुग्रीवाच्या मनाला हर्ष झाला. पुढें त्यानें विभीषणाला आणून रामाला भेटविलें. ॥ १३ ॥ विभीषणानें रघुवीरापुढें लोटांगण घातलें. त्याच्या मनांत पूर्ण भक्ति उद्भवली होती. आनंदानें त्याचा कंठ भरून आला, व शब्द अडखळूं लागला. ॥ १४ ॥ रामाच्या शरीराचा वर्ण श्यामल, नेत्र विशाल, व मुखकमल प्रसन्न होतें. त्यानें हातांत धनुष्यबाण धरिले असून जवळ लक्ष्मण उभा होता. त्याची मुद्रा शांत दिसे. ॥ १९ ॥

सकृदेव प्रपन्नाय तवास्मीति च याचते ॥ अभयं सर्वभूतेभ्यो ददाम्येतद्व्रतं मम ॥ १२ ॥ रामस्य वचनं श्रुत्वा सुग्रीवो हृष्टमानसः ॥ विभीषणमथानाय्य दर्शयामास राघवम् ॥ १३ ॥ विभीषणस्तु साष्टांगं प्रणिपत्य रघूत्तमम् ॥ हर्षगद्गदया वाचा भक्त्या च परया ऽन्वितः ॥ १४ ॥ रामं श्यामं विशालाक्षं प्रसन्नमुखपंकजम् ॥ धनुर्बाणधरं शान्तं लक्ष्मणेन समन्वितम् ॥ १५ ॥

तव अस्मि इति (पू.) ॥ सर्वभूतेभ्यः [निकृष्टाय अपि] (मू.) व्रतं.' ॥१२॥ (पू.) सुग्रीवः ॥ अथ (मू.) दर्शयामास. ॥१३॥ परया भक्त्या अन्वितः विभीषणः तु रघूत्तमं (१३पू.), (१४।१९मू.) ॥

॥ १९ ॥

१ स्वीकारणाऱ्या; ह्मणणाऱ्या; शरण आलेल्या. २ मागणाऱ्या. ३ आणवून.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

बिभीषणानें करसंपुट जोडून त्याची स्तुति करण्यास प्रारंभ केला:- ॥ १६ ॥ बिभीषण ह्मणाला :- ' राजाधिराजा रामचंद्रा ! तुला नमस्कार असो. तूं सीतेच्या मनाला रमवितोस; तुला नमस्कार असो. तुझें धनुष्य प्रचंड आहे; तुला मी प्रणाम करितों. हे भक्तवत्सला, तुला नमस्कार असो. ॥ १७ ॥ रामा, तुझ्या स्वरूपाला अंत नाहीं; तें शांत आहे; त्याचें तेज अपरिमित दिसतें; तूं सुग्रीवाचा मित्र व रघुकुलाचा अधिपति होस. तुला अनेक नमस्कार असोत. ॥ १८ ॥ हे थोर पुरुषा ! जगाची उत्पत्ति व नाश होण्याचें कारण तूंच आहेस. - तूं सर्वांचा अंतर्यामी असल्यामुळें - त्रैलोक्याचा गुरु होस. तूं अनादि काळापासून मायानामक गृहिणीबरोबर गृहस्थाश्रम स्वीकारून राहत असतोस. तुला नमस्कार असो. ॥ १९ ॥

कृताञ्जलिपुटो भूत्वा स्तोतुं समुपचक्रमे[१] ॥ १६ ॥ विभीषण उवाच । नमस्ते राम राजेन्द्र नमः सीतामनोरम[२] ॥ नमस्ते चण्डकोदण्ड[३] नमस्ते भक्तवत्सल ॥ १७ ॥ नमोऽनन्ताय शान्ताय रामायामिततेजसे[४] ॥ सुग्रीवमित्राय च ते रघूणां पतये नमः ॥ १८ ॥ जगदुत्पत्तिनाशानां कारणाय महात्मने ॥ त्रैलोक्यगुरवेऽनादिगृहस्थाय[५] नमो नमः ॥ १९ ॥

कृतांजलिपुटः भूत्वा, रामं ( मू. ) ॥ १४ ॥१५॥१६॥ वि० उ० – राजेन्द्र राम, ते ( पू. ) [ ते ] नमः.॥ चण्डकोदण्ड, ते (मू.) ते नमः. ॥१७॥ (पू.) रामाय नमः (मू.) ते नमः. ॥१८॥ (मू.)॥१९॥

---

१ आरंभ करिता झाला. २ सीतेच्या मनास रमविणाऱ्या. ३ उग्र धनुष्य ज्याचें, अशा. ४ अपरिमित तेज ज्याचें, अशा. ५ अनादि काळापासून गृहस्थाश्रमी. ( योगमाया स्वीकारून असलेला ).

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

‘तूं जगन्मय भासतोस.’

रामा ! अनंत कोटि ब्रह्मांडांचा उत्पादक, रक्षक व अंतीं लयस्थान तूंच होस. तूं इच्छेप्रमाणें वर्तन करणारा ( स्वतंत्र ) आहेस. तुला नमस्कार असो. ॥ २० ॥ रघुवीरा ! तूं स्थावरजंगमात्मक भूतांच्या बाहेर व आंत व्याप्यव्यापकरूपानें भरलेला आहेस ह्मणून जगन्मय भासत असतोस. ॥ २१ ॥ तुझ्या मायेनें ज्यांचें ज्ञान हरून घेतलें असतें ( ज्यांना, हें जग ईश्वररूप होय, असें ज्ञान नसतें ) व अर्थात ज्यांचा आत्मा नष्ट झाल्यासारखा असतो, त्या लोकांचीं अंतःकरणें विपरीत प्रवृत्तिमार्गांत गुंतून राहतात. ह्मणूनच त्यांना नेहमीं पापपुण्यांच्या अनुरोधानें जन्ममरणरूप संसार भोगावा लागतो. ॥ २२ ॥ जोंपर्यंत प्राण्याचें अंतः-करण ज्ञानरूपी तुझ्या ठिकाणीं एकाग्रपणें लागलें नाहीं, तोंपर्यंत, जसें शिंपेच्या तुकड्यावर रुपें भासावें

त्वमादिर्जगतां राम त्वमेव स्थितिकारणम् ॥ त्वमन्ते निधनस्थानं स्वेच्छाचार-स्त्वमेव हि ॥ २० ॥ चराचराणां भूतानां बहिरन्तश्च राघव ॥ व्याप्यव्यापकरूपेण भवान् भाति जगन्मयः ॥ २१ ॥ त्वन्मायया हृतज्ञाना नष्टात्मानो विचेतसः ॥ गतागतं प्रपद्यन्ते पापपुण्यवशात्सदा ॥ २२ ॥ तावत्सत्यं जगद्भाति शुक्तिकारजतं यथा ॥ यावन्न ज्ञायते ज्ञानचेतसा नान्यगामिना ॥ २३ ॥

राम, त्वं जगतां (मू.) स्वेच्छाचारः [असि]. ॥ २० ॥ राघव, (मू.) भाति. ॥ २१ ॥ (मू.) गतागतं प्रपद्यन्ते. ॥ २२ ॥ (उ.) ज्ञानचेतसा [भवान्] न ज्ञायते, ॥ तावत् यथा (पू.) [तथा] जगत् सत्यं भाति. ॥ २३ ॥

१ लय होण्याचें स्थान. २ स्वतांच्या इच्छेप्रमाणें वागणारा. ३ स्थावर जंगम. ४ भासतो. ५ भानशून्य. ६ विपरीत मार्गाकडे मन ज्यांचें, असे. ७ जाण्यायेण्यास. ८ पावतात. ९ दुसरेकडे न जाणाऱ्या. १० ज्ञानस्वरूपावर जें मन, त्यानें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

त्याप्रमाणें, त्यांना जग सत्य भासत असतें. ॥ २३ ॥ व्यापका! हे विषय परिणामीं दुःख देतात, - असें निश्चित ठरलेलें आहे :- तथापि लोकांना तुझ्या स्वरूपाचें ज्ञान नसतें, ह्मणून ते पुत्र, स्त्रिया, गृहें इत्यादिकांच्या ठिकाणीं आसक्त व विषयसुखांत रममाण होऊन राहतात. ॥ २४ ॥ इंद्र, अग्नि, यम, निर्ऋति, वरुण, वायु, कुबेर, रुद्र हे अष्टौ दिक्पाल तुझ्याच विभूति आहेत. पुरुषोत्तम ( विष्णु ) तूंच. ॥ २५ ॥ ईश्वरा! तूं सूक्ष्माहून अतिसूक्ष्म ( कळण्यास अति कठिण ) व स्थूलाहून अतिस्थूल ( सर्वव्यापक ) आहेस. तूं सर्व लोकांचें मातापितरांप्रमाणें समदृष्टीनें पालन पोषण करितोस ( मूल चांगलें असो अथवा वाईट असो; आईबाप त्याचें संगोपन उत्तम प्रकारें करितातच; त्याप्रमाणें तूं उच्च नीच सर्व भूतांचें पालन, आवड नावड न धरितां, करितोस) . ॥ २६ ॥ तुला आदि, मध्य, व अंत नाहींत. तुझ्या ठिकाणीं कोणतीही शक्ति कमी नाहीं. तुला वृद्धि व उतारपणही नाहींत. तूं नित्य परि-

त्वदज्ञानात्सदा युक्ताः पुत्रदारगृहादिषु ॥ रमन्ते विषयान्सर्वानन्ते दुःखप्रदान्वि-
भो ॥ २४॥ त्वमिन्द्रोऽग्निर्यमो रक्षो वरुणश्च तथाऽनिलः ॥ कुबेरश्च तथा रुद्र-
स्त्वमेव पुरुषोत्तमः ॥ २५ ॥ त्वमणोरप्यणीयांश्च स्थूलात्स्थूलतरः प्रभो ॥ त्वं पिता
सर्वलोकानां माता धाता त्वमेव हि ॥ २६ ॥ आदिमध्यान्तरहितः परिपूर्णो
ऽच्युतोऽव्ययः ॥ त्वं पाणिपादरहितश्चक्षुःश्रोत्रविवर्जितः ॥ २७ ॥

विभो, ( पू. ) युक्ताः ॥ ( मू. ) विषयान् रमन्ते. ॥ २४ ॥ ( मू. ) ॥ २५ ॥ प्रभो, ( पू. ) च त्वं सर्वलोकानां पिता; त्वं एव ( मू. ) ॥ २६ ॥ २७ ॥

---

१ वायु. २ सूक्ष्माहून. ३ अति सूक्ष्म. ४ फार मोठा. ५ पोषण करणारा. ६ हस्तपादरहित. ७ नेत्र व कर्ण यांनीं रहित.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पूर्ण स्थितींत असतोस. तुला हस्त, पाद, नेत्र व कर्ण नाहींत; ॥ २७ ॥ तथापि तूं ऐकतोस, पाहतोस, धरितोस व धांवतोस. तूंच खर दैत्याचा नाश केलास. - अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय ह्या - पांच कोशांहून तूं वेगळा आहेस. तुझ्या ठिकाणीं गुण नाहींत व तुला दुसरा कोणताही आधार नाहीं. ॥ २८ ॥ 'कांहीं तरी आहे, तें अमुक असें मात्र कळत नाहीं' ह्या ज्ञानाला निर्विकल्प ज्ञान असें ह्मणतात : ईश्वरा ! तूं अशा निर्विकल्प ज्ञानाचा विषय आहेस ( तुझी सत्ता आहे एवढें मात्र कळतें, तुझें स्वरूप अमुक प्रकारचें आहे, असें कळत नाहीं ); अर्थात तुला आकार नाहीं हें सिद्ध आहे. तुला पूज्य असा दुसरा कोणीच नाहीं. तुला कोणताही विकार नाहीं; ह्मणजे तूं उत्पन्न होणें, उत्पत्तीनंतर असणें, वाढणें, पूर्णदशेस येणें, क्षीण होत जाणें व नाश पावणें ह्या सहा भावविकारांनीं रहित आहेस. ज्याला आदि नाहीं तो प्रकृतीहून पर (तिच्या गुणांशीं असंबद्ध) असलेला पुरुष तूंच. ॥ २९ ॥ तूं मनुष्यासारखा दिसत

श्रोता[1] द्रष्टा[2] ग्रहीता[3] च जवनैस्त्वं[4] खरान्तकः[5] ॥ कोशेभ्यो[6] व्यतिरिक्तस्त्वं[7] निर्गुणो निरुपाश्रयः[8] ॥२८॥ निर्विकल्पो[9] निर्विकारो निराकारो निरीश्वरः[10] ॥ षड्भावरहितो[11] ऽनादिः पुरुषः प्रकृतेः परः ॥ २९ ॥ मायया गृह्यमाणस्त्वं मनुष्य इव भाव्यसे[12] ॥

( मू. ) [ च ]. ॥ २८ ॥ २९ ॥ ( पू. ). ॥

---

१ ऐकणारा. २ पाहणारा. ३ धरणारा. ४ पळणारा. ५ खर दैत्याला मारणारा. ६ अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय, व आनंदमय ह्या पांच कोशांहून. ७ वेगळा. ८ दुसऱ्या आधारावांचून असलेला. ९ कांहीं तरी आहे अशा ज्ञानाचा विषय. १० ज्याला पूज्य कोणी नाहीं, असा. ११ सहा भावविकारांनीं रहित. १२ मानिला जातोस.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आहेस; ह्या स्वरूपाचें दर्शन होण्याला कारण तुझी माया होय. जे विष्णुभक्त जन तूं निर्गुण व जन्मरहित आहेस असें जाणितात, ते मोक्ष पावतात. ॥ ३० ॥ प्रभो रामचंद्रा ! मला तुझ्या चरणांची उत्तम प्रकारें भक्ति ही निःश्रेणि ( शिडी ) मिळावी व तिच्या साह्यानें मी ज्ञानयोग नांवाच्या राजवाड्याच्या शिखरावर चढावें, अशी माझी इच्छा आहे. ॥३१॥ हे सीतापते रामचंद्रा ! तूं परम दयानिधि पण सांप्रत रावणाचा शत्रु आहेस. तुला मी वारंवार नमस्कार करितों. तूं मला भवसागरांतून सोडव." ॥ ३२ ॥ ही स्तुति ऐकिल्यावर भक्तवत्सल श्रीरामचंद्र प्रसन्न झाला व विभीषणाला ह्मणाला :– भक्तोत्तमा ! तुझें कल्याण असो. मी तुला वर देण्यास सिद्ध आहें; पाहिजे तो वर मागून घे.' ॥३३॥ विभीषण ह्मणालाः– 'रघुवीरा ! तुझ्या चरणांचें दर्शन

**ज्ञात्वा त्वां निर्गुणमजं वैष्णवा मोक्षगामिनः ॥ ३० ॥ अहं त्वत्पादसद्भक्तिनिः- श्रेणीं प्राप्य राघव ॥ इच्छामि ज्ञानयोगाख्यं सौधमारोढुमीश्वर ॥ ३१ ॥ नमः सीतापते राम नमः कारुणिकोत्तम ॥ रावणारे नमस्तुभ्यं त्राहि मां भवसागरात् ॥ ३२ ॥ ततः प्रसन्नः प्रोवाच श्रीरामो भक्तवत्सलः ॥ वरं वृणीष्व भद्रं ते वाञ्छितं वरदो ऽस्म्यहम् ॥ ३३ ॥**

वैष्णवाः ( मू. ) ज्ञात्वा मोक्षगामिनः [ भवन्ति ]. ॥ ३० ॥ राघव ईश्वर, ( मू. ) इच्छामि. ॥ ३१ ॥ सीतापते राम, [ ते ] (पू.), [ ते ] नमः. रावणारे, तुभ्यं (मू.) त्राहि. ' ॥ ३२ ॥ (पू.) श्रीरामः प्रोवाच – ॥' वाञ्छितं वरं वृणीष्व. ते भद्रं. अहं ( मू. ). ' ॥ ३३ ॥

---

१ मोक्षास जाणारे. २ तुझ्या चरणांची उत्तम भक्ति ह्या शिडीला किंवा जिन्याला. ३ राजमंदिरास. ४ चढण्यास. ५ उत्तम दयावंता. ६ संसारसमुद्रांतून. ७ माग.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

'मला भक्ति व ज्ञान दे.'

मिळालें एवढ्यानेंच मी धन्य व कृतकृत्य झालों; माझा सर्व कार्यभाग पार पडला; आणि मला मुक्ति मिळाली; ह्यांत संशय नाहीं. ॥३४॥ रामा! तुझ्या मूर्तीचें दर्शन मिळाल्यामुळें - मला असें वाटत आहे कीं, - मजसारखा धन्य जगांत कोणी नाहीं, मजसारखा पवित्र कोठें मिळणार नाहीं, फार तर काय सर्व गुणांत माझ्या सारख्या योग्यतेचा पुरुष कोठेंही सांपडायाचा नाहीं. ॥ ३५ ॥ रघुकुमरा! मी स्वतांच्या पूर्व कर्मांमुळें ह्या बंधनांत (संसारांत) पडलों आहें. हें बंधन तुटण्यासाठीं तूं मला भक्तीपासून उद्भवणारें आपल्या (तुझ्या) स्वरूपाचें ज्ञान दे व मोक्षप्राप्तीचें साधन असें तुझें ध्यान करण्याकडे माझी प्रवृत्ति कर. ॥३६॥ राजाधिराजा रामचंद्रा! मी तुजपाशीं विषयसुख मागत नाहीं; तर तुझ्या चरणकमलावर माझी सर्वकाळ

विभीषण उवाच ॥ धन्यो ऽस्मि कृतकृत्यो ऽस्मि कृतकार्यो ऽस्मि राघव ॥ त्वत्पाददर्शनादेव विमुक्तो ऽस्मि न संशयः ॥३४॥ नास्ति मत्सदृशो धन्यो नास्ति मत्सदृशः शुचिः ॥ नास्ति मत्सदृशो लोके राम त्वन्मूर्तिदर्शनात् ॥ ३५ ॥ कर्मबन्धविनाशाय त्वज्ज्ञानं भक्तिलक्षणम् ॥ त्वद्ध्यानं परमार्थं च देहि मे रघुनन्दन ॥ ३६ ॥ न याचे राम राजेन्द्र सुखं विषयसंभवम् ॥ त्वत्पादकमले सक्ता भक्तिरेव सदा ऽस्तु मे ॥३७॥

वि० उ० – 'राघव, (मू.). ॥ ३४ ॥ (बा. उ.) मत्सदृशः धन्यः (पू.) न अस्ति. लोके मत्सदृशः न अस्ति. ॥३५॥ रघुनन्दन, मे (पू.) त्वज्ज्ञानं ॥ परमार्थं (मू.). ॥३६॥ (पू.) सुखं न याचे. मे (मू.).' ॥ ३७ ॥

१ पवित्र. २ मागतों.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

अखंड भक्ति राहावी, - इतकाच वर मला पाहिजे आहे. - ' ॥ ३७ ॥ हें ऐकून रामचंद्र संतुष्ट झाला व 'ठीक आहे' असें ह्मणून राक्षसाला पुन्हां सांगूं लागला :- 'बिभीषणा! तुझें कल्याण असो. मी तुला एक सिद्धांताची गुप्त गोष्ट सांगतों, ऐक :- ॥ ३८ ॥ - ह्या जगांत, - जे पुरुष सर्व ठिकाणची आसक्ति सोडून योगाभ्यास व माझी भक्ति करण्यांत दक्ष राहतात आणि ज्यांचे स्वभाव अत्यंत शांत असतात त्यांच्या हृदयामध्यें सीतेसहवर्तमान मी नित्य वास करितों, ह्यांत संशय नाहीं : - अर्थात तुझ्या अंतःकरणांत मी आहेंच; - ॥ ३९ ॥ तूं सर्वदा शांत असतोस; तुझ्याठिकाणीं पाप मुळींच राहिलेलें नाहीं. असेंच माझें नित्य ध्यान करीत गेलास कीं तूं ह्या भयंकर संसारसमुद्रांतून मुक्त होशील. ॥ ४० ॥ तूं केलेलें हें स्तोत्र मला फार आवडलें. जो मनुष्य केवळ माझ्या प्रीत्यर्थ ह्याचा पाठ करील, हें लिहील,

ओमित्युक्त्वा[1] पुनः प्रीतो रामः प्रोवाच राक्षसम् ॥ शृणु वक्ष्यामि ते भद्रं रहस्यं मम निश्चितम् ॥ ३८ ॥ मद्भक्तानां प्रशान्तानां योगिनां वीतरागिणाम्[2] ॥ हृदये सीतया नित्यं वसाम्यत्र न संशयः ॥ ३९ ॥ तस्मात्त्वं सर्वदा शान्तः सर्वकल्मषवर्जितः[3] ॥ मां ध्यात्वा मोक्ष्यसे नित्यं घोरसंसारसागरात् ॥ ४० ॥ स्तोत्रमेतत्पठेद्यस्तु लिखेद्यः शृणुयादपि ॥ मत्प्रीतये ममाभीष्टं सारूप्यं समवाप्नुयात् ॥ ४१ ॥

प्रीतः रामः (पू.) प्रोवाच - ' (मू.) रहस्यं वक्ष्यामि. ॥३८॥ (मू.) न. ॥३९॥ (पू.) त्वं ॥ मां नित्यं (मू.) मोक्ष्यसे. ॥ ४० ॥ यः तु मत्प्रीतये एतत् अभीष्टं स्तोत्रं पठेत्, यः (पू.), [सः] (मू.). ॥४१॥

१ ओम् बरें; ठीक. २ गेली प्रीति ज्यांपासून, त्या. ३ सर्वपापरहित.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

किंवा निदान ऐकेल तरी, त्याला माझी सरूपता मुक्ति प्राप्त होईल. ' ॥ ४१ ॥ - शंकर ह्मणाले :– पार्वति, - भक्तजनांवर रामाचें फार प्रेम असतें. तो विभीषणाला इतकें सांगून लक्ष्मणाकडे वळला व त्याला ह्मणाला :– ' लक्ष्मणा ! माझ्या दर्शनाचें फळ काय असतें, तें ह्याला आतांच दिसलें ( कळलें ) पाहिजे : ॥ ४२ ॥ ह्मणून मी ह्याला - येथेंच ह्या क्षणींच - लंकेंतील राज्याचा अभिषेक करणार : तूं समुद्राचें उदक घेऊन ये. जोंपर्यंत सूर्य व चंद्र विद्यमान आहेत, जो कालपर्यंत पृथ्वी स्थिर राहणार आहे, ॥ ४३ ॥ व जितका वेळ माझी कीर्ति जगांत असेल, तोंपर्यंत ह्यानें लंकेचें राज्य करावें. ' असें सांगून रामानें लक्ष्मणाकडून कलशांत उदक भरून आणविलें; ॥ ४४ ॥ आणि त्या लक्ष्मीपति प्रभूनें विभीषणाचे चौघे मंत्री

इत्युक्त्वा लक्ष्मणं प्राह श्रीरामो भक्तभक्तिमान् ॥ पश्यत्विदानीमेवैष मम संदर्शने फलम् ॥ ४२ ॥ लंकाराज्ये ऽभिषेक्ष्यामि जलमानय सागरात् ॥ यावच्चन्द्रश्च सूर्यश्च यावत्तिष्ठति मेदिनी ॥ ४३ ॥ यावन्मम कथा लोके तावद्राज्यं करोत्वसौ ॥ इत्युक्त्वा लक्ष्मणेनाम्बु ह्यानाय्य कलशेन तम् ॥ ४४ ॥ लंकाराज्याधिपत्यार्थमभिषेकं रमापतिः ॥ कारयामास सचिवैर्लक्ष्मणेन विशेषतः ॥ ४५ ॥

भक्तभक्तिमान श्रीरामः ( पू. ) – ' एषः ( मू. ) पश्यतु. ॥ ४२ ॥ [ एनं ] ( पू. ) जलं आनय. ॥ ( मू. ) च तिष्ठति, ॥ ४३ ॥ यावत् लोके ( ४४ पू. ) राज्यं करोतु. ' ॥ रमापतिः ( ४४ उ. ) अम्बु[2] आनाय्य[3], तं ( मू. ) लक्ष्मणेन [ च ] कारयामास[4]. ॥ ४४ ॥ ४५ ॥

१ पृथ्वी. २ उदक. ३ आणवून. ४ करविता झाला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

व विशेषतः लक्ष्मण ह्यांच्याकडून विभीषणाला लंकेच्या राज्याधिकाराचा अभिषेक करविला. ॥ ४५ ॥ सर्व वानरांनीं 'वाहवा! उत्तम गोष्ट झाली!!' असें ह्मणून ह्या कृत्याची प्रशंसा केली. सुग्रीवानेंही विभीषणाला आलिंगन देऊन ह्मटलें :-॥४६॥ 'विभीषणा! आपण सर्वजणच प्रभु रामचंद्राचे सेवक आहों; तथापि तूं सर्वांमध्यें मुख्य आहेस. कारण, तूं रामाचा आश्रय केवळ भक्तीस्तव केलास.॥४७॥ आतां, रावणाचा नाश करण्याच्या कामीं रामाला त्वां साह्य करावें.' विभीषण ह्मणाला :- ' - सुग्रीवा! मी यःकश्चित् प्राणी! - प्रभु रामचंद्राला साह्य करण्याचें माझें काय सामर्थ्य आहे? तथापि, मी भक्तिपुरःसर निष्कपटपणें यथाशक्ति त्याची सेवा करीन.' ॥ ४८ ॥ रावणानें शुक नांवाचा एक महादैत्य कांहीं निरोप सांगून सुग्रीवाकडे पाठविला

साधु साध्विति ते सर्वे वानरास्तुष्टुवुर्भृशम्[१] ॥ सुग्रीवोऽपि परिष्वज्य[२] विभीषणमथाब्रवीत् ॥ ४६ ॥ विभीषण वयं सर्वे रामस्य परमात्मनः ॥ किंकरास्तत्र[३] मुख्यस्त्वं भक्त्या रामपरिग्रहात्[४] ॥४७॥ रावणस्य विनाशे त्वं साहाय्यं कर्तुमर्हसि ॥ विभीषण उवाच । अहं कियान्सहायत्वे रामस्य परमात्मनः ॥ किं तु दास्यं करिष्येऽहं भक्त्या शक्त्या त्वमायया[६] ॥४८॥ दशग्रीवेण संदिष्टः[७] शुको नाम महासुरः ॥

( पू. ) ' साधु, साधु इति ' भृशं तुष्टुवुः ॥ सुग्रीवः अपि विभीषणं ( मू. ) - ॥४६॥ 'विभीषण, सर्वे ( पू. ) रामस्य ॥( मू. ) मुख्यः [ जातः ]. ॥ ४७ ॥ त्वं ( पू. ).' ॥ वि० उ० - ' ( द्वि. ) रामस्य सहायत्वे कियान ? ॥ ( मू. ) [ च ] दास्यं करिष्ये. ' ॥ ४८ ॥ ( पू. ) ॥

१ अत्यंत. २ आलिंगून. ३ सेवक. ४ रामाचा स्वीकार केल्यामुळें. ५ केवढासा. ६ निष्कपटपणें. ७ निरोप दिलेला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

भेदाचा किंवा फितूरीचा प्रयत्न.

होता. तो - इकडे आला व - आकाशांत उभा राहून सुग्रीवाला सांगूं लागला :— ॥ ४९ ॥ 'सुग्रीवा! - वाली व रावण परस्परांना भाऊ मानीत असत; तूं वालीचा भाऊ अर्थांत - रावणाचाही भाऊ झालास. त्या राक्षसाधिपतीनें तुला सांगितलें आहे कीं, तूं मोठ्या कुलांत जन्मला असून वनचरांचा राजा आहेस; ॥५०॥ मी तर तुला सख्ख्या भावासारखा लेखितों; मजकडून तुझ्या कोणत्याही वस्तूचा नाश झालेला नाहीं; मी राजपुत्राची पत्नी आणिली, त्याचें तुला काय? ॥५१॥ तूं वानरांना बरोबर घेऊन निमूटपणें किष्किंधेस परत जा; अरे! लंका हस्तगत करून घेणें देवांना देखील अशक्य आहे, तेथें मानवांचें किंवा वानरसेनापतींचें काय

संस्थितो ह्यम्बरे वाक्यं सुग्रीवमिदमब्रवीत् ॥ ४९ ॥ त्वामाह रावणो राजा भ्रातरं राक्षसाधिपः ॥ महाकुलप्रसूतस्त्वं राजा ऽसि वनचारिणाम् ॥ ५० ॥ मम भ्रातृसमानस्त्वं तव नास्त्यर्थविप्लवः ॥ अहं यदहरं भार्यां राजपुत्रस्य किं तव ॥ ५१ ॥ किष्किन्धां याहि हरिभिर्लंका शक्या न दैवतैः ॥ प्राप्तुं किं मानवैरल्पसत्वैर्वानरयूथपैः ॥ ५२ ॥

अम्बरे संस्थितः [ सन् ] (मू.) वाक्यं अब्रवीत् – ॥ ४९ ॥ "(पू.) रावणः भ्रातरं त्वां आह – '(मू.) राजा असि. ॥ ५० ॥ त्वं (पू.) न अस्ति. ॥(मू.) भार्यां अहरं, [ तत्र ] तव [दुःखं] किं? ॥ ५१ ॥ हरिभिः [सह] (पू.) अपि प्राप्तुं न शक्या; ॥ (मू.) [च] किं [भवेत्]?" ॥ ५२ ॥

१ आकाशांत. २ राहिलेला. ३ मोठ्या कुलांत जन्मलेला. ४ वनांत फिरणाऱ्यांचा. ५ द्रव्याचा नाश. ६ आणिता झालों. ७ थोडी शक्ति ज्यांची, अशा. ८ वानरसेनापतींनीं.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

चालणार ? तुमच्या शक्ति त्या किती ? ' ॥ ५२ ॥ तो दैत्य - अशा प्रकारें सुग्रीवाला रावणाचा - निरोप कळवीत होता, इतक्यांत वानरांनीं भराभर वर उड्या मारिल्या आणि लागलीच शुकाला खालीं आणून मुष्टिमोदकांची बिदागी देण्यास प्रारंभ केला ! ॥ ५३ ॥ वानर मारूं लागले तेव्हां शुक रामचंद्राला ह्मणालाः— " महासमर्था रामचंद्रा ! तूं राजाधिराजा आहेस; ' दूतांना मारूं नये व मारीतही नाहींत ' - ही राजनीति तुला विदित असलीच पाहिजे : - तर मग ह्या आपल्या वानरांना आटोपून घे. " ॥५४॥ शुकाचें तें भाषण व रुदन रामाच्या कानीं आलें. तेव्हां त्यानें वानरांना ' ह्याला मारूं नका ' असें सांगून मागें घेतलें. ॥५५॥

तं प्रापयन्तं वचनं तूर्णमुत्प्लुत्य वानराः ॥ प्रापद्यन्त तदा क्षिप्रं निहन्तुं दृढमुष्टि-भिः ॥ ५३॥ वानरैर्हन्यमानस्तु शुको राममथाब्रवीत् ॥ न दूतान् घ्नन्ति राजेन्द्र वानरान्वारय प्रभो ॥ ५४ ॥ रामः श्रुत्वा तदा वाक्यं शुकस्य परिदेवितम् ॥ मा वधिष्टेति रामस्तान्वारयामास वानरान् ॥ ५५ ॥

तदा वानराः वचनं प्रापयन्तं तं क्षिप्रं दृढमुष्टिभिः निहन्तुं ( मू. ). ॥ ५३ ॥ ( पू. ) – ॥ ' राजेन्द्र, प्रभो, दूतान् ( मू. ). ' ॥ ५४ ॥ तदा रामः ( पू. ) वाक्यं, परिदेवितं [च] श्रुत्वा, ॥ ( मू. ) वारयामास. ॥ ५५ ॥

१ पोंचविणाऱ्या. २ लवकर. ३ घट्ट मुठींनीं. ४ मारण्यास. ५ मारतात. ६ निवारण कर. ७ शोकास. ८ नको. ९ मारूं.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

शुक पुन्हां आकाशांत जाऊन सुग्रीवाला विचारूं लागला :– ' राजा! मी आतां जातों, पण रावणाला काय सांगूं, बोल.' ॥ ५६ ॥ सुग्रीव ह्मणाला :– ' - शुका! रावणाला माझा उलट निरोप सांग कीं, - हे अधम राक्षसा! जसा वाली माझा भाऊ तसाच तूं! ह्मणून, त्याच्याप्रमाणेंच, लागतील ते उपाय योजून, मी तुझा वध करणार. - वालीला एकट्यालाच मारिलें पण - तुला पुत्र, सैन्य, वाहनें ह्यांसह यमलोकीं पाठविणार! ॥५७॥ - त्याला ह्मणावें, - रामाची पत्नी घेऊन जाणार कोठें, मला सांग.' इतकें सांगून सुग्रीवानें, - शुकाच्या मनांत कदाचित् ' हीं वानरें एवढा प्रचंड समुद्र उल्लंघून लंकेवर येतात कसचीं आणि काय कसचें! ' अशी शंका आली असेल ती दूर करण्यासाठीं, वानरांकडूनच - त्याला बांधविलें; पण रामाच्या आज्ञेवरून पुन्हां सोडून

पुनरम्बरम[1]ासाद्य[2] शुकः सुग्रीवमब्रवीत् ॥ ब्रूहि राजन्दशग्रीवं किं वक्ष्[3]यामि व्रजा-म्यहम् ॥ ५६ ॥ सुग्रीव उवाच ॥ यथा वाली मम भ्राता तथा त्वं राक्षसाधम ॥ हन्तव्यस्त्वं मया यत्नात्सपुत्रबलवाहनः ॥ ५७ ॥ ब्रूहि मे रामचन्द्रस्य भार्यां ह्रत्वा क्व यास्यसि ॥ ततो रामाज्ञया धृत्वा शुकं बध्वा ऽन्वरक्षयत् ॥ ५८ ॥

शुकः ( पू. ) – ॥ ' ( मू. )? ब्रूहि; अहं व्रजामि. ' ॥५६॥ सु० उ० ' राक्षसाधम, ( मू. ) त्वं यत्नात् हन्तव्यः. ॥ ५७ ॥ ( पू. )? ब्रूहि. ' ॥ ( मू. ) धृत्वा, बध्वा [ च ] अन्वरक्षयत्. ॥ ५८ ॥

१ आकाशांत. २ पोंचून. ३ बोलूं. ४ जातों. ५ रक्षण करिता झाला.


सुग्रीवाचा रावणाला उलट निरोप.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

दिलें. ॥ ५८ ॥ रावणानें शार्दूल नांवाचा दुसरा एक राक्षस, - वानरांचें सैन्य किती आहे तें पाहून येण्या-साठीं, पाठविला होता. - त्यानें तें प्रचंड वानरसैन्य पाहून सर्व वृत्तांत रावणाला, - शुकदैत्य येऊन पोंचण्या - पूर्वींच, कळविला. ॥ ५९ ॥ तो ऐकून रावणाला अपार चिंता उद्भवली :- त्याचें धैर्य खचलें व शौर्य नाहींसें झालें. - तो मोठ्यानें उसासे टाकीत मंदिरांत बसून राहिला. इकडे रामानें, समुद्राकडे पाहून नेत्र-प्रांत लाल केले - व लक्ष्मणाला ह्मटलें : - ॥६०॥ "बा पुण्यपुरुषा लक्ष्मणा ! ह्या समुद्राचें अंतःकरण किती दुष्ट आहे पहा ! मी किनाऱ्यावर आलों असतांही हा दुष्ट माझा सत्कार करीत नाहीं व माझ्या दर्शनाला येत नाहीं ! ॥ ६१ ॥ हा मला मनुष्यच समजत आहे ! - ह्याला वाटत असेल कीं, - राम वानरांकडून

शार्दूलो ऽपि ततः पूर्वं दृष्ट्वा कपिबलं[1] महत्॥यथावत्कथयामास रावणाय स राक्षसः ॥ ५९ ॥ दीर्घचिन्तापरो भूत्वा निःश्वसन्[3]नास मन्दिरे ॥ ततः समुद्रमावेक्ष्य रामो रक्तान्तलोचनः ॥ ६० ॥ पश्य लक्ष्मण दुष्टो ऽसौ वारिधिर्मामुपागतम्[4] ॥ नाभिनन्दति दुष्टात्मा दर्शनार्थं ममानघ[5] ॥ ६१ ॥ जानाति मानुषो ऽयं मे किं करिष्यति वानरैः ॥

ततः सः शार्दूलः अपि राक्षसः ( पू. ) कपिबलं दृष्ट्वा, रावणाय ( मू. ). ॥ ५९ ॥ [ रावणः ] ( पू. ) आस.॥ ( मू. ) रामः [ आह – ] ॥६०॥ " लक्ष्मण, ( पू. ) मां ॥ न अभिनन्दति; अनघ, (मू.) दर्शनार्थं [न आयाति]. ॥ ६१ ॥ [समुद्रः], '(पू.) किं करिष्यति ?' [इति] जानाति. ॥

१ वानरसैन्य. २ पूर्णपणें. ३ श्वास टाकणारा. ४ सामोरा येतो. ५ पापरहित.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

राम समुद्रावर संतापतो.

माझें करणार काय? पण, हे वीरा (लक्ष्मणा)! पहा, आज मी समुद्राला सुकवून टाकतों! ॥ ६२ ॥ मग आपले वानर पायींच चालत जातील. त्यांना उगाच ताप नको!" रामाचे नेत्र क्रोधामुळें लाल झाले होते. त्यानें इतकें भाषण करून धनुष्याची प्रत्यंचा चढविली, ॥ ६३ ॥ भात्यांतून प्रलयकाळच्या अग्नी-सारखा प्रखर तेजोयुक्त बाण काढून धनुष्यावर जोडिला, दोरी ओढिली आणि पुन्हां भाषण केलें:- ॥६४॥ 'सर्व भूतांनीं रामाच्या बाणाचा प्रभाव अवलोकन करावा. मी आतांच ह्या नदीपतीचें-समुद्राचें-भस्म करून टाकितों.' ॥ ६५ ॥ रामानें हे शब्द उच्चारिले, त्या वेळीं पर्वत, उपवनें व महारण्यें ह्यांसह

अद्य पश्य महाबाहो[1] शोषयिष्यामि वारिधिम् ॥६२॥ पादेनैव गमिष्यन्ति वानरा विगतज्वराः[2] ॥ इत्युक्त्वा क्रोधताम्राक्ष[3] आरोपितधनुर्धरः[4] ॥ ६३ ॥ तूणीराद्[5]बाणमादाय[6] कालाग्निसदृशप्रभम्[7] ॥ संधाय चापमाकृष्य रामो वाक्यमथाब्रवीत् ॥ ६४ ॥ पश्यन्तु[8] सर्वभूतानि रामस्य शरविक्रमम्[9] ॥ इदानीं भस्मसात्कुर्यां समुद्रं सरितां[10] पतिम् ॥ ६५ ॥ एवं ब्रुवति रामे तु सशैलवनकानना[11] ॥

महाबाहो, पश्य (मू.) शोषयिष्यामि. ॥ ६२ ॥ विगतज्वराः वानराः (मू.). " ॥ ६३ ॥ रामः (पू.) बाणं आदाय (मू.) वाक्यं अब्रवीत् - ॥ ६४ ॥ (पू.) पश्यन्तु. (मू.) समुद्रं भस्मसात् कुर्यां. ॥ ६५ ॥ रामे तु एवं ब्रुवति [ सति ], (पू.) ॥

१ मोठे बाहु ज्याचे, अशा २ सुकवीन. ३ निष्काळजी. ४ दोरी चढविलेलें धनुष्य धरणारा. ५ भात्यांतून. ६ घेऊन. ७ कालाग्नीसारखी कांति ज्याची, अशा. ८ बाणाच्या प्रतापास. ९ पाहोत. १० नद्यांच्या. ११ पर्वत, उपवनें, वनें ह्यांसह.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पृथ्वी थरथर कांपूं लागली, स्वर्ग कंपायमान झाला, दिशा अंधकारानें भरून गेल्या, ॥६६॥ समुद्र खवळला व भीतीमुळें मर्यादेचें उल्लंघन करून एक योजन पुढें आला; त्याच्या पोटांतील लहानमोठे मत्स्य, सुसरी व मगर तापून घाबरून गेले. ॥ ६७॥ थोड्याच अवकाशांत साक्षात् समुद्र दिव्य रूप धारण करून व आंगावर दिव्य अलंकार घालून स्वतांच्या कांतीनें सर्व दिशांना प्रकाशित करीत - रामाकडे आला. - ॥ ६८ ॥ त्यानें, आपल्या पोटांतील दिव्य रत्नें - रामाला अर्पण करण्यासाठीं - हातीं घेऊन - बरोबर आणिलीं होतीं, तें महामोल उपायन ( नजराणा ) रामाच्या चरणांपुढें ठेविलें. ॥ ६९ ॥ रामाचे नेत्रप्रांत लाल झाले होते.

चचाल वसुंधा[1] [2]द्यौश्च दिशश्च तमसाऽऽवृताः ॥ ६६ ॥ [5]चुक्षुभे सागरो वेलां[6] भया-
द्योजनम[7]त्यगात् ॥ तिमिनक्रझषा मीनाः प्रतप्ताः परितत्रसुः ॥ ६७ ॥ एतस्मिन्न-
न्तरे साक्षात्सागरो दिव्यरूपधृक् ॥ दिव्याभ[9]रणसंपन्नः स्वभा[10]सा भासयन् दिशः
॥ ६८ ॥ स्वान्त[11]स्थदिव्यरत्नानि कराभ्यां परि[13]गृह्य सः ॥ पादयोः पुरतः क्षिप्त्वा
रामस्योपायनं बहु ॥ ६९ ॥ दण्डवत्प्रणिपत्याह रामं रक्तान्तलोचनम् ॥

( मू. ) [3]चचाल; दिशः च [4]तमसा आवृताः [आसन्]. ॥६६॥ सागरः भयात् ( मू. ) [ सन्तः ] परितत्रसुः. ॥ ६७ ॥ ( मू. ) भासयन् [ बभूव ]. ॥६८॥ सः [12]कराभ्यां ( पू. ), ॥ रामस्य ( मू. ) [14]उपायनं [15]क्षिप्त्वा, ॥ ६९ ॥ रक्तान्तलोचनं रामं ( पू. ) – ॥

१ पृथ्वी. २ स्वर्ग. ३ कांपली. ४ अंधकारानें. ५ खवळला. ६ मर्यादेला. ७ उल्लंघून आला. ८ घाबरले. ९ दिव्य अलंकारांनीं युक्त. १० आपल्या कांतीनें. ११ आपल्या पोटांतील दिव्य रत्नें. १२ हातांनीं. १३ घेऊन. १४ नजराणा. १५ ठेवून.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

समुद्र त्याला साष्टांग नमस्कार घालून म्हणाला :– 'हे जगत्पालका त्रैलोक्यरक्षका रामचंद्रा ! माझें रक्षण कर. माझा नाश करूं नको. ॥ ७० ॥ - मी लवकर आलों नाहीं, ह्याबद्दल त्वां मजवर रोष धरूं नये; कारण, - तूंच सर्व जगाची उत्पत्ति करतांना मला उत्पन्न केलेंस त्यावेळीं माझा स्वभाव जड ( सुस्त किंवा अज्ञानी ) करून ठेविला आहेस. देवा ! तूं जो स्वभाव निर्माण करून दिलास तो अन्यथा करणें कोणाच्या बरें स्वाधीन आहे ? ॥ ७१ ॥ - आकाश, वायु, अग्नि, उदक व पृथ्वी हीं - स्थूल पांच भूतें स्वभावतःच जड आहेत. त्यांना त्या स्थितींत तूंच निर्मिलेंस; ह्मणून तीं तुझी आज्ञा मोडीत नाहींत ( तूं दिलेल्या जड स्वभावाला विरुद्ध होईल असें आचरण करीत नाहींत ). ॥ ७२ ॥ रामा ! तामस अहंकारापासून भूतें उत्पन्न

त्राहि त्राहि जगन्नाथ राम त्रैलोक्यरक्षक ॥ ७० ॥ जडोऽहं राम ते स्रष्टुः[1] सृजता निखिलं जगत् ॥ स्वभावमन्यथाकर्तुं[2] कः शक्तो देवनिर्मितम् ॥ ७१ ॥ स्थूलानि पंच भूतानि जडान्येव स्वभावतः ॥ सृष्टानि भवतैतानि त्वदाज्ञां लंघयन्ति न ॥ ७२ ॥ तामसादहमो[3] राम भूतानि प्रभवन्ति हि ॥ कारणानुगमात्तेषां[4] जडत्वं तामसं स्वतः ॥ ७३ ॥

' ( मू. ) राम, त्राहि, त्राहि. ॥ ७० ॥ ( पू. ) सृजता ते अहं जडः सृष्टः. ॥ देवनिर्मितं ( मू. ) ? ॥ ७१ ॥ भवता (पू.) जडानि एव ( मू. ) लंघयन्ति. ॥ ७२ ॥ राम, (मू.) जडत्वं [अस्ति].॥७३॥

१ सृष्टि करणाऱ्या. २ फिरविण्यास. ३अहमः अहंकारापासून. ४ कारणाच्या संबंधामुळें ( कारण आंत शिरल्यामुळें ).



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

होतात. जडत्व ( अचेतनपणा ) हें तमोगुणाचें कार्य होय. - जशी घटाचें कारण मृत्तिका घटाबरोबर असते त्याप्रमाणें - भूतांचें कारण तामस अहंकार भूतांबरोबर भरून राहिलेला आहे; अर्थात त्याचा गुण जडत्व ह्यांच्यामध्यें स्वतःसिद्धच असतो. ॥ ७३ ॥ प्रभो ! तूं वस्तुतः निर्गुण व निराकार आहेस. परंतु जेव्हां लीलेनें स्वतांच्या ठिकाणीं मायेचे गुण स्वीकारितोस, त्या वेळीं तुला वैराज हें नाम प्राप्त होतें. ॥ ७४ ॥ तो विराट्देह त्रिगुणात्मक असतो; त्याच्या सत्वगुणापासून देव झाले; रजोगुणापासून सृष्टिकर्ते ब्रह्मदेवादि झाले; भूतपति रुद्र हा तुझा क्रोध होय. ॥ ७५ ॥ सांप्रत तुझें स्वरूप मायेनें आच्छादिलेलें असून तूं हें मनुष्यरूप घेतलें आहेस. माझी बुद्धि बोलूनचालून जड; मी अज्ञानी व मूर्ख. तेव्हां मला तुझ्या निर्गुण रूपाचें ज्ञान व्हावें कसें ? ॥ ७६ ॥ हे समर्था देवाधिदेवा! पशूंना वळवून रस्त्यावर आणावयाचें असेल

निर्गुणस्त्वं निराकारो यदा मायागुणान्प्रभो ॥ लीलयांगीकरोषि त्वं तदा वैराजनामवान्[1] ॥ ७४ ॥ गुणात्मनो विराजश्च सत्त्वाद्देवा बभूविरे[2] ॥ रजोगुणात्प्रजेशाद्या[3] मन्योर्[4]भूतपतिस्तव ॥ ७५ ॥ त्वामहं मायया छन्नं[5] लीलया मानुषाकृतिम् ॥ जडबुद्धिर्जडो मूर्खः कथं जानामि निर्गुणम् ॥ ७६ ॥ दण्ड एव हि मूर्खाणां सन्मार्गप्रापकः प्रभो ॥ भूतानाममरश्रेष्ठ पशूनां लगुडो[6] यथा ॥ ७७ ॥

प्रभो, निर्गुणः निराकारः अपि ( मू. ) त्वं वैराजनामवान् [ भवसि]. ॥ ७४ ॥ (पू.). तव ॥ (मू.). ॥ ७५ ॥ ( उ. ) अहं ( पू. ) निर्गुणं त्वां कथं जानामि ? ॥ ७६ ॥ अमरश्रेष्ठ प्रभो, यथा ( उ. ) [ तथा ] मूर्खाणां भूतानां ( पू. ). ॥ ७७ ॥

१ वैराज हें नांव ज्याला आहे, असा. २ झाले. ३ प्रजापति वगैरे. ४ क्रोधापासून. ५ आच्छादिलेल्या. ६ सोटा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तर काठीचा उपयोग करावा लागतो, त्याचप्रमाणेंच मूर्खांना सन्मार्गी लावण्यास उत्तम साधन, शासन करणें, हेंच होय. ॥ ७७ ॥ हे भक्तवत्सला ईश्वरा! तूं शरणागतांचें हित करितोस ह्मणून मी तुला शरण आलों आहें. मला अभय दे. मी तुला लंकेंत जाण्यासाठीं मार्ग देतों.' ॥ ७८ ॥ राम ह्मणाला :– 'सागरा! हा महाबाण - एकदां धनुष्याला लागला कीं - कांहीं तरी कार्य केल्याशिवाय परत व्हावयाचा नाहीं! ह्याला कोणत्या प्रदेशावर सोडूं सांग. माझा बाण ज्यावर पडेल, त्याचा नाश करण्यास कधीं चुकावयाचा नाहीं. ह्याला कांहींतरी लक्ष्य दाखवून दे.' ॥ ७९ ॥ तो महातेजस्वी महासागर रामाचें भाषण ऐकून व हातांतील महाबाण पाहून त्याला ह्मणाला :– ॥ ८० ॥ 'रामा! उत्तरेकडच्या प्रदेशांत द्रुमकुल्य नांवानें प्रसिद्ध असा एक भाग आहे; तेथें पुष्कळसे दुष्ट पापी लोक राहतात,

शरणं ते व्रजामीश शरण्यं भक्तवत्सल ॥ अभयं देहि मे राम लंकामार्गं ददामि ते ॥ ७८ ॥ राम उवाच । अमोघो ऽयं महाबाणः कस्मिन् देशे निपात्यताम् ॥ लक्ष्यं दर्शय मे शीघ्रं बाणस्यामोघपातिनः ॥७९॥ रामस्य वचनं श्रुत्वा करे दृष्ट्वा महाशरम् ॥ महोदधिर्महातेजा राघवं वाक्यमब्रवीत् ॥८०॥ रामोत्तरप्रदेशे तु द्रुमकुल्य इति श्रुतः ॥ प्रदेशस्तत्र बहवः पापात्मानो दिवानिशम् ॥ ८१ ॥

भक्तवत्सल ईश, शरण्यं ते (पू.). ॥ राम, मे अभयं देहि. ते (मू.).' ॥७८॥ रा० उ० – '(मू.) बाणस्य लक्ष्यं शीघ्रं दर्शय.' ॥७९॥ महातेजाः महोदधिः (पू.) दृष्ट्वा (मू.) – ॥८०॥ '(मू.) ॥८१॥

१ निष्फल न होणारा. २ पाडावा. ३ व्यर्थ न पडणाऱ्या. ४ नेम मारण्याचें ठिकाण. ५ दाखव. ६ मोठा तेजस्वी. ७महासागर.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

व रात्रंदिवस ॥ ८१ ॥ मला फार पीडा देतात. रघुवीरा! हा तुझा बाण त्या प्रदेशावर पडूं दे.' रामानें बाण सोडिला. तो क्षणमात्रांत त्या भिल्लसमुदायाला ॥ ८२ ॥ मारून पुन्हां येऊन पूर्वीप्रमाणें भात्यांत राहिला. नंतर समुद्र नम्र होऊन रघुवीराला म्हणालाः– ॥ ८३ ॥ "रामचंद्रा! विश्वकर्म्याचा पुत्र जो नल, त्यानें ह्या माझ्या उदकावर सेतु बांधावा. तो वानर चतुर असून हें कार्य करण्यास समर्थ आहे; कारण, त्याला - ब्रह्मदेवाकडून 'तुला सेतु बांधतां येईल' असा - वर मिळाला आहे. ॥ ८४ ॥ सेतु बांधलास म्हणजे - लोकांना तुझी कीर्ति कळून येईल; - तुझ्या कीर्तीचें वर्णन करणाऱ्या - सर्व लोकांचीं

बाधन्ते[1] मां रघुश्रेष्ठ तत्र ते पात्यतां शरः ॥ रामेण सृष्टो[3] बाणस्तु क्षणादाभीरमं[4]-ण्डलम् ॥ ८२ ॥ हत्वा पुनः समागत्य तूणीरे[5] पूर्ववत्स्थितः ॥ ततोऽब्रवीद्रघुश्रेष्ठं सागरो विनयान्वितः ॥ ८३ ॥ नलः सेतुं करोत्वस्मिन् जले मे विश्वकर्मणः ॥ सुतो धीमान् समर्थोऽस्मिन्कार्ये लब्धवरो[6] हरिः ॥ ८४ ॥ कीर्तिं जानन्तु ते लोकाः सर्वलोकमलापहाम् ॥ इत्युक्त्वा राघवं नत्वा ययौ सिन्धुरदृश्यताम् ॥ ८५ ॥

मां (पू.) पासतां.[2] ' ॥ (मू.) ॥ ८२ ॥ (मू.) [सन्] रघुश्रेष्ठं अब्रवीत् – ॥ ८३ ॥ 'अस्मिन् मे जले (मू.) अस्मिन् कार्ये समर्थः [अस्ति]. ॥ ८४ ॥ (पू.) ते कीर्तिं जानन्तु.' ॥ सिन्धुः (मू.) ययौ. ॥ ८५ ॥

---

१ पीडा देतात. २ वर टाकावा. ३ सोडिलेला. ४ भिल्लांच्या समूहाला. ५ भात्यांत. ६ मिळाला वर (ब्रह्मदेवापासून) ज्याला, असा. ७ जाणोत. ८ समुद्र.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पातकें नष्ट होतात. " इतकें सांगून व रामाला वंदन करून समुद्र अदृश्य झाला. ॥ ८५ ॥ नंतर, सुग्रीव आणि लक्ष्मण ह्या उभयतांसह रामानें नलाला वानरांच्या साह्यानें लवकर सेतु बांधण्याची आज्ञा दिली. ॥८६॥ तेव्हां नळालाही पराकाष्ठेचा आनंद झाला. तेथें मोठमोठाले अनेक वानरसेनापति जमले होते; त्यांचीं शरीरें मोठाल्या पर्वतांसारखीं प्रचंड होतीं. त्यांच्या साह्यानें नलानें पर्वत व वृक्ष ह्यांच्या योगें शंभर योजनें लांब, बळकट व विस्तीर्ण असा सेतु बांधिला. ॥ ८७ ॥ इति युद्धकाण्डे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥

सेतु बांधण्यास आरंभ करण्यापूर्वी रामानें तेथें 'रामेश्वर' नांवाच्या शिवलिंगाची स्थापना करून पूजा केली, व लोकांच्या हितासाठीं असें सांगून ठेविलें ( प्रसिद्ध केलें ) कीं, ॥ १ ॥ जो कोणी पुरुष रामेश्वर

ततो रामस्तु सुग्रीवलक्ष्मणाभ्यां समन्वितः ॥ नलमाज्ञापयच्छीघ्रं वानरैः सेतुबन्धने ॥ ८६ ॥ ततोऽतिहृष्टः प्लवगेन्द्रयूथपैर्महानगेन्द्रप्रतिमैर्युतो नलः ॥ बबन्ध सेतुं[1] शतयोजनायतं सुविस्तृतं पर्वतपादपैर्दृढम् ॥ ८७ ॥ इति युद्धकाण्डे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥ सेतुमारभमाणस्तु[2] तत्र रामेश्वरं शिवम् ॥ संस्थाप्य[3] पूजयित्वाऽऽह रामो लोकहिताय वै ॥ १ ॥ प्रणमेत्सेतुबन्धं यो दृष्ट्वा रामेश्वरं शिवम् ॥

( पू. ) रामः तु ॥ ( मू. ) नलं आज्ञापयत्. ॥८६॥ ततः अतिहृष्टः नलः महानगेन्द्रप्रतिमैः ( मू. ) सेतुं बबन्ध. ॥ ८७ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणान्वये युद्धकाण्डे तृतीयः सर्गः ॥ ३ ॥ सेतुं आरभमाणः तु रामः लोकहिताय (मू.) – ॥ १ ॥ ( पू. ) दृष्ट्वा सेतुबन्धं प्रणमेत्, ॥

१ पर्वतांनीं व वृक्षांनीं. २ आरंभणारा. ३ स्थापना करून.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

लिंगाचें दर्शन घेऊन सेतुबंधास वंदन करील, त्याच्यावर मी अनुग्रह करीन, व तो ब्रह्महत्यादि पापांपासून मुक्त होईल; ॥ २ ॥ मनुष्यानें सेतुबंधीं स्नान करून रामेश्वर लिंगाचें दर्शन घ्यावें, तेथें - ' काशीस जाऊन गंगा आणून रामेश्वरावर घालितों ' असा - संकल्प करावा, काशीस जावें, ॥ ३ ॥ गंगा आणून रामेश्वरावर अभिषेक करावा आणि ज्यांत गंगा भरून आणिली तो पात्र वगैरे ( किंवा कावड ) सर्व संभार समुद्रांत टाकावा; म्हणजे त्याला ब्रह्मप्राप्ति होईल, ह्यांत संशय नाहीं. ॥ ४ ॥ नलानें पहिल्या दिवशीं चवदा योजनें सेतु बांधिला, दुसरे दिवशीं वीस योजनें, ॥ ५ ॥ तिसरे दिवशीं एकवीस योजनें, चवथे

ब्रह्महत्यादिपापेभ्यो मुच्यते मदनुग्रहात् ॥ २ ॥ सेतुबन्धे नरः स्नात्वा[1] दृष्ट्वा रामेश्वरं हरम् ॥ संकल्पनियतो[2] भूत्वा गत्वा वाराणसीं[3] नरः ॥ ३ ॥ आनीय गंगासलिलं[4] रामेशमभिषिच्य[5] च॥समुद्रे क्षिप्त[6]तद्भारो ब्रह्म प्राप्नोत्यसंशयम् ॥४॥ कृतानि प्रथमेनाह्ना[7] योजनानि चतुर्दश ॥ द्वितीयेन तथा चाह्ना योजनानि तु विंशतिः[8] ॥५ ॥ तृतीयेन तथा चाह्ना योजनान्येकविंशतिः ॥

[ सः ] मदनुग्रहात् (मू.). ॥ २ ॥ नरः ( पू. ) दृष्ट्वा, ॥ (मू.) गत्वा, नरः ॥३॥ गङ्गासलिलं (मू ) [ सन् ] असंशयं [ यथा तथा ] ब्रह्म प्राप्नोति. ॥ ४ ॥ ( पू. ) योजनानि कृतानि. ॥ ५ ॥ तथा ( पू. ) योजनानि. ॥

१ स्नान करून. २ संकल्पांत दक्ष. ३ काशीस. ४ गंगेचें उदक. ५ स्नान घालून. ६ टाकिला तो भार ज्यानें असा. ७ दिवसानें. ८ वीस.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

राम सैन्यासह लंकेस पोंचला.

दिवशीं बावीस योजनें असें ऐकतों, ॥ ६ ॥ व पांचवे दिवशीं तेवीस योजनें. अशा रीतीनें त्या श्रेष्ठ वानरानें—नळानें—समुद्रावर येथून तेथून सारखा सेतु बांधून तयार केला. ॥ ७ ॥ त्या सेतूवरूनच वानर भराभर चालत शंभर योजनें समुद्राच्या पार निघून गेले. वानरसेना इतकी मोठी होती कीं, तिची गणना करतां येत नसे. त्या वानरवीरांनीं सुवेलपर्वताभोंवतीं वेढा दिला. ॥ ८ ॥ राम मारुतीवर व लक्ष्मण अंगदावर बसून गेले. लंकानगरीचा देखावा पाहण्यासाठीं रामचंद्र त्या उंच पर्वतावर चढला. ॥ ९ ॥ लंकानगरी विस्तीर्ण होती; आंत जिकडे तिकडे चित्र विचित्र ध्वज फडकत होते, इमारती एकीशीं एक लागलेल्या

चतुर्थेन तथाचाह्ना द्वाविंशतिरिति श्रुतम् ॥६॥ पंचमेन त्रयोविंशद्योजनानि समंततः ॥ बबन्ध सागरे सेतुं नलो वानरसत्तमः ॥ ७ ॥ तेनैव जग्मुः कपयो योजनानां शतं द्रुतम् ॥ असंख्याताः सुवेलाद्रिं रुरुधुः प्लवगोत्तमाः ॥ ८ ॥ आरुह्य मारुतिं रामो लक्ष्मणो ऽप्यंगदं तथा ॥ दिदृक्षू राघवो लंकामारुरोहाचलं महत् ॥ ९ ॥ दृष्ट्वा लंकां सुविस्तीर्णां नानाचित्रध्वजाकुलाम् ॥

तथा ( मू. ). ॥ ६ ॥ ( पू. ) ॥ [ एवं ] वानरसत्तमः नलः ( मू. ) बबन्ध. ॥ ७ ॥ कपयः (पू.) जग्मुः. ॥ (मू.) सुवेलाद्रिं रुरुधुः. ॥८॥ रामः मारुतिं, तथा ( पू. ) आरुह्य [ जगाम ]. ॥ लङ्कां ( मू. )अचलं आरुरोह. ॥ ९ ॥ [ रामः ] ( १० मू. ) ॥



१ बात्रीस. २ तेवीस. ३ सुवेलपर्वतास. ४ वेढिते झाले. ५ पाहूं इच्छिणारा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

असून त्यांवर कुशल नकशीकाम केलें होतें; भोंवतालचे कोट व दरवाजे सोन्याच्या विटांनीं बांधलेले होते; ॥ १० ॥ रक्षणासाठीं सभोंवार खंदक खणलेले असून जागोजाग शस्त्रें सिद्ध ठेविलीं होतीं; मधून मधून पाऊलवाटाही ठेविलेल्या असत; अशा रचनेमुळें तें नगर सुंदर दिसत असे. ह्यावेळीं राजवाड्याच्या विस्तीर्णशा उंच गच्चीवर रावण बसला होता. त्याला दहा मुखें होतीं. ॥ ११ ॥ त्याच्या भोंवतीं पराक्रमी प्रधानमंडळी बसली होती. मस्तकांवर दहा मुकुट असल्यामुळें रावण उज्ज्वल दिसे. बाकी त्याच्या शरीराचा वर्ण ह्मटला तर, हें एक काजळाच्या पर्वताचें शिखरच असावें, असें वाटण्याजोगा होता; ह्मणजे त्याची अंगकांति कृष्णवर्ण मेघासारखी होती. ॥ १२ ॥ त्याच्या मस्तकावर पांढरीं शुभ्र अनेक छत्रें धरिलीं होतीं; त्या छत्रांचे दांडे रत्नांचे असत. ह्या राजचिन्हांच्या योगें त्यानें आपल्याला शोभा आणिली होती. तो

चित्रप्रासादसंबाधां स्वर्णप्राकारतोरणाम् ॥१०॥ परिखाभिः शतघ्नीभिः संक्रमैश्च
विराजिताम्॥प्रासादोपरि विस्तीर्णप्रदेशे दशकन्धरः॥११॥ मन्त्रिभिः सहितो वीरैः
किरीटदशको[1]ज्ज्वलः॥नीलाद्रिशिखराकारः[2] कालमेघसमप्रभः[3]॥१२॥ रत्नदण्डैः[4]
सितच्छत्रैरनेकैः[5] परिशोभितः॥ एतस्मिन्नन्तरे बद्धो मुक्तो रामेण वै शुकः॥१३॥

( १० मू. ११ पू. ) लङ्कां दृष्ट्वा [ तत्र स्थितः ]. ॥ ( ११ उ. ) वीरैः ( १२ मू. ) दशकन्धरः ॥ १० ॥ ११ ॥ १२ ॥ अनेकैः ( पू. ) [ आसीत् ]. ॥( मू. ) मुक्तः शुकः ॥ १३ ॥

---

१ दहा मुकुटांनीं तेजःपुंज दिसणारा. २ निळ्या मण्यांच्या पर्वताच्या शिखरासारखा आकार ज्याचा, असा. ३ काळ्या मेघासारखी कांति ज्याची असा. ४ रत्नांचे दांडे ज्यांना, अशा. ५ पांढऱ्या छत्रांनीं.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

शुक रावणाकडे आला.

अशा स्थितींत बसला होता इतक्यांत, वानरांनीं बांधिलें असतां रामानें ज्याला सोडून दिलें, तो शुक ॥ १३ ॥ वानरांच्या हातचा बराच मार खाऊन कसा बसा रावणाकडे येऊन पोंचला. - त्याला पाहून-रावण हांसत हांसतच ह्मणाला :– ‘ कायरे ! शत्रूंनीं पाठ मऊ केली वाटतें ! ’ ॥ १४ ॥ रावणाचें भाषण ऐकून शुक सांगूं लागला :– ‘ महाराज ! मी समुद्राच्या उत्तर तीरावर जाऊन तुह्मी सांगितलेला निरोप सुग्रीवाला जशाचा तसा सांगितला. इतक्यांत वानर उड्या मारून येऊन लागलेच मला धरून घेऊन गेले. ॥ १५ ॥ व त्यांनीं बुदके मारण्याचा आणि नखांनीं व दांतांनीं माझ्या आंगाचे तुकडे तोडण्याचा सपाटा चालविला. मी ‘ रामा ! मला सोडव रे सोडव ! ’ असा आक्रोश करूं लागलों; तेव्हां रघुवीरानें

वानरैस्ताडितः सम्यक् दशाननमुपागतः ॥ प्रहसन् रावणः प्राह पीडितः किं परैः शुक ॥ १४ ॥ रावणस्य वचः श्रुत्वा शुको वचनमब्रवीत्[१]॥सागरस्योत्तरे तीरे ऽब्रुवन्ते वचनं यथा ॥ तत उत्प्लुत्य[२] कपयो गृहीत्वा मां क्षणात्ततः ॥ १५ ॥ मुष्टिभिर्नखदन्तैश्च हन्तुं लोप्तुं[३] प्रचक्रमुः[४]॥ततो मां राम रक्षेति क्रोशन्तं[५] रघुपुंगवः॥ १६॥

वानरैः सम्यक् ताडितः [ सन ] ( पू. ). ॥ रावणः ( मू. ) – ‘ शुक, परैः पीडितः किं ? ’ ॥१४॥ शुकः (पू.) – ॥ “(पू.) [सुग्रीवं प्रति], यथा ते वचनं, [ तथा] अब्रुवं ( मू. ) उत्प्लुत्य, मां क्षणात् गृहीत्वा, ततः ॥ १५ ॥ ( पू. ) [ च ] प्रचक्रमुः. ॥ ततः रघुपुङ्गवः ( मू. )मां ॥ १६ ॥

१ बोल्लों. २ उडी मारून. ३ तोडण्यास. ४ आरंभ करिते झाले. ५ ओरडणाऱ्या.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

- वानरांना - ॥ १६ ॥ ‘ ह्याला सोडून द्या ’ असें सांगितलें. वानरवीरांनीं मला सोडिलें. तें वानरांचें सैन्य
पाहून मला फारच भीति वाटली. मी लागलाच इकडे निघून आलों. ॥ १७ ॥ राक्षसांचा सेनासमुद्र आणि
वानरवीरांचें सैन्य ह्यांची एकी होणें देवदैत्यांचें सख्य जमवून आणण्याप्रमाणें दुर्घट होय. ॥ १८ ॥ हे
पहा वानर एकामागून एक नगराच्या कोटाजवळ येऊं लागले. आतां लवकर दोहोंपैकीं एक काय ती व्यवस्था
कर – रामाला सीता परत नेऊन दे; किंवा हे समर्था! सत्वर युद्धास तरी सिद्ध हो. ॥ १९ ॥ राम मला
ह्मणाला :– ‘ शुका! रावणाला माझा निरोप सांग कीं, ज्या शक्तीच्या भरंवशावर तूं माझ्या सीतेला चोरून

विसृ[1]ज्यतामिति प्राह विसृष्टो ऽहं कपीश्वरैः॥ततो ऽहमागतो भीत्या दृष्ट्वा तद्वा-
नरं बलम् ॥१७॥ राक्षसानां बलौघस्य वानरेन्द्रबलस्य च ॥ नैतयोर्विद्यते [2]सन्धि-
र्देवदानवयोरिव ॥ १८ ॥ पुरप्राकार[3]मायान्ति क्षिप्रमेकतरं[4] कुरु ॥ सीतां वा ऽस्मै
प्र[5]यच्छाशु युद्धं वा दीयतां[6] प्रभो ॥ १९ ॥ मामाह रामस्त्वं ब्रूहि रावणं मद्वचः
शुक ॥ यद्बलं च समाश्रित्य सीतां मे ह्रतवानसि ॥ २० ॥

( पू. ). [ ततः ] कपीश्वरैः अहं विसृष्टः.॥ ( मू. ) दृष्ट्वा भीत्या आगतः. ॥१७॥ ( मू. ) न विद्यते.
॥ १८ ॥ प्रभो, [ वानराः ] ( मू. ). ॥ १९ ॥ रामः मां आह – ‘ शुक, ( पू. ) रावणं ब्रूहि. ॥
( मू. ) सीतां हृतवान् असि, ॥ २० ॥

१ सोडावा. २ तह. ३ नगराच्या कोटावर. ४ दोहोंपैकीं एक. ५ दे. ६ द्यावें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

नेलेंस, ॥ २० ॥ ती आतां दाखव; आपल्या साह्याला सैन्य बांधवजन पाहिजेत तितके खुशाल घे; उद्यां सकाळीं कोट व वेशी ह्यांसह लंकानगरीचा ॥ २१ ॥ आणि राक्षसांच्या सैन्याचा मी बाणांच्या योगें विध्वंस उडवणार; मी भयंकर कोप सोडीन; रावणा! तूं अवसान धरून ऐस.' ॥ २२ ॥ इतकें बोलून कमलनयन राम स्वस्थ बसला. रावणा! तिकडे चौघे वीर पुरुष एकत्र झाले आहेत! ॥२३॥ हे बलाढ्यपुरुषा! श्रीराम, लक्ष्मण, सुग्रीव आणि बिभीषण हे चौघेजणच लंकेचीं पाळेंमुळें खणून तिचें भस्म करण्यास समर्थ आहेस! दुसरे वानर एकीकडेच राहूं दे. रामाचें जितकें कांहीं बल व स्वरूप माझ्या दृष्टीस पडलें आहे आणि त्याचीं शस्त्रें जीं कांहीं मी पाहिलीं आहेत - तेवढ्यांवरून माझ्या मनाचा निश्चय

तद्दर्शय यथाकामं ससैन्यः सहबान्धवः॥श्वः[१] काले नगरीं लंकां सप्राकारां सतोरणाम् ॥२१॥ राक्षसं च बलं पश्य शरैर्विध्वंसितं मया ॥ घोररोषमहं मोक्ष्ये[२] बलं धारय रावण ॥ २२ ॥ इत्युक्त्वोपरराम[३]ाथ रामः कमललोचनः ॥ एकस्थानगता[४] यत्र चत्वारः पुरुषर्षभाः ॥ २३ ॥ श्रीरामो लक्ष्मणश्चैव सुग्रीवश्च विभीषणः ॥ एत एव समर्थास्ते लंकां नाशयितुं प्रभो ॥ २४ ॥

( पू. ) [ त्वं ] तत् यथाकामं दर्शय, ॥ (मू.) नगरीं लङ्कां, ॥२१॥ ( पू. ) शरैः विध्वंसितं पश्य. ॥ रावण, अहं ( मू. ). ' ॥ २२ ॥ अथ कमललोचनः रामः ( पू. ).॥ यत्र ( मू. ) ॥ २३ ॥ प्रभो, ( पू. ) च ॥ ते ( मू. ) समर्थाः. ॥ २४ ॥

१ उद्यां. २ सोडीन. ३ उपरराम उगा राहिला. ४ एके ठिकाणीं जमलेले.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

झाला आहे कीं, - ॥ २५ ॥ एकटा राम सगळ्या नगराचा नाश करील ! बाकीच्या तिघांनीं स्वस्थ बसावें ( त्यांची गरज नाहीं ). वानरांची अगणित सेना जिकडे तिकडे भरून राहिली आहे, पहा :- ॥ २६ ॥ तींतील पर्वतासारखे धिप्पाड वानर गर्जना करीत आहेत, अवलोकन कर. त्यांची गणना करणें तर शक्य नाहींच; परंतु मुख्य मुख्य मंडळीचीं नांवें मी सांगतों :- ॥ २७ ॥ हा एक वानर लंकेकडे तोंड करून गर्जना करीत उभा आहे, ह्याच्या सभोंवतीं शतसहस्र सेनापति उभे राहिलेले दिसतात, - हा सुग्रीव होय. - ॥ २८ ॥ हा दुसरा इकडे एक पर्वताशिखरासारखा - वानर दिसत आहे, - ह्याची अंगकांति कमलतंतू-

उत्पाट्य[1] भस्मीकरणे सर्वे तिष्ठन्तु वानराः ॥ तस्य यादृग् बलं दृष्टं रूपं प्रहरणा[2]नि च ॥ २५ ॥ वधिष्यति पुरं सर्वमेकस्तिष्ठन्तु ते त्रयः ॥ पश्य वानरसेनां तामसंख्यातां प्रपूरिताम् ॥ २६ ॥ गर्जन्ति वानरास्तत्र पश्य पर्वतसन्निभाः ॥ न शक्यास्ते गणयितुं प्राधान्येन ब्रवीमि ते ॥ २७ ॥ एष यो ऽभिमुखो लंकां नर्दं[3]स्तिष्ठति वानरः ॥ यूथ[4]पानां सहस्राणां शतेन परिवारितः ॥२८॥सुग्रीवसेनाधिपतिर्नीलो नामाग्निनन्दनः ॥ एष पर्वतशृंगाभः पद्मकिञ्जल्क[5]सन्निभः ॥ २९ ॥

(बा. पू. ) तिष्ठन्तु. ॥ ( मू. ) [दृष्टानि], ॥२५॥ ते त्रयः तिष्ठन्तु. एकः सर्वं पुरं ( पू. ). ॥ ( मू. ) वानरसेनां पश्य. ॥ २६ ॥ ( पू. ) वानराः गर्जन्ति. ॥ ते गणयितुं ( मू. ) ब्रवीमि. ॥ २७ ॥ एषः यः लङ्कां ( मू. ) वानरः तिष्ठति, [ सः सुग्रीवः. ] ॥ २८ ॥ ( मू. ). ॥ २९ ॥

१ उपटून. २ आयुधें. ३ गर्जना करणारा. ४ सेनेच्या भागांचे अधिपति. ५ कमळाच्या केशरासारखा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

प्रमाणें आहे, हा सुग्रीवाचा सेनापति अग्नीचा पुत्र नील होय. ॥ २९ ॥ हा ह्या बाजूला मोठ्या त्वेषानें वारंवार शेंपूट आपटीत उभा आहे, हा वालीचा पुत्र अतुलपराक्रमी युवराज अंगद. ॥ ३० ॥ ज्यानें रामाच्या अत्यंत प्रिय जानकीचा शोध लाविला व तुझ्या पुत्राचा वध केला, तो प्रसिद्ध मारुति हा इकडे आहे पहा. ॥ ३१ ॥ ज्याची कांति रुप्यासारखी आहे व जो आतांच सुग्रीवाकडे येऊन लागलाच परत जात आहे, त्या ह्या वानराचें नांव 'श्वेत' होय. ह्याची बुद्धि व शक्ति अद्भुत आहे. ॥ ३२ ॥ दुसरा हा इकडे पाहत आहे कीं नाहीं, ह्या वानराचें नांव रंभ. ह्याचें शरीर जसें सिंहासारखें दिसतें तसाच पराक्रम अतुल व बुद्धिही विलक्षण आहे. हा एकटाच लंकेचा नाश करूं शकेल! ॥ ३३ ॥

स्फोटयत्यभिसंरब्धो लांगूलं च पुनःपुनः ॥ युवराजोंगदो नाम वालिपुत्रोऽतिवीर्यवान् ॥ ३० ॥ येन दृष्टा जनकजा रामस्यातीव वल्लभा ॥ हनूमानेष विख्यातो हतो येन तवात्मजः ॥ ३१ ॥ श्वेतो रजतसंकाशो महाबुद्धिपराक्रमः ॥ तूर्णं सुग्रीवमागम्य पुनर्गच्छति वानरः ॥ ३२ ॥ यस्त्वेष सिंहसंकाशः पश्यत्यतुलविक्रमः ॥ रम्भो नाम महासत्त्वो लंकां नाशयितुं क्षमः ॥ ३३ ॥

( मू. ) वालिपुत्रः लाङ्गूलं पुनः पुनः स्फोटयति. ॥ ३० ॥ (पू.) जनकजा दृष्टा, ॥ एषः हनूमान [ इति ] ( मू. ) हतः. ॥ ३१ ॥ ( पू. ) [ यः ] वानरः ( मू. ) [ सः ] श्वेतः [ नाम ]. ॥३२॥ ( पू. ) पश्यति, ॥ [ सः ] रम्भः नाम महासत्त्वः [ वानरः ] ( मू. ). ॥ ३३ ॥

१ शेंपूट. २ आपटतो. ३ पांढरा. ४ रुप्यासारखा. ५ जलद. ६ सिंहासारखा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

राजाधिराजा ! हा एक वानर लंकेकडे जसा कांहीं जाळण्याच्या इच्छेनेंच पाहत आहे हा, ह्याचें नांव शरभ. हा एक कोटि वानरांच्या सेनानायकांचा नायक आहे. ॥ ३४ ॥ तसेच महापराक्रमी पनस, मैंद, द्विविद, ज्यानें सेतु बांधिला तो विश्वकर्म्याचा पुत्र हा नल–असे दुसरेही पुष्कळ आहेत. ॥३५॥ रावणा ! वानरांचें गुणवर्णन किंवा गणती तरी करण्याचें सामर्थ्य आहे कोणाला ? सगळेच शूर आहेत, सर्वांचीं शरीरें प्रचंड आहेत, व प्रत्येकाला युद्धाची इच्छा आहे. ॥ ३६ ॥ हे सगळेजण राक्षससमूहासह लंकेचें नुसतें पीठ करून टाकितील, - ह्यांत संशय नाहीं. - ह्या सैन्यांतील एक एका वीराच्या हाताखालीं

**एष पश्यति वै लंकां दिधक्षन्निव वानरः ॥ शरभो नाम राजेन्द्र कोटियूथपनायकः ॥ ३४ ॥ पनसश्च महावीर्यो मैन्दश्च द्विविदस्तथा ॥ नलश्च सेतुकर्ताऽसौ विश्वकर्मसुतो बली ॥ ३५ ॥ वानराणां वर्णने वा संख्याने वा क ईश्वरः ॥ शूराः सर्वे महाकायाः सर्वे युद्धाभिकांक्षिणः ॥ ३६ ॥ शक्ताः सर्वे चूर्णयितुं लंकां रक्षोगणैः सह ॥ एतेषां बलसंख्यानं प्रत्येकं वच्मि ते शृणु ॥ ३७ ॥**

राजेन्द्र, [ यः ] एषः वानरः ( पू. ) पश्यति, ॥ [ सः ] ( मू. ). ॥३४॥ (मू.) नलः च [अस्ति]. ॥ ३५ ॥ ( पू. ) ? ॥ सर्वे (मू.). ॥३६॥ (पू.) लङ्कां चूर्णयितुं शक्ताः. ॥ (मू ) वच्मि; शृणु– ॥३७॥

---

१ जाळूं इच्छिणारा. २ सांगतों.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

राम ईश्वर;
सीता माया.

किती वानर आहेत, ती संख्या सांगतों ऐक. ॥ ३७ ॥ नील, अंगद, हनुमान्, श्वेत, शरभ, पनस, मैंद, रंभ, आणि द्विविद - ह्या प्रत्येकाच्या हाताखालीं एकवीस सहस्र कोटि, शेंकडों शंख (संख्येचें एक स्थान ) तसे शेंकडों अर्बुद इतकें सैन्य आहे. ॥ ३८ ॥ सुग्रीवाच्या सचिवांचें बल मी तुला सांगितलें. रावणा! इतरांच्या शक्तींचें वर्णन करायाचें ह्मणशील तर मला सामर्थ्य नाहीं! ॥ ३९ ॥ राम कांहीं मनुष्य नव्हे, तर साक्षात् परमात्मा आदिनारायण होय. सीता ही प्रत्यक्ष जगाचें कारण व जगत्स्वरूपी आदिमाया आहे. ॥ ४० ॥ त्यांच्यापासूनच स्थावरजंगमात्मक जग उत्पन्न झालें. ह्यावरून राम आणि सीता हीं चराचर जगाचीं मातापितरें होत. हे पृथ्वीपालका! त्यांच्याशीं वैर करणारा प्राणी

एषां कोटिसहस्राणि नव पंच च सप्त च॥ तथा शंखसहस्राणि तथार्बुदशतानि च ॥ ३८ ॥ सुग्रीवसचिवानां ते बलमेतत्प्रकीर्तितम् ॥ अन्येषां तु बलं नाहं वक्तुं शक्तो ऽस्मि रावण ॥ ३९ ॥ रामो न मानुषः साक्षादादिनारायणः परः ॥ सीता साक्षाज्जगद्धेतुश्चिच्छक्तिर्जगदात्मिका ॥ ४० ॥ ताभ्यामेव समुत्पन्नं जगत्स्थावरजंगमम् ॥ तस्माद्रामश्च सीता च जगतस्तस्थुषश्च तौ ॥ ४१ ॥

( पू. ) कोटिसहस्राणि, ॥ ( मू. ). ॥ ३८ ॥ ते एतत् ( पू. ). ॥ रावण, अहं ( मू. ) शक्तः न अस्मि. ॥ ३९ ॥ ( पू. ) आदिनारायणः. ॥ ( मू. ) चिच्छक्तिः. ॥४०॥ ( पू. ) जगत् समुत्पन्नं. ॥ ( मू. )जगतः, तस्थुषः च ॥ ४१ ॥

१ जंगम. २ स्थावर.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

जिवंत राहील कसा ? तुला ज्ञान नाहीं, ह्मणूनच तूं, जगाची माता जी जानकी, तिला इकडे घेऊन आलास. ॥ ४२ ॥ अरे ! हा संसार क्षणांत नष्ट होणारा, आणि शरीर तरी क्षणामध्यें नाहींसें होणारेंच; राजा ! हा देह पांच भूतांचा गोळा असून चोवीस तत्वांच्या योगें बनलेला आहे; ॥ ४३ ॥ ह्यांत मळ, मांस, हाडें इत्यादि दुर्गंधी पदार्थ भरलेले आहेत; हा अहंकाराचें तर केवळ माहेरघर होय; अशा जडस्वरूपी देहाची त्वां — चेतन आत्म्यानें — आस्था काय ह्मणून बाळगावी ? ॥ ४४ ॥ ज्याच्यासाठीं तूं ब्रह्महत्यादि घोर पातकें केलींस, तो भोग भोगणारा देह तर येथें पडणार ( तुझ्या बरोबर नित्य राहणार नाहीं ) ! ॥ ४५ ॥ सुखप्राप्तीचें कारण पुण्य, आणि दुःखप्राप्तीचें कारण पाप होय. तीं दोन्ही मात्र जीवाबरोबर येतात; व त्यां-

पितरौ पृथिवीपाल तयोर्वैरी कथं भवेत् ॥ अजानता त्वया ऽऽनीता जगन्मातैव जानकी ॥ ४२ ॥ क्षणनाशिनि संसारे शरीरे क्षणभंगुरे ॥ पंचभूतात्मके राजंश्चतुर्विंशतितत्त्वके ॥ ४३ ॥ मलमांसास्थिदुर्गंधभूयिष्ठे ऽहंकृतालये ॥ कैवास्था व्यतिरिक्तस्य काये तव जडात्मके ॥ ४४ ॥ यत्कृते ब्रह्महत्यादिपातकानि कृतानि ते ॥ भोगभोक्ता तु यो देहः स देहो ऽत्र पतिष्यति ॥ ४५ ॥ पुण्यपापे समायातो जीवेन सुखदुःखयोः ॥

( मू. ) आनीता. ॥ ४२ ॥ ( पू. ) [सति], ॥ राजन, ( मू. ) ॥४३॥ ( मू. ) कायें व्यतिरिक्तस्य तव आस्था का एव ? ॥ ४४ ॥ ते (मू.). ॥ ४५ ॥ सुखदुःखयोः कारणे (पू.) ] सह ] समायातः.

१ मळ, मांस, हाडें, दुर्गंध ह्यांनीं बहुतेक भरलेल्या. २ अहंकाराचें स्थान अशा. ३ शरीरावर. ४ पडेल.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आत्म्याचें स्मरण असूं दे.

च्यामुळेंच देहाचा संबंध वगैरे असल्यामुळें आत्म्याला निरंतर सुखदुःखें भोगावीं लागतात ( देहाचा संबंध नसेल तर पुण्यपापें सुखदुःख देऊं शकत नाहींत ). ॥ ४६ ॥ जोंपर्यंत परवश झालेल्या आत्म्याला 'मी देह आहें" 'मी कर्में करितों' असा अभिमान असतो, तोंपर्यंतच अविद्येमुळें जन्म मृत्यु भोगावे लागतात. ॥ ४७ ॥ ह्मणून, हे महाबुद्धिमंता, तूं देहादिकांवरील अभिमान सोडून दे. आत्मा अतिनिर्मल, शुद्ध, अपरोक्षज्ञानरूपी, अकर्ता व निर्विकार होय. ॥ ४८ ॥ आत्म्याला स्वस्वरूपाचें ( स्वतांच्या शुद्धत्वादिकांचें ) ज्ञान नसतें ह्मणून शरीराचा संबंध घडतो आणि मोह पडतो. ह्यासाठीं - माझें तुला इतकेंच सांगणें आहे कीं, - आत्म्याला 'तो शुद्ध ज्ञानरूप व नित्य मुक्त आहे' असें जाण; त्याचें नित्य अवधान असूं दे; ॥ ४९ ॥ पुत्र, स्त्रिया, गृह इत्यादिकांविषयीं वैराग्य धर,

कारणे देहयोगादिना ऽऽत्मनः कुरुतो ऽनिशम् ॥४६॥ यावद्देहो ऽस्मि कर्ता ऽस्मीत्यात्मा ऽहंकुरुते ऽवशः ॥ अध्यासात्तावदेव स्याज्जन्मनाशादिसंभवः ॥ ४७ ॥ तस्मात्त्वं त्यज देहादावभिमानं महामते ॥ आत्मा ऽतिनिर्मलः शुद्धो विज्ञानात्मा ऽचलो ऽव्ययः ॥ ४८ ॥ स्वाज्ञानवशतो बन्धं प्रतिपद्य विमुह्यति ॥ तस्मात्त्वं शुद्धभावेन ज्ञात्वा ऽऽत्मानं सदा स्मर ॥४९॥ विरतिं भज सर्वत्र पुत्रदारगृहादिषु ॥

[ ते ] (बा. मू. ) [ सुखदुःखे] अनिशं[1] कुरुतः[2]. ॥४६॥ (पू.) [सन्] अहंकुरुते[3], ॥ तावत् एव ( मू. ) स्यात्. ॥४७॥ तस्मात् महामते, (पू.) त्यज. ॥ (मू.) आत्मा ॥४८॥(मू.)॥४९॥ (पू.) विरतिं[4] भज. ॥



१ सतत. २ करतात. ३ अहंकार करितो. ४ वैराग्यास.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

कारण, कुत्रीं, डुकरें ह्या शरीरांत फार तर काय नरकांमध्येंही भोग भोगायास मिळतातच. ॥ ५० ॥ आगोदर नरदेह मिळणें दुर्लभ, त्यांतही भरतखंडनामक कर्मभूमीमध्यें जन्मास येणें फार दुर्घट, त्यांतूनही विवेकसंपन्न ब्राह्मणजन्म पराकाष्ठेचा दुर्लभ होय : हें सगळें मिळालें असतां, ॥ ५१ ॥ कोणी तरी विचारी पुरुष देहावर आत्मबुद्धि ठेवून भोगांच्या पाठीस लागून राहील काय ? तुला ब्राह्मणजन्म मिळाला आहे इतकेंच नव्हे, तर तूं पौलस्त्याच्या उत्तम वंशांत जन्मला आहेस. ॥ ५२ ॥ असें असतांना, अज्ञान्यासारखा नित्य भोगांवर आसक्त होऊन त्यांच्या प्राप्तीचे व्यर्थ यत्न कां करीत असतोस ? इतउत्तर तरी

निरयेष्वपि[1] भोगः स्याच्छ्वसूकरतनावपि[2] ॥५०॥ देहं लब्ध्वा विवेकाढ्यं[3] द्विजत्वं च विशेषतः ॥ तत्रापि भारते वर्षे कर्मभूमौ सुदुर्लभम् ॥ ५१ ॥ को विद्वानात्मसात्कृत्वा[4] देहं भोगानुगो भवेत् ॥ अतस्त्वं ब्राह्मणो भूत्वा पौलस्त्यतनयश्च सन् ॥ ५२ ॥ अज्ञानीव सदा भोगाननुधावसि किं मुधा[5] ॥ इतः परं वा त्यक्त्वा त्वं सर्वसंगं समाश्रय ॥ ५३ ॥ राममेव परात्मानं भक्तिभावेन सर्वदा ॥ सीतां समर्प्य रामाय तत्पादानुचरो भव ॥ ५४ ॥

( मू. ) भोगः स्यात्. ॥ ५० ॥ ( मू. ) देहं, विशेषतः विवेकाढ्यं द्विजत्वं च लब्ध्वा, ॥ ५१ ॥ कः विद्वान् देहं ( मू. ) ॥ ५२॥ ( ५३ पू. ) किं अनुधावसि[6] ? ॥ ( ५४ उ. ) त्यक्त्वा, परात्मानं ( ५४ पू. ) समाश्रय. ॥ रामाय ( मू. ). ॥ ५३ ॥ ५४ ॥

---

१ नरकांत. २ कुत्रीं, डुकरें, ह्या शरीरांत. ३ विचारसंपन्न. ४ आत्मसात् आपलासा. ५ व्यर्थ. ६ मागें धांवतोस.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

सर्वसंगपरित्याग करून नित्य भक्तिपुरःसर प्रभु रामचंद्राचाच आश्रय धरून राहा, सीता रामाला नेऊन दे व सर्वकाळ त्याच्या चरणांची सेवा करीत जा. ॥ ९३ ॥ ९४ ॥ इतकें केलेंस ह्मणजे तूं सर्व पापांपासून मुक्त होत्साता विष्णुलोकीं जाशील. हें न करशील तर मात्र तुला उत्तरोत्तर अधोलोकीं जावें लागेल, मग पुन्हां परत वर येण्याची आशा देखील धरायाला नको. माझ्या उपदेशाचा स्वीकार कर. मी तुझें जेणेंकरून हित होईल, अशीच गोष्ट सांगत आहें. ॥ ९५ ॥ रावणा! साधूंची संगति धर. रामचंद्र भक्तांचीं दुःखें दूर करणारा व शरणागतांचा हितकर्ता होय; त्याची अंगकांति पाचेच्या खड्याप्रमाणें सुंदर आहे; तो हस्तामध्यें नित्य धनुष्यबाण धारण करितो; सुग्रीव, लक्ष्मण व बिभीषण हे तिघे त्याच्या चरणांची सेवा करीत असतात; राजा! तूं सीतेसह रामचंद्राची भक्ति करीत जा." ॥ ९६ ॥ इति चतुर्थसर्गः ॥ ४ ॥

विमुक्तः सर्वपापेभ्यो विष्णुलोकं प्रयास्यसि ॥ नोचेद्गमिष्यसे ऽधोधः पुनरावृत्ति-[1]वर्जितः ॥ अंगीकुरुष्व मद्वाक्यं हितमेव वदामि ते ॥९५॥ सत्संगतिं कुरु भजस्व हरिं शरण्यं श्रीराघवं मरकतोपल[2]कान्तिकान्तम् ॥सीतासमेतमनिशं धृतचापबाणं सुग्रीवलक्ष्मणविभीषणसेवितांघ्रिम्॥९६॥इति युद्धकाण्डे चतुर्थः सर्गः॥४॥

सर्वपापेभ्यः विमुक्तः [सन्] (पू.). ॥ (द्वि. ) [त्वं] अधः अधः गमिष्यसे. ॥ मद्वाक्यं (मू.) वदामि. ॥ ९५ ॥ ( मू. ) श्रीराघवं अनिशं भजस्व." ॥ ९६ ॥ इति युद्धकाण्डे चतुर्थः सर्गः ॥ ४ ॥

१ पुन्हां येण्याशिवाय. २ पाचेच्या खड्यासारख्या कांतीनें सुंदर.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

शुकाच्या मुखांतून निघालेलीं उपदेशवचनें खरोखरच अज्ञानाचा विध्वंस करणारीं होतीं, परंतु रावणाला - रुचलीं नाहींत; तर हीं कानीं पडतांच - रावणाचे नेत्र क्रोधानें लाल होऊन गेले; त्यामुळें तो शुकाला जाळीत आहे कीं काय, असा मास पडे! अशा स्थितींत त्यानें भाषण केलें :- ॥ १ ॥ 'शुका! तुझी बुद्धि अत्यंत दुष्ट आहे! अरे! तूं माझा चाकर असून मजजवळ गुरूसारखीं भाषणें बोलतोस - तुला ह्मणावें तरी काय? - मी त्रैलोक्याला शिक्षण लावणारा! आणि मला तूं उपदेश करीत आहेस! तुला लाज तरी कशी वाटत नाहीं? ॥ २ ॥ तुला मी आतांच मारून टाकिलें असतें; खरोखर, ह्या वेळीं तुझा वध करावा, हेंच योग्य होय! परंतु, तुझे पूर्वोपकार स्मरून मी तुला जीवदान देतों. ॥ ३ ॥ मूर्खा! येथून चालता हो. मी तुझें असें भाषण ऐकून घेणें योग्य नव्हे.' 'हा आपला मजवर मोठा अनुग्रहच

श्रुत्वा शुकमुखोद्गीतं वाक्यमज्ञाननाशनम् ॥ रावणः क्रोधताम्राक्षो दहन्निव तमब्रवीत् ॥ १ ॥ अनुजीव्य सुदुर्बुद्धे गुरुवद्भाषसे कथम् ॥ शासिता ऽहं त्रिजगतां त्वं मां शिक्षन्न लज्जसे ॥ २ ॥ इदानीमेव हन्मि त्वां किंतु पूर्वकृतं तव ॥ स्मरामि तेन रक्षामि त्वां यद्यपि वधोचितम् ॥ ३ ॥ इतो गच्छ विमूढ त्वमेवं श्रोतुं न मे क्षमम् ॥

( पू. ) वाक्यं श्रुत्वा ॥ क्रोधताम्राक्षः ( मू. ) - ॥१॥ ' ( पू. ) भाषसे? ॥ अहं त्रिजगतां शासिता. ( मू. ) [ कथं ] न लज्जसे? ॥ २ ॥ ( पू. ) हन्मि; किन्तु तव पूर्वकृतं ॥ ( मू. ) त्वां रक्षामि. ॥ ३ ॥ विमूढ, त्वं ( पू. ) न क्षमं. ' ॥

१ शुकाच्या मुखांतून उच्चारिलेले. २ सेवका. ३ लाजतोस. ४ मारितों. ५ ऐकण्यास. ६ योग्य.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

शुकाचा पूर्वजन्मवृत्तांत.

झाला असें मी समजतों!' इतकें बोलून शुक कांपत कांपत घरीं गेला. ॥ ४ ॥ शुकही पूर्वजन्मीं उत्तम वेद वेत्ता व ब्रह्मज्ञानी ब्राह्मण होता. तो वानप्रस्थांच्या धर्मांप्रमाणें स्वकर्में आचरण करून वनांत राहत असे. ॥ ५ ॥ त्या महाबुद्धिमान् ब्राह्मणानें, देवांचा उत्कर्ष व दैत्यांचा नाश व्हावा, एवढ्यासाठीं एकापाठीमागून एक असे अनेक यज्ञ केले. ॥ ६ ॥ शुक देवांचें हित करण्यास तत्पर असे; ह्मणून राक्षस त्याच्याशीं द्वेष करूं लागले. त्या राक्षससमुदायांत वज्रदंष्ट्र नांवानें प्रख्यात असा एक महाराक्षस होता. ॥ ७ ॥ तो शुकाचा घात करण्यास योग्य प्रसंग केव्हां सांपडतो अशी इच्छा धरून टपून बसला होता. एके प्रसंगीं

महाप्रसाद इत्युक्त्वा वेपमानो[1] गृहं ययौ ॥ ४ ॥ शुको ऽपि ब्राह्मणः पूर्वं ब्रह्मिष्ठो[2] ब्रह्मवित्तमः ॥ वानप्रस्थविधानेन[3] वने तिष्ठन् स्वकर्मकृत् ॥५॥ देवानामभिवृद्ध्यर्थं[4] विनाशाय सुरद्विषाम्[5] ॥ चकार यज्ञविततिमविच्छिन्नां महामतिः ॥६॥ राक्षसानां विरोधो ऽभूच्छुको देवहितोद्यतः ॥ वज्रदंष्ट्र इतिख्यातस्तत्रैको राक्षसो महान् ॥ ७ ॥ अन्तरं प्रेप्सुरातिष्ठच्छुकापकरणोद्यतः ॥

(मू.). ॥ ४ ॥ (मू.) ब्राह्मणः [ आसीत् ]. ॥ ५ ॥ महामतिः [ सः ] (पू.) विनाशाय [ च ] अविच्छिन्नां[6] यज्ञविततिं[7] चकार. ॥ ६ ॥ शुकः देवहितोद्यतः[8] [ इति ज्ञात्वा[9] ] (पू.). ॥ तत्र (मू.) राक्षसः ॥ ७ ॥ (पू.) [ सन् ] अंन्तरं[10] प्रेप्सुः[11] आतिष्ठत्[12]. ॥

---

१ कांपणारा. २ ब्रह्मसाक्षात्कारी. ३ वनांत राहणाऱ्या ऋषींच्या धर्माप्रमाणें. ४ उत्कर्षासाठीं. ५ देवांच्या शत्रूंच्या. ६ अखंडित. ७ यज्ञपरंपरेला. ८ देवांचें हित करण्यास तत्पर. ९ जाणून. १० अवकाश; फट. ११ मिळवूं इच्छिणारा. १२ राहिला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

त्या शुकमुनीच्या आश्रमांत अगस्त्य मुनि आले. ॥ ८ ॥ शुकानें अगस्त्यांचें स्वागत करून त्यांस भोजनास राहविलें. - त्यांनीं शुकाच्या ह्मणण्यास मान दिला. - पुढें अगस्त्यमुनि स्नानाला गेले. ही सांपडलेली संधि साधून ॥ ९ ॥ राक्षसानें अगस्त्याचा वेष घेतला आणि शुकाकडे येऊन त्याला ह्मटलें :– 'मुनिवर्या, तुह्मी मला भोजन देणारच, तर त्यांत मांसशुद्धां असलें पाहिजे. ॥ १० ॥ मी आज फार दिवसांत बोकडाच्या शरीराचें मांस खाल्लें नाहीं.' शुकानें 'बरें आहे' असें ह्मणून मांसाचे सर्व भोज्य उपस्कर सिद्ध करविले. ॥ ११ ॥ अगस्त्यमुनि भोजनास बसले. इकडे त्या दुष्ट राक्षसानें घरांत शुकाच्या पत्नीला

कदाचिदागतो ऽगस्त्यस्तस्याश्रमपदं मुनेः ॥ ८ ॥ तेन संपूजितो ऽगस्त्यो भोजनार्थं निमन्त्रितः ॥ गते स्नातुं मुनौ कुम्भसंभवे प्राप्य चान्तरम् ॥ ९ ॥ अगस्त्यरूपधृक् सो ऽपि राक्षसः शुकमब्रवीत् ॥ यदि दास्यसि मे ब्रह्मन् भोजनं देहि सामिषम् ॥ १० ॥ बहुकालं न भुक्तं मे मांसं छागांगसंभवम् ॥ तथेति कारयामास मांसभोज्यं सविस्तरम् ॥ ११ ॥ उपविष्टे मुनौ भोक्तुं राक्षसो ऽतीवसुन्दरम् ॥

( मू. ) आश्रमपदं आगतः. ॥८॥ ( पू. ). ॥ कुम्भसम्भवे[1] मुनौ स्नातुं[2] गते [ सति ], ( मू. ) प्राप्य, ॥ ९ ॥ ( पू. ) – 'ब्रह्मन्, ( मू. ) दास्यसि[3], [ तर्हि ] सामिषं[4] देहि[5]. ॥ १० ॥ मे ( पू. ) मांसं न भुक्तं.' ॥ ( मू. ) मांसभोज्यं कारयामास. ॥ ११ ॥ मुनौ भोक्तुं उपविष्टे [ सति ], ( पू. ) ॥

१ कुंभापासून जन्मलेला ( अगस्त्य ). २ स्नानास. ३ देशील. ४ मांसासहित. ५ दे. ६ बकऱ्याच्या आंगांतून उत्पन्न झालेलें. ७ मांसाचे भक्ष्यपदार्थ. ८ भोजनास. ९ बसलेला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

त्याला अगस्त्य-मुनींचा शाप.

मुरळ घातली व स्वतां तिच्या स्वरूपासारखें सुंदर शरीर धारण करून - बाहेर येऊन - ॥ १२ ॥ अगस्त्य मुनींच्या पात्रांत नरमांसाचे सिद्ध केलेले सर्व पदार्थ वाढिले. वाढण्याचें काम आटोपल्याबरोबर राक्षस गुप्त झाला. मनुष्याचें मांस अपवित्र होय - खाण्यास योग्य नाहीं : तें पात्रांत दृष्टीस पडतांच - अगस्त्यमुनि संतापले व शुकाला ह्मणाले :– 'दुर्बुद्धे ! मनुष्याचें मांस अभक्ष्य असतांना तूं मला वाढिलेंस, त्यार्थी तूं मनुष्यें खाणारा राक्षस होऊन राहा !' असा शाप मिळाला तेव्हां शुक घाबरला व अगस्त्याला विनवूं लागला :– 'मुने, आपण ॥ १३ ॥ १४ ॥ १५ ॥ आतांच सांगितलें कीं, आज मला मांसाचें

शुकभार्यावपुर्धृत्वा तां चान्तर्मोहयन् खलः ॥ १२ ॥ नरमांसं ददौ तस्मै सुपक्वं बहुविस्तरम् ॥ दत्त्वैवान्तर्दधे रक्षस्ततो दृष्ट्वा चुकोप सः ॥ १३ ॥ अमेध्यं मानुषं मांसमगस्त्यः शुकमब्रवीत् ॥ अभक्ष्यं मानुषं मांसं दत्तवानसि दुर्मते ॥ १४ ॥ मह्यं त्वं राक्षसो भूत्वा तिष्ठ त्वं मानुषाशनः ॥ इति शप्तः पुरो भीत्या प्राहागस्त्यं मुने त्वया ॥ १५ ॥ इदानीं भाषितं मेऽद्य मांसं देहीति विस्तरम् ॥

(मू.) राक्षसः ॥१२॥ (१२ पू.) [2]नरमांसं [3]ददौ. रक्षः ॥ (१३ मू.) अगस्त्यः ( १४ पू. ) दृष्ट्वा चुकोप, [ ततः ] शुकं अब्रवीत् – 'दुर्मते, [यतः] त्वं मह्यं (१४ मू.), [ अतः ] त्वं [6]मानुषाशनः(१५पू.)'.॥ इति शप्तः [शुकः] (मू.) प्राह – 'मुने, त्वया ॥१३–१५॥ (पू.) मांसं देहि इति इदानीं भाषितं; ॥

१ मुरळ पाडणारा. २ मनुष्याचें मांस. ३ देता झाला. ४ गुप्त झाला. ५ अपवित्र. ६ मनुष्यांस खाणारा. ७ शाप दिलेला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

सोपस्कर भोजन दे. त्याप्रमाणेंच मी आपणाला भोजन अर्पण केलें. मग, अहो ज्ञानवंता! मला शाप काय ह्मणून देतां?' ॥ १६ ॥ शुकाचें भाषण ऐकिल्यावर अगस्त्यमुनि - गोंधळांत पडले. त्यांना आपण मांस-भोजन मागितल्याचें स्मरण होईना! - ते मुहूर्तमात्र ध्यानस्थ बसले; तेव्हां लागलाच राक्षसाचा सर्व खो-डकरपणा त्यांच्या ध्यानीं आला. मुनि महाबुद्धिमानच होते. त्यांनीं तत्क्षणीं शुकाला सांगितलें :- ॥१७॥ 'बाबा! राक्षसाच्या मनांत तुझा घात करावयाचा होता, ह्मणून त्यानें हें सर्व कृत्य केलें! मुनिश्रेष्ठा! मी तुला केवळ अविचारामुळें शाप दिला, - ह्याबद्दल मला फार वाईट वाटतें; - ॥ १८ ॥ परंतु, माझें हें वचन कधीं अन्यथा व्हावयाचें नाहीं. ह्मणून, तूं राक्षसाचें शरीर धारण करून रावणाचें साह्य करीत ॥ १९ ॥

तथैव दत्तं मे देव किं मे शापं प्रदास्यसि ॥ १६ ॥ श्रुत्वा शुकस्य वचनं मुहूर्तं ध्यानमास्थितः ॥ ज्ञात्वा रक्षःकृतं सर्वं ततः प्राह शुकं सुधीः ॥ १७ ॥ तत्रापका-रिणा[1] सर्वं राक्षसेन कृतं त्विदम् ॥ अविचार्यैव[2] मे दत्तः शापस्ते मुनिसत्तम ॥१८॥ तथापि मे वचो ऽमोघमेत्रमेव[3] भविष्यति ॥ राक्षसं वपुरास्थाय[4][5] रावणस्य सहा-यकृत् ॥ १९ ॥

देव, तथा एव मे दत्तं [ अतः ] ( मू. ) किं प्रदास्यसि? ॥ १६ ॥ सुधीः [ अगस्त्यः ] शुकस्य वचनं ( पू. ).॥ ततः सर्वं रक्षःकृतं ( मू. ) प्राह - ॥ १७ ॥ ' मुनिसत्तम, इदं तु सर्वं ( पू. ). मे ( मू. ) शापः दत्तः. ॥ १८ ॥ ( मू. ) ॥ १९ ॥

१ राक्षसानें केलेलें. २ विचार न करून. ३ अमोघं सत्य. ४ शरीर. ५ स्वीकारून.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

शापाच्या निवृत्तीची वेळ.

राहा. रामचंद्र येईपर्यंत तुला ह्या योनींत राहावें लागेल. राम रावणाचा वध करण्याकरितां वानरांना बरोबर घेऊन लंकेजवळ येईल; ॥२०॥ पुढें रावण तुला दूत ह्मणून रामाकडे पाठवील; रामाचें दर्शन झालें कीं तुझी शापापासून मुक्तता होईल. नंतर तूं रावणाला तत्त्वज्ञानाचा उपदेश करशील, आणि शेवटीं मुक्त होत्साता परम पदास पावशील.' अगस्त्यमुनींनीं शुकाला असें सांगितलें. खरोखरच शुक हा ब्राह्मणांतील अग्रगण्यांमध्येंही अतिश्रेष्ठ होता. ॥ २१ ॥ २२ ॥ - परंतु ब्रह्मशापामुळें - तत्काल त्याला राक्षस व्हावें लागलें! तो रावणाजवळ जाऊन राहिला. आतां त्यानें दूतरूपानें जाऊन कनिष्ठ बंधूसह रामाचें दर्शन घेतलें, व ॥२३॥

तिष्ठ तावद्यदा रामो दशाननवधाय हि ॥ आगमिष्यति लंकायाः समीपं वानरैः सह ॥ २० ॥ प्रेषितो रावणेन त्वं चारो[1] भूत्वा रघूत्तमम् ॥ दृष्ट्वा शापाद्विनिर्मुक्तो बोधयित्वा च रावणम् ॥ २१ ॥ तत्त्वज्ञानं ततो मुक्तः परं पदमवाप्स्यसि ॥ इत्युक्तो ऽगस्त्यमुनिना शुको ब्राह्मणसत्तमः ॥ २२ ॥ बभूव राक्षसः सद्यो रावणं प्राप्य संस्थितः ॥ इदानीं चाररूपेण दृष्ट्वा रामं सहानुजम् ॥ २३ ॥

तावत् ( मू. ) लङ्कायाः समीपं आगमिष्यति, ॥ २० ॥ [ तदा ] रावणेन ( २१ मू. ) [ सन् ] रावणं, तत्वज्ञानं बोधयित्वा, ततः मुक्तः [ सन् ] ( २२ पू. ). ' ॥ अगस्त्यमुनिना (मू.) ॥ २१ ॥ २२ ॥ सद्यः राक्षसः ( मू. ) रामं दृष्ट्वा, ॥ २३ ॥

[1] दूत.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

- परत आल्यावर - रावणाला तत्त्वज्ञानाचा उपदेश केला. - त्यामुळें त्याच्या शापाचें पर्यवसान झालें. - तेव्हां तो पूर्वींप्रमाणें ब्राह्मण होऊन ऋषींसह आश्रमीं राहूं लागला. ॥ २४ ॥ इकडे - लंकेंत - माल्यवान् नांवाचा एक वृद्ध महान् राक्षस रावणाजवळ आला. तो मोठा बुद्धिमान् व नीतिशास्त्रांत प्रवीण असून राजाच्या मातेचा प्रिय पिता (आजा) होता. ॥२५॥ त्यानें त्या पराक्रमी राक्षसाला (रावणाला) सांगितलें :–' राजा ! मी काय सांगतों, तें आगोदर अंतःकरण शांत ठेवून ऐकून घे. मग तुझ्या इच्छेस येईल तसा वाग. ॥ २६ ॥ रावणा ! रामाची प्रिय भार्या जानकी लंकेंत शिरली, तेव्हांपासून ह्या नगरींत दुश्चिन्हें दिसूं लागलीं आहेत. ॥२७॥

रावणं तत्त्वविज्ञानं बोधयित्वा पुनर्द्रुतम् ॥ पूर्ववद्ब्राह्मणो भूत्वा स्थितो वैखानसैः सह ॥ २४ ॥ ततः समागमद्वृद्धो माल्यवान् राक्षसो महान् ॥ बुद्धिमान्नीतिनिपुणो राज्ञो मातुः प्रियः पिता ॥२५॥ प्राह तं राक्षसं वीरं प्रशान्तेनान्तरात्मना ॥ शृणु राजन्वचो मे ऽद्य श्रुत्वा कुरु यथेप्सितम् ॥ २६ ॥ यदा प्रविष्टा नगरीं जानकी रामवल्लभा ॥ तदादि पुर्यां दृश्यन्ते निमित्तानि दशानन ॥ २७ ॥

( मू. ) स्थितः. ॥ २४ ॥ ( मू. ) मातुः पिता माल्यवान् राक्षसः समागमत्.' ॥२५॥ वीरं तं राक्षसं प्राह – ' राजन्, अद्य मे वचः ( मू. ) कुरु. ॥ २६ ॥ दशानन, रामवल्लभा जानकी ( २७ पू. ) प्रविष्टा, ( २७ उ. ) ॥

---

१ ऋषींशीं.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

त्यांवरून, आपला नाश होणार, असें निश्चयात्मक कळून येतें. घोर दुश्चिन्हें कोणतीं, तीं मी सांगतों ऐक :– आकाशांत अतिभयंकर मेघ येऊन कठोर गर्जना करितात ! ॥ २८ ॥ व सर्वकाळ लंकानगरीवर उष्ण रक्ताची वृष्टि चालवितात ! देवांच्या मूर्ति रडतात, घामाघूम होतात, व उलथून पडतात ! ॥ २९ ॥ कालिका प्रत्येक राक्षसाच्या पुढें अवचित उभी राहते, व आपले पांढरे दांत बाहेर काढून खदखदां हांसते ! गाईच्या पोटीं गर्दभ उपजतात ! मुंगूस व उंदीर ॥ ३० ॥ मांजरांबरोबर युद्ध करितात ! सर्प गरुडाशीं लढण्यास सिद्ध होतात; ॥

घोराणि नाशहेतूनि तानि मे वदतः शृणु ॥ खरस्तनितनिर्घोषा[2] मेघा अतिभयंकराः ॥ २८ ॥ शोणितेनाभिवर्षन्ति[3] लंकामुष्णेन सर्वदा ॥ रुदन्ति[6] देवलिंगानि स्विद्यन्ति प्रचलन्ति च ॥ २९ ॥ कालिका पाण्डुरैर्दन्तैः प्रहसत्यग्रतः स्थिता ॥ खरा[11] गोषु[12] प्रजायन्ते[13] मूषका नकुलैः[14] सह ॥ ३० ॥ मार्जारेण तु युध्यन्ति पन्नगा[15] गरुडेन तु ॥

( २८ पू. ) निमित्तानि दृश्यन्ते; तानि वदतः मे शृणु – ॥ ( मू. ) मेघाः ॥ २७ ॥ २८ ॥ उष्णेन ( पू. ) अभिवर्षन्ति. ॥ दैवतालिङ्गानि ( मू. ). ॥ २९ ॥ अग्रतः स्थिता ( मू. ) [ स्थिताः ] मूषकाः ॥ ३० ॥ ( पू. ) युद्ध्यन्ति. ॥

---

१ अपशकुन. २ भयंकर गडगडाटाचा शब्द ज्यांचा, असे. ३ रक्तानें. ४ भिजावितात. ५ देवांच्या मूर्ति. ६ रडतात. ७ घामाघूम होतात. ८ कांपतात. ९ पांढऱ्या. १० खिदळणारी. ११ गर्दभ. १२ गाईच्या पोटीं. १३ उपजतात. १४ मुंगूस. १५ सर्प.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

भयंकर, वेडाविद्रा, काळ्या व पिंगट वर्णाचा गोसावडा काळपुरुष सर्वांच्या घरांत वेळोवेळीं डोकावत असतो. हीं व अशींच दुसरीं दुश्चिन्हें दिसतात व उद्भवत असतात. ॥ ३१ ॥ ३२ ॥ ह्मणून, रावणा! कुलाच्या संरक्षणासाठीं कांहीं शांतिकर्म कर. बा! सीतेचा सत्कार करून द्रव्यासह ती लवकर रामाला नेऊन दे. ॥ ३३ ॥ राम प्रत्यक्ष नारायण आहे, हें लक्ष्यांत घे. राघवाविषयीं द्वेष सोडून दे. अरे! ज्ञानीलोक त्याच्या चरणरूप नौकेचा आश्रय धरितात; ह्मणून त्यांचीं अंतःकरणें भक्तीच्या योगें पवित्र होतात; मग ते अर्थातच संसारसागरांतून तरून जातात. एवढ्यावरून, राम मनुष्य नव्हे, हें सिद्ध आहे. तूं

कॅरालो विकॅटो मुॅण्डः पुरुषः कृॅष्णपिंगलः ॥ ३१ ॥ कालो गृहाणि सर्वेषां काले काले त्ववेॅक्षते ॥ एतान्यन्यानि दृश्यन्ते निमित्तान्युद्भवन्ति च ॥ ३२ ॥ अतः कुलस्य रक्षार्थं शान्तिं कुरु दशानन ॥ सीतां सत्कृत्य सधनां रामायाशु प्रॅयच्छ भोः ॥ ३३ ॥ रामं नारायणं विद्धि विद्वेषं त्यज राघवे ॥ यॅत्पादपोतमाश्रित्य ज्ञानिनो भवसागरम् ॥ ३४ ॥ तरन्ति भक्तिपूतान्तास्ततो रामो न मानुषः ॥

( मू. ) ॥ ३१ ॥ कालः सर्वेषां ( मू. ) दृश्यन्ते, उद्भवन्ति च. ॥ ३२ ॥ अतः दशानन, ( पू. ). ॥ भोः ! सधनां (मू.). ॥३३॥ (३४ पू.) विद्वेषं त्यज; ॥ ज्ञानिनः (३४ मू.), भक्तिपूतान्ताः [सन्तः] भवसागरं ( बा. ३९ पू. ) ॥

---

१ क्रूर. २ विद्रा. ३ मुंडलेला. ४ काळा पिंगट. ५ अवेक्षते डोकावतो. ६ दे. ७ ज्याच्या चरणरूप नौकेला. ८ भक्तीच्या योगें पवित्र झालीं अंतःकरणें ज्यांचीं, असे.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

सर्वांच्या हृदयांत राहणाऱ्या त्या रामचंद्राची भक्तिभावेंकरून सेवा कर. ॥ ३४ ॥ ३५ ॥ जरी तूं दुराचारी आहेस, तरी भक्तीच्यायोगें पवित्र होशील. राजाधिराजा! मी सांगत आहें, असा वाग. ह्मणजे तुझ्या कुळाचें कल्याण होईल.' ॥ ३६ ॥ माल्यवानानें असा हितकारक उपदेश केला. परंतु, रावणाचें अंतःकरण दुष्ट होतें व तो मृत्यूच्या पूर्णपणें अधीन झाला होता, ह्मणून हा उपदेश त्याला सहन झाला (रुचला) नाहीं. - तो ह्मणाला : - ॥ ३७ ॥ 'ह्मातान्या! राम ह्मणजे एक गरीब दुबळा मनुष्य! त्याला आधार कायतो माकडांचा! बापानें तर त्याला घालवून दिलें. त्याचे अंतरंगींचे स्नेही ह्मटले ह्मणजे - अशक्त - मुनि! अशी त्याची स्थिति असतांही, तो मोठा समर्थ आहे, असें तुला वाटतें, तें काय ह्मणून? ॥ ३८ ॥

भजस्व भक्तिभावेन रामं सर्वहृदालयम् ॥ ३५ ॥ यद्यपि त्वं दुराचारो भक्त्या पूतो भविष्यसि ॥ मद्वाक्यं कुरु राजेन्द्र कुलकौशलहेतवे ॥ ३६ ॥ तत्तु माल्यवतो वाक्यं हितमुक्तं दशाननः ॥ न मर्षयति दुष्टात्मा कालस्य वशमागतः ॥ ३७ ॥ मानवं कृपणं राममेकं शाखामृगाश्रयम् ॥ समर्थं मन्यसे केन हीनं पित्रा मुनिप्रियम् ॥ ३८ ॥

(मू.) रामं भक्तिभावेन भजस्व. ॥ ३४ ॥ ३५ ॥ (पू.) [तथा अपि] भक्त्या पूतः भविष्यसि. ॥ (मू.) मद्वाक्यं कुरु.' ॥ ३६ ॥ (उ.) दशाननः हितं उक्तं (पू.) न मर्षयति. ॥ ३७ ॥ '(मू.) पित्रा हीनं रामं केन समर्थं मन्यसे? ॥ ३८ ॥



१ शुद्ध. २ कुळाच्या कल्याणासाठीं. ३ सहन करितो.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

- माझा तर तर्क असा वाहतो कीं, - तुला रामानें पाठविलें आहे; ह्मणून तूं ही पाहिजे तशी बडबड लाविली आहेस. जा. तूं म्हातारा व आमचा नातलग आहेस ह्मणून मी तुझें सगळें बोलणें सोसून घेतलें! ॥ ३९ ॥ ह्या तुझ्या मुखांतून निघालेल्या भाषणानें माझ्या कानांची आग करून दिली आहे!!' इतकें बोलून रावण लागलाच सर्व सचिवांना बरोबर घेऊन - सभेंतून - निघून गेला. ॥ ४० ॥ पुढें त्यानें राजवाड्याच्या शिखरावर बसून वानरसेनेंतील वीर अवलोकन केले व जवळ असलेल्या सर्व राक्षसांना युद्धास जाण्याची आज्ञा दिली. ॥ ४१ ॥ इकडे रामचंद्रानेंही लक्ष्मणानें आणून दिलेलें धनुष्य हातीं घेतलें. रावण राजवाड्यावर

रामेण प्रेषितो नूनं भाषसे त्वमनर्गलम्[1] ॥ गच्छ वृद्धो ऽसि बन्धुस्त्वं सोढं[2] सर्वं त्वयोदितम् ॥३९॥ इतो मत्कर्णपदवीं[3] दहत्येतद्वचस्तव ॥ इत्युक्त्वा सर्वसचिवैः सहितः प्रस्थितस्तदा ॥ ४० ॥ प्रासादाग्रे समासीनः पश्यन्वानरसैनिकान् ॥ युद्धायायोजयत्सर्वराक्षसान्समुपस्थितान् ॥ ४१ ॥ रामो ऽपि धनुरादाय लक्ष्मणेन समाहृतम् ॥ दृष्ट्वा रावणमासीनं कोपेन कलुषीकृतः[5] ॥ ४२ ॥

त्वं (पू.) भाषसे! ॥ गच्छ त्वं वृद्धः बन्धुः असि [अतः] (मू.) सोढं! ॥३९॥ इतः तव [मुखात् निःसृतं] एतत् वचः (पू.)!' ॥ [रावणः] (मू.) प्रस्थितः. ॥ ४० ॥ (पू.) पश्यन् ॥ [रावणः] समुपस्थितान् सर्वराक्षसान् (मू.). ॥४१॥ (पू.) धनुः आदाय, ॥ आसीनं रावणं (मू.)[बभूव]. ॥४२॥

१ अनर्गलम् निष्प्रतिबंधपणें. २ सोसलें. ३ माझ्या कानांच्या मार्गांत. ४ जाळतें. ५ खवळलेला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

युद्धास जाण्याची आज्ञा.

बसला आहे असें दृष्टीस पडल्याबरोबर तो क्रोधानें खवळून गेला. ॥ ४२ ॥ रावणाच्या मस्तकांवर मुकुट होते व भोंवतीं मंत्रिमंडळ असून तो मध्यभागीं बसला होता. रामानें अर्धचंद्राकृति अशा एकाच बाणाच्या योगें ॥ ४३ ॥ रावणाचीं सहस्र श्वेत छत्रें तोडिलीं व दहाही मुकुटांचा छेद केला! तो एक विलक्षणच प्रकार झाला! ॥ ४४ ॥ रावणाला लाज वाटली व तो लागलाच आपल्या मंदिरांत शिरला. नंतर त्या दुष्टानें प्रहस्तप्रभृति सर्व राक्षसांना बोलावून, ॥४५॥ मोठ्या त्वरेनें, वानरांशीं युद्ध करण्यास जाण्याची आज्ञा दिली. त्याप्रमाणें राक्षससेना निघाली. पणव, आनक, गोमुख, दुंदुभि इत्यादि वाद्यें वाजूं लागलीं. ॥ ४६ ॥

किरीटिनं समासीनं मन्त्रिभिः परिवेष्टितम् ॥ शशांकार्धनिभेनैव बाणेनैकेन राघवः ॥ ४३ ॥ श्वेतच्छत्रसहस्राणि किरीटदशकं तथा ॥ चिच्छेद निमिषार्धेन तदद्भुतमिवाभवत् ॥ ४४ ॥ लज्जितो रावणस्तूर्णं विवेश भवनं स्वकम् ॥ आहूय राक्षसान् सर्वान्प्रहस्तप्रमुखान् खलः ॥ ४५ ॥ वानरैः सह युद्धाय नोदयामास सत्वरः ॥ ततो भेरिमृदंगाद्यैः पणवानकगोमुखैः ॥ ४६ ॥

राघवः ( पू. ) [ रावणं दृष्ट्वा ], ( मू. ) बाणेन ॥ ४३ ॥ (पू.), तथा किरीटदशकं ॥ निमिषार्धेन ( मू. )! ॥ ४४ ॥ ( पू. ) भवनं विवेश. ॥ खलः ( मू. ) राक्षसान् आहूय, ॥ ४५ ॥ सत्वरः [ सन् ] ( मू. ) ॥ ४६ ॥

१ चंद्राच्या अर्धासारख्या. २ पाठविता झाला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

राक्षस रेडे, उंट, गर्दभ, सिंह, वाघ ह्या वाहनांवर बसून चालले. त्यांनीं तरवारी, शूल, धनुष्यें, फांस, भाले, तोमर, बरच्या हीं आयुधें हातीं घेतलीं होतीं.॥४७॥ लंकेंत जिकडेतिकडे असा देखावा दिसूं लागला. शेवटीं राक्षसमंडळी नगराच्या प्रत्येक वेशीजवळ येऊन पोंचली. रामानें वानरवीरांना पूर्वींच आज्ञा दिली होती;॥४८॥ ह्मणून ते वानरसेनापति पर्वतांचीं लहान लहान शृंगें व मोठमोठालीं शिखरें उचलून आणि नानाजातींचे वृक्ष उपटून घेऊन युद्धासाठीं उभे राहिले होते. ॥ ४९ ॥ रावणाचीं सैन्यें टोळ्याटोळ्यांनीं येत आहेत, असें त्यांच्या दृष्टीस पडलें तेव्हां ते वानर रामाचें प्रिय करावें ह्या इच्छेनें लंकेवर चढले. ॥ ५० ॥

महिषोष्ट्रैः खरैः सिंहैर्द्वीपिभिः कृतवाहनाः ॥ खड्गशूलधनुःपाशयष्टितोमरशक्तिभिः ॥ ४७॥ लक्षिताः सर्वतो लंकां प्रतिद्वारमुपाययुः ॥ तत्पूर्वमेव रामेण नोदिता वानरर्षभाः ॥४८॥ उद्यम्य गिरिशृंगाणि शिखराणि महान्ति च ॥ तरूंश्चोत्पाट्य विविधान्युद्धाय हरियूथपाः ॥ ४९ ॥ प्रेक्षमाणा रावणस्य तान्यनीकानि भागशः ॥ राघवप्रियकामार्थं लंकामारुरुहुस्तदा ॥ ५० ॥

( मू. ) [युक्ताः] ॥ ४७ ॥ लक्षिताः [ राक्षसाः ] ( मू. ) नोदिताः. ॥ ४८ ॥ ( पू. ) शिखराणि उद्यम्य ॥ विविधान् ( मू. ) [ स्थिताः ] हरियूथपाः ॥ ४९ ॥ तदा ( पू. ) प्रेक्षमाणाः [सन्तः] ( मू. ). ॥ ५० ॥

---

१ रेडे उंटें ह्यांनीं. २ गर्दभांनीं. ३ वाघांनीं. ४ उचलून. ५ तरून् वृक्षांना. ६ उपटून. ७ सैन्यांस. ८ चढले.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

कित्येक वानरांच्या हातांत वृक्ष दिसत होते, कांहींच्या हातांत पर्वतांचीं शिखरें होतीं, दुसऱ्यांनीं मुठी वळल्या होत्या. पुढें, ते वानरसेनापति आपल्या हाताखालचे—कोणाचे सहस्र, कोणाचे कोटि, ॥ ५१ ॥ काणाचे शत कोटि असे—कळप बरोबर घेऊन नगरीला पूर्ण वेढा घालून बसले. कांहीं वानर वर उड्या मारीत, कांहीं खालीं येत, कोणी गर्जना करीत, - अशी जिकडे तिकडे गडबड चालली होती. - ॥ ५२ ॥ 'अतिप्रबल अशा रामचंद्राचा जय असो!', 'महापराक्रमी लक्ष्मण विजय पावो!', 'रामचंद्रानें ज्याचें रक्षण केलें, तो राजा सुग्रीव जय मिळवो!' ॥ ५३ ॥ असे घोष करीत वानर शत्रूंबरोबर युद्ध करूं लागले. हनुमान्,

ते द्रुमैः पर्वताग्रैश्च मुष्टिभिश्च प्लवंगमाः ॥ ततः सहस्रयूथाश्च कोटियूथाश्च यूथपाः ॥५१॥ कोटीशतयुताश्चान्ये रुरुधुर्नगरं भृशम् ॥ आप्लवन्तः प्लवन्तश्च गर्जन्तश्च प्लवंगमाः ॥ ५२ ॥ रामो जयत्यतिबलो लक्ष्मणश्च महाबलः ॥ राजा जयति सुग्रीवो राघवेणानुपालितः ॥५३ ॥ इत्येवं घोषयन्तश्च समं युयुधिरेऽरिभिः ॥ हनूमानंगदश्चैव कुमुदो नील एव च ॥ ५४ ॥

( पू. ) [ उपलक्षिताः ] प्लवङ्गमाः[1], ॥ ( मू. ) च ॥ ५१ ॥ अन्ये ( पू. ) रुरुधुः[2]. ॥ ( मू. ) ॥५२॥ 'रामः अतिबलः जयति महाबलः लक्ष्मणः च ( पू. ) [जयति] ( मू. ) सुग्रीवः राजा जयति!' ॥ ५३ ॥( पू. ) समं युयुधिरे. ( मू. ) ॥ ५४ ॥

१ वानर. २ वेढिते झाले. ३ वर उडी मारणारे. ४ खालीं उडी टाकणारे.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

अंगद, कुमुद, नील, ॥ ९४ ॥ नल, शरभ, मैंद, द्विविद, जांबवान्, दधिवक्र, केसरी, तार, ॥ ९५ ॥ व दुसरेही बलाढ्य वानर असे सर्व यूथपति लंकेच्या द्वारांवर उड्या मारून, [1] राक्षसांनीं बाहेर पडूं नये म्हणून, - लगट करीत आंत शिरले. ॥ ९६ ॥ वानरांचीं शरीरें प्रचंड होतीं. ते वृक्षांनीं व पर्वतांच्या शिखरांच्या योगें त्या राक्षसांवर प्रहार करीत सुटले. कांहींनीं तर त्वेषानें राक्षसांना ओरबाडण्याचा व चावण्याचा सपाटा चालविला! तेव्हां ते भयंकर राक्षसही क्रोधानें सर्व द्वारांतून ॥ ९७ ॥ वानरांना मागें हटवीत बाहेर आले आणि भिंदिपाल, खड्ग, शूल, कुऱ्हाडी ह्या आयुधांच्या योगें वानरसेनेला बडवीत सुटले. त्यांचीं शरीरें जशीं प्रचंड दिसत तशा शक्तिही मोठ्या होत्या. ॥ ९८ ॥

नलश्च शरभश्चैव मैन्दो द्विविद एव च ॥ जाम्बवान्दधिवक्रश्च केसरी तार एव च॥५५॥ अन्ये च बलिनः सर्वे यूथपाश्च प्लवंगमाः ॥ द्वाराण्युत्प्लुत्य लंकायाः सर्वतो रुरुधुर्भृशम् ॥५६॥ तदा वृक्षैर्महाकायाः पर्वताग्रैश्च वानराः॥ निजघ्नुस्तानि रक्षांसि नखैर्दन्तैश्च वेगिताः ॥ राक्षसाश्च तदा भीमा द्वारेभ्यः सर्वतो रुषा ॥ ५७ ॥ निर्गत्य भिन्दिपालैश्च खड्गैः शूलैः परश्वधैः ॥ निजघ्नुर्वानरानीकं महाकाया महाबलाः ॥ ५८ ॥

( मू. ) ॥ ५५ ॥ ( पू. ) ॥ उत्प्लुत्य, लङ्कायाः ( मू. ) रुरुधुः. ॥ ५६ ॥ तदा महाकायाः वानराः वेगिताः [ सन्तः ]( पू. द्वि. ) तानि रक्षांसि निजघ्नुः.॥ तदा भीमाः ( मू. ) ॥ ५७ ॥ निर्गत्य, महाकायाः महाबलाः [ ते ] ( पू. ) च ( मू. ) निर्जघ्नुः. ॥ ५८ ॥

---

१ बाहेर पडून. २ मोठालीं शरीरें ज्यांचीं, असे. ३ मारिते झाले.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तसेच ते विजयशाली वानरही राक्षसांना बडवीत सुटले. रणभूमीवर जिकडे तिकडे मांसाचा व रक्ताचा चिखल पडला ! ॥ ५९ ॥ हें राक्षसांचें आणि वानरांचें युद्ध इतकें विलक्षण झालें कीं, जगामध्यें जीं घोर युद्धं पूर्वीं झालीं व पुढें होतील त्या सर्वांना हें एक दृष्टांतच होऊन बसलें ! ते शूर राक्षस घोड्यांवर, हत्तींवर आणि सुवर्णमय रथांत बसून युद्ध करीत होते. त्यांनीं गर्जना करून दश दिशा गाजवून सोडिल्या. राक्षसांना तशीच वानरवीरांनाही आपल्या विरुद्ध पक्षास जिंकण्याची इच्छा होती. ॥ ६० ॥ ६१ ॥ वानर राक्षसांना मारीत व राक्षस वानरांना बडवीत. वानर मूळचे देवांचे अंशावतार होते; त्यांतही साक्षात्

राक्षसांश्च तथा जघ्नुर्वानरा जितकाशिनः ॥ तथा बभूव समरो मांसशोणितकर्दमः ॥५९॥ रक्षसां वानराणां च संबभूवाद्भुतोपमः ॥ ते हयैश्च गजैश्चैव रथैः काञ्चनसन्निभैः ॥ ६० ॥ रक्षोव्याघ्रा युयुधिरे नादयन्तो दिशो दश ॥ राक्षसाश्च कपीन्द्राश्च परस्परजयैषिणः ॥ ६१ ॥ राक्षसान्वानरा जघ्नुर्वानरश्चैव राक्षसाः ॥ रामेण विष्णुना दृष्टा हरयो दिविजांशजाः ॥ ६२ ॥

तथा जितकाशिनः वानराः ( मू. ) बभूव. ॥५९॥ ( ६०पू. ) [समरः] सम्बभूव. ॥ ते रक्षोव्याघ्राः दश दिशः नादयन्तः [सन्तः] ( ६० उ. ) रथैः च युयुधिरे. ॥ ( मू. ) [ आसन ]. ॥६०॥६१॥ वानराः ( पू. ) वानरान् च एव जघ्नुः. ॥ ( मू. ) हरयः [ यदा ] दृष्टाः, ॥ ६२ ॥

---

१ जिंकिला प्राणवायु ज्यांनीं, असे; किंवा जयानें शोभणारे. २ मांसाचा आणि रक्ताचा चिखल ज्यांत, असा. ३ एकमेकांस जिंकण्याची इच्छा करणारे. ४ देवांचे अंशावतार.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

विष्णुरूपी रामचंद्रानें त्यांवर कृपादृष्टि ठेविली ॥ ६२ ॥ ह्मणून त्यावेळीं ते अमृत प्राशन केल्याप्रमाणें ब-
लाढ्य व आनंदी झाले होते : - राक्षसांची स्थिति अगदीं उलट होती : - ज्यानें सीतेला चोरून आणणें हें
पापकर्म केलें तो रावण राक्षसांचा पालक; ह्मणून ॥ ६३ ॥ त्यांचें ऐश्वर्य व सामर्थ्य नष्ट झालें होतें. अशा
राक्षसांवर वानर मनापासून झटून प्रहार करीत असत. असें युद्ध चालत असतां शेवटीं तेथें आलेलें राक्षसांचें
बहुतेक सैन्य मरण पावलें; त्याचा चवथा भाग मात्र कायतो अवशिष्ट राहिला. ॥६४॥ आपलें सैन्य वानरांनीं
मारिलें, असें मेघनादाच्या दृष्टीस पडलें; तेव्हां तो दुर्बुद्धि दैत्य गुप्तरूपानें तेथें आला. त्याला ब्रह्मदेवाकडून वर
मिळाला असल्यामुळें वीरश्री प्राप्त झाली होती. ॥६५॥ तो सकल अस्त्रविद्येंत निपुण होता. त्यानें आकाशांतून

बभूवुर्बलिनो हृष्टास्तदा पीतामृता[1] इव ॥ सीताभिमर्शपापेन रावणेनाभिपालि-
तान् ॥ ६३ ॥ हतश्रीकान्हतबलान्[2] राक्षसाञ्जघ्नुरोजसा[3] ॥ चतुर्थांशावशेषेण
निहतं राक्षसं बलम् ॥ ६४ ॥ स्वसैन्यं निहतं दृष्ट्वा मेघनादोऽथ दुष्टधीः ॥
ब्रह्मदत्तवरः श्रीमानन्तर्धानं[4] गतोऽसुरः ॥ ६५ ॥ सर्वास्त्रकुशलो व्योम्नि[5] ब्रह्मास्त्रे-
ण समंततः ॥ नानाविधानि शस्त्राणि वानरानीकमर्दयन्[6] ॥ ६६ ॥

( पू. ) बलिनः, हृष्टाः च बभूवुः, ॥ ( मू. ) ॥६३॥ ( पू. ) जघ्नुः ॥ ( मू. ) निहतं. ॥ ६४ ॥ अथ
दुष्टधीः ब्रह्मदत्तवरः श्रीमान् मेघनादः असुरः ( मू. ). ॥ ६५ ॥ ( पू. ) ब्रह्मास्त्रेण [ युतानि ] ॥
( मू. ) [ मुंचन ] वानरानीकं अर्दयन् [ सः ] ॥ ६६ ॥

१ प्राशन केलें अमृत ज्यांनीं, असे. २ नष्ट झाली वीरश्री ज्यांची, अशा. ३ पराक्रमानें. ४ गुप्तरूपास. ५ आकाशांत. ६ पीडा देणारा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ब्रह्मास्त्रासह अनेक प्रकारचीं शस्त्रें जिकडे तिकडे सोडून वानरसेनेची गाळण उडविली, ॥ ६६ ॥ आणि बाणसमूहाची सारखी वृष्टि चालविली. तो एक विलक्षणच प्रकार झाला. राम सकल अस्त्रज्ञ लोकांत श्रेष्ठ होता, पण ब्रह्मास्त्राला मान देण्यासाठीं ॥ ६७ ॥ क्षणभर स्वस्थ बसला. इतक्यांत वानरांचें सैन्य पतन पावत आहे असें रघुवीराला दिसून आलें. तेव्हां तो क्रुद्ध होऊन अग्नीप्रमाणें लाल झाला आणि - लक्ष्मणाला ह्मणाला :- ॥ ६८ ॥ 'लक्ष्मणा! धनुष्य आण ( धनुष्य रामाच्या हातांतच होतें पण क्रोधाच्या आवेशामुळें त्याला त्याचें भान राहिलें नाहीं ). मी ब्रह्मास्त्राच्या योगें सर्व राक्षससैन्याला भस्म करून टाकितों. रघुवीरा! आज माझा पराक्रम अवलोकन कर.' ॥ ६९ ॥ तो मायावी मेघनाद सावध राहून - रामसैन्यां-

ववर्ष शरजालानि तदद्भुतमिवाभवत् ॥ रामोऽपि मानयन्ब्राह्ममस्त्रमस्त्रविदां वरः ॥ ६७ ॥ क्षणं तूष्णीमुवासाथ ददर्श पतितं बलम् ॥ वानराणां रघुश्रेष्ठश्चुकोपानलसन्निभः ॥ ६८ ॥ चापमानय सौमित्रे ब्रह्मास्त्रेणासुरं क्षणात् ॥ भस्मीकरोमि मे पश्य बलमद्य रघूत्तम ॥ ६९ ॥ मेघनादोऽपि तच्छ्रुत्वा रामवाक्यमतन्द्रितः ॥ तूर्णं जगाम नगरं मायया मायिकोऽसुरः ॥ ७० ॥

[ रामोपरि ] शरजालानि ( पू. ). ॥ अस्त्रविदां वरः ( मू. ) मानयन् [ सन् ] । ६७ ॥ ( मू. ) रघुश्रेष्ठः वानराणां बलं पतितं ददर्श, चुकोप, [ आह च – ] ॥ ६८ ॥ 'सौमित्रे, ( मू. ) अद्य मे बलं पश्य.' ॥ ६९ ॥ अतन्द्रितः मायिकः असुरः ( पू. ) श्रुत्वा, मायया (मू.) जगाम. ॥७०॥

१ बाणसमूहांस. २ गुपचिप. ३ उवास राहिला. ४ संतापला. ५ आळस न धरणारा. ६ कपटी.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तील सर्व प्रकार पाहत होता. - रामाचें पूर्वोक्त भाषण त्याच्या कानीं गेलें. लागलाच त्यानें नगरचा मार्ग धरिला. ॥ ७० ॥ वानरसेना पतन पावली असें पाहून रामाला अत्यंत दुःख झालें. तो मारुतीला ह्मणाला :– 'हनुमंता ! लवकर क्षीरमहासागरावर जा. ॥ ७१ ॥ तेथें द्रोण नांवाचा एक पर्वत आहे; त्यावर उत्तम उत्तम ओषधि उगवत असतात. झटपट जाऊन तेवढा पर्वत घेऊन ये व ह्या महाप्रतापी वानरसमूहाला जिवंत कर. तूं महाबुद्धिमान् आहेस; - हें कार्य तुझ्या हातून सिद्धीस जाईल, अशी मला खात्री वाटते. - एवढें काम केलेंस ह्मणजे तुझी कीर्ति जगांत चिरकाल स्थिर राहील.' वायुपुत्र ( मारुति ) 'देवा ! तुझी आज्ञा प्रमाण' असें ह्मणून तत्क्षणीं निघून गेला. ॥ ७२ ॥ ७३ ॥ कांहीं वेळानें तो श्रेष्ठ वानर द्रोणपर्वत घेऊन

पतितं वानरानीकं दृष्ट्वा रामोऽतिदुःखितः ॥ उवाच मारुतिं शीघ्रं गत्वा क्षीरमहोदधिम् ॥ ७१ ॥ तत्र द्रोणगिरिर्नाम दिव्यौषधिसमुद्भवः ॥ तमानय द्रुतं गत्वा संजीवय महामते ॥ ७२ ॥ वानरौघान्महासत्त्वान्कीर्तिस्ते सुस्थिरा भवेत् ॥ आज्ञा प्रमाणमित्युक्त्वा जगामानिलनन्दनः ॥ ७३ ॥ आनीय च गिरिं सर्वान्वानरान्वानरर्षभः ॥ जीवयित्वा पुनस्तत्र स्थापयित्वाऽऽययौ द्रुतम् ॥ ७४ ॥

( पू. ) रामः ॥ मारुतिं उवाच – ' ( मू. ) गत्वा, ॥ ७१ ॥ ( ७२ पू. ) [ पर्वतः अस्ति; तत्र ] गत्वा, द्रुतं ( ७२ उ. ), महासत्त्वान् वानरौघान् संजीवय[1]. ते ( ७३ पू. ).' अनिलनन्दनः[2] ( मू. ). ॥ ७२ ॥ ७३ ॥ वानरर्षभः गिरिं ( मू. ) आययौ. ॥ ७४ ॥

---

१ जीवंत कर. २ वायुपुत्र ( मारुति ).

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

'सर्व वीरांनीं युद्धास जावें.'

आला व सर्व वानरांना जिवंत करून आणि तो पर्वत पुन्हां जागच्या जाग्यावर नेऊन ठेवून सत्वर परत आला. ॥ ७४ ॥ वानरांचा सेनासमूह पूर्वींप्रमाणें भयंकर गर्जना करूं लागला. तो शब्द ऐकून रावणाला आश्चर्य वाटलें. तो राक्षसांना ह्मणाला :– ॥ ७५ ॥ 'रामचंद्र हा देवांनीं उत्पन्न केलेला माझा एक प्रबल शत्रु येथें येऊन पोंचला खरा! युद्धांत त्याचा वध करण्यासाठीं माझ्या सेनापतींनीं लवकर चलावें. ॥७६॥ मंत्री, बांधव जे जे कोणी शूर पुरुष माझें प्रिय करावें असें इच्छीत असतील त्या सर्वांनीं माझ्या आज्ञेस्तव युद्धास जावें. ॥ ७७ ॥ जे कोणी भित्रे राक्षस मृत्यूला भिऊन युद्धाला जाणार नाहींत, ते माझी आज्ञा मोडितात असें समजून मी त्यांचा वध करीन!' ॥ ७८ ॥

पूर्ववद्भैरवं नादं वानराणां बलौघतः ॥ श्रुत्वा विस्मयमापन्नो रावणो वाक्यमब्रवीत् ॥७५॥ राघवो मे महान् शत्रुः प्राप्तो देवविनिर्मितः ॥ हन्तुं तं समरे शीघ्रं गच्छन्तु मम यूथपाः ॥ ७६॥ मन्त्रिणो बान्धवाः शूरा ये च मत्प्रियकांक्षिणः ॥ सर्वे गच्छन्तु युद्धाय त्वरितं मम शासनात् ॥ ७७ ॥ ये न गच्छन्ति युद्धाय भीरवः प्राणविप्लवात् ॥ तान्हनिष्याम्यहं सर्वान्मच्छासनपराङ्मुखान् ॥ ७८ ॥

( पू. ) भैरवं नादं ॥ ( मू. ) – ॥७५॥ 'देवनिर्मितः ( पू. ) राघवः प्राप्तः. ॥ मम यूथपाः समरे तं ( मू. ). ॥ ७६ ॥ ( पू. ), ते च ( मू. ) त्वरितं युद्धाय गच्छन्तु. ॥ ७७ ॥ ( पू. ) ये भीरवः युद्धाय न गच्छन्ति, ॥ अहं ( मू. ) हनिष्यामि. ' ॥ ७८ ॥

१ भयंकर. २ प्राणनाशास्तव. ३ भित्रे.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ती आज्ञा ऐकिल्यावर, सगळे युद्धनिपुण राक्षस भयभीत होऊन युद्धाला निघाले : अतिकाय, प्रहस्त, महानाद, महोदर, ॥७९॥ देवशत्रु, निकुंभ, देवांतक, नरांतक, व दुसरेही सगळे बलाढ्य राक्षस वानरांशीं युद्ध करण्याकरितां निघाले. ॥८०॥ हे व दुसरेही पुष्कळ शेंकडों हजारों शूर राक्षस वानरसैन्यांत शिरून त्या सैन्याची दाणादाण करीत सुटले. राक्षसांना आपल्या शक्तीचा मोठा अभिमान असे. ॥८१॥ त्यांनीं भुशुंडि, भिंदिपाल, बाण, खड्ग, कुऱ्हाडी, ह्या व दुसऱ्याही विविध अस्त्रांचे वानरसेनापतींवर प्रहार चालविले. ॥८२॥ ते वानरही पर्वतांचीं शिखरें, नखें, दाढा, बुद्के ह्या शस्त्रांचे प्रहार करून सर्व राक्षससेनापतींचे प्राण

तच्छ्रुत्वा भयसंत्रस्ता निर्जग्मू रणकोविदा[1]: ॥ अतिकायः प्रहस्तश्च महानादमहोदरौ ॥ ७९ ॥ देवशत्रुर्निकुम्भश्च देवान्तकनरान्तकौ ॥ अपरे बलिनः सर्वे ययुर्युद्धाय वानरैः ॥ ८० ॥ एते चान्ये च बहवः शूराः शतसहस्रशः ॥ प्रविश्य वानरं सैन्यं ममन्थु[3]र्बलदर्पिताः ॥ ८१ ॥ भुशुण्डिभिर्भिन्दिपालैश्च बाणैः खड्गैः परश्वधै[4]: ॥ अन्यैश्च विविधैरस्त्रैर्निजघ्नुर्हरियूथपान् ॥ ८२ ॥ ते पादपैः पर्वताग्रैर्नखदंष्ट्रैश्च मुष्टिभिः ॥ प्राणैर्विमोचयामासुः[5] सर्वराक्षसयूथपान् ॥ ८३ ॥

( पू. ) निर्जग्मुः. ॥ ( मू. ), ॥ ७९ ॥ ( मू. ) [सह] युद्धाय ययुः. ॥ ८० ॥ ( पू. ) बलदर्पिताः शूराः वानरं सैन्यं ( मू. ), ॥ ८१ ॥ ( मू. ) निजघ्नुः. ॥ ८२ ॥ ते वानराः ( पू. ) ॥ च सर्वराक्षसयूथपान ( मू. ). ॥ ८३ ॥

---

१ युद्धांत निपुण. २ बाहेर पडले. ३ मंथन करिते झाले. ४ कुऱ्हाडींनीं. ५ सोडविते झाले.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

वानरांना शक्ति आली कोठून ?

शरीरांतून बाहेर ओढून काढूं लागले ! ॥८३॥ कित्येक राक्षस रामानें मारिले, दुसरे सुग्रीवानें मारिले, कांहीं मारुतीनें, कांहीं अंगदानें, कांहीं महाप्रतापी लक्ष्मणानें व बाकीचे दुसऱ्या सेनापतींनीं; एकंदरींत ते सर्व राक्षस मृत्यु पावले ! ॥ ८४ ॥ वानरांच्या आंगांत रामाची शक्ति संचरली होती ह्मणून ते बलाढ्य झाले. रामाची शक्ति आंगांत नसती, तर त्यांना इतकी शक्ति आली असती कोठून ? ॥८५॥ राम ह्मणजे सर्वशक्तिसंपन्न सर्वरूपी जगत्कर्ता ईश्वर होय. तो नित्य ज्ञानानंदमय असूनही मायेनें मनुष्यरूपाचें अनुकरण करीत राहिला होता ह्मणून युद्धादिलीलारूप माया विस्तृत करीत असे. ॥ ८६ ॥ इति पञ्चमः सर्गः ॥ ५ ॥

रामेण निहताः केचित्सुग्रीवेण तथाऽपरे ॥ हनूमता चांगदेन लक्ष्मणेन महात्मना ॥ यूथपैर्वानराणां ते निहताः सर्वराक्षसाः ॥ ८४ ॥ रामतेजः समाविश्य वानरा बलिनोऽभवन् ॥ रामशक्तिविहीनानामेवं शक्तिः कुतो भवेत् ॥८५॥ सर्वेश्वरः सर्वमयो विधाता मायामनुष्यत्वविडम्बनेन ॥ सदाचिदानन्दमयोऽपि रामो युद्धादिलीलां वितनोति मायाम् ॥ ८६ ॥ इति श्रीम० युद्धकाण्डे पञ्चमः सर्गः ॥ ५॥

केचित् (पू.) सुग्रीवेण, ॥ (द्वि.) लक्ष्मणेन च निहताः. ॥ वानराणां (मू.) निहताः. ॥ ८४ ॥ वानराः (मू.) ? ॥८५॥ (मू.) मायामनुष्यत्वविडम्बनेन युद्धादिलीलां मायां वितनोति. ॥८६॥

॥ इति श्रीमदध्यात्मरामायणान्वये युद्धकाण्डे पंचमः सर्गः ॥ ५ ॥

१ मारिलेले. २ पावून. ३ विस्तारितो.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

अतिकाय ज्याचा नायक तें सगळें प्रचंड सैन्य युद्धांत नष्ट झालें, ही वार्ता कानीं आली तेव्हां दुःखामुळें रावणाचें सर्वांग तप्त होऊन गेलें व तो अतिशय क्रुद्ध झाला. ॥ १ ॥ त्या महातेजस्वी राक्षसानें इंद्रजिताला लंकेचें रक्षण करण्यासाठीं मागें ठेवून रामाबरोबर युद्ध करण्यास स्वतां जाण्याची तयारी केली. ॥ २ ॥ तो महाप्रतापी राक्षसेश्वर सर्व शस्त्रास्त्रांनीं भरलेल्या दिव्य रथांत बसून तडक रामाच्या आंगावर चालून गेला. ॥ ३ ॥ त्यानें सर्पांसारखे उग्र बाण सोडून अनेक वानर मारिले व सुग्रीवप्रभृति यूथपतींना भूमीवर पाडिलें. ॥ ४ ॥ इतक्यांत, महाशक्तिमान् विभीषण हातांत गदा घेऊन - राक्ष·

श्रुत्वा युद्धे बलं नष्टमतिकायमुखं महत् ॥ रावणो दुःखसंतप्तः क्रोधेन महता ऽऽवृतः ॥१॥ निधायेन्द्रजितं लंकारक्षणार्थं महाद्युतिः ॥ स्वयं जगाम युद्धाय रामेण सह राक्षसः ॥२॥ दिव्यं स्यन्दनमारुह्य सर्वशस्त्रास्त्रसंयुतम् ॥ राममेवाभिदुद्राव राक्षसेन्द्रो महाबलः ॥३॥ वानरान्बहुशो हत्वा बाणैराशीविषोपमैः ॥ पातयामास सुग्रीवप्रमुखान्यूथनायकान् ॥४॥ गदापाणिं महासत्वं तत्र दृष्ट्वा विभीषणम् ॥

रावणः ( पू. ) बलं नष्टं श्रुत्वा ॥ दुःखसन्तप्तः [सन्] महता ( मू. ) [ बभूव ]. ॥ १ ॥ महाद्युतिः राक्षसः ( पू. ) निधाय, ॥ ( मू. ) युद्धाय जगाम.. ॥ २ ॥ महाबलः राक्षसेन्द्रः सर्वशस्त्रास्त्रसंयुतं ( मू. ), ॥ ३ ॥ आशीविषोपमैः बाणैः ( मू. ) पातयामास. ॥ ४ ॥ तत्र ( पू. ) दृष्ट्वा, ॥

---

१ महातेजस्वी. २ ठेवून. ३ आंगावर चालून गेला. ४ ज्यांच्या दाढांत विष असतें त्यांच्या ( सर्पांच्या ) सारख्या.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मयशक्ति लक्ष्मणाला लागते.

सांबरोबर युद्ध करीत आहे असें - दृष्टीस पडलें; तेव्हां रावणानें बिभीषणावर मयासुरानें ( स्वतांच्या सासऱ्यानें, मंदोदरीच्या पित्यानें ) दिलेली प्रचंड शक्ति सोडिली. ॥ ५ ॥ ती शक्ति बिभीषणाचा घात करण्यासाठीं येत आहे, असें पाहून लक्ष्मणानें विचार केला कीं, बिभीषणाला रामानें अभय दिलें आहे, ह्मणून ह्या दैत्याचा वध होणें योग्य नव्हे; - मजवर ह्या शक्तीचें कांहीं चालणार नाहीं. - ॥६॥ असें आपल्याशींच ठरवून, तो प्रतापी लक्ष्मण हातांत भयंकर धनुष्य घेऊन बिभीषणापुढें पर्वतासारखा निश्चळपणें उभा राहिला. ॥ ७ ॥ त्या शक्तीचें सामर्थ्य अमोघ ( फुकट न जाणारें ) होतें; ती लक्ष्मणाच्या आंगावर येऊन पडली. मायेपासून उत्पन्न होणाऱ्या जितक्या ह्मणून शक्ति जगांत आहेत, ॥ ८ ॥ तितक्या सगळ्यांचा आधार लक्ष्मण होय; कारण, तो महात्मा शेषाचा अंश अर्थात परमेश्वराची विभूति होता. त्याचें ही मायाशक्ति

उत्ससर्ज महाशक्तिं मयदत्तां विभीषणे ॥ ५ ॥ तामापतन्तीमालोक्य विभीषणविघातिनीम् ॥ दत्ताभयोऽयं रामेण वधार्हो नायमासुरः ॥ ६ ॥ इत्युक्त्वा लक्ष्मणो भीमं चापमादाय वीर्यवान् ॥ विभीषणस्य पुरतः स्थितोऽकंप इवाचलः ॥ ७ ॥ सा शक्तिर्लक्ष्मणतनुं विवेशामोघशक्तितः ॥ यावन्त्यः शक्तयो लोके मायायाः संभवन्ति हि ॥ ८ ॥ तासामाधारभूतस्य लक्ष्मणस्य महात्मनः ॥

मयदत्तां ( मू. ) उत्ससर्ज. ॥ ५ ॥ वीर्यवान् लक्ष्मणः ( ६ पू. ) [ शक्तिं ] आलोक्य, ॥ ' अयं रामेण ( ६ उ. ) वधार्हः न, ' ॥( मू. ) इव स्थितः. ॥ ६ ॥ ७ ॥ ( पू. ) लक्ष्मणतनुं विवेश. ॥ हि लोके ( मू. ) मायायाः सम्भवन्ति, ॥ ८ ॥ ( मू. ) लक्ष्मणस्य ॥

१ सोडिता झाला. २ निश्चल. ३ पर्वत. ४ निष्फळ न जाणारें सामर्थ्य जिचें अशी असल्यामुळें. ५ लक्ष्मणाच्या शरीरास. ६ शिरली.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

करणार काय? ॥ ९ ॥ तथापि तो स्वतां अंगिकारिलेल्या मनुष्यरूपास अनुकूल असें वर्तन ठेवण्यासाठीं, मूर्छित होऊन भूमीवर पडला. रावण त्याला उचलण्याची खटपट करूं लागला; ॥ १० ॥ हातांनीं किती हिसकाहिसक केली तरी लक्ष्मण किंचित् देखील हालेना, तेव्हां रावणाला पराकाष्ठेचा विस्मय वाटला. (शंकर ह्मणाले:- पार्वति!) लक्ष्मण ह्मणजे सर्व जगाचें सार होय; विराट् (स्थूल जग) त्याचेंच रूप; तो परमेश्वर ॥ ११ ॥ सर्व लोकांचा आधार असून व्यापक आहे. त्याला तोलणें किंवा उचलणें यःकश्चित् राक्षसाच्या हातून व्हावें कसें? असो. रावणाच्या मनांत लक्ष्मणाला घेऊन जावयाचें आहे, असें मारुतीला दिसून आलें. ॥ १२ ॥ तेव्हां त्यानें संतापून आपल्या वज्रतुल्य मुष्टीच्या योगें रावणाच्या वक्षःस्थलावर

मायाशक्त्या भवेत्किं वा शेषांशस्य हरेस्तनोः ॥९॥ तथापि मानुषं भावमापन्न-
स्तदनुव्रतः ॥ मूर्च्छितः पतितो भूमौ तमादातुं दशाननः ॥१०॥ हस्तैस्तोलयितुं[1]
शक्तो न बभूवातिविस्मितः ॥ सर्वस्य जगतः सारं विराजं परमेश्वरम् ॥ ११ ॥
कथं लोकाश्रयं विष्णुं तोलयेल्लघुराक्षसः ॥ ग्रहीतुकामं[2] सौमित्रिं रावणं वीक्ष्य
मारुतिः ॥ १२ ॥ आजघानोरसि क्रुद्धो वज्रकल्पेन[3] मुष्टिना ॥

(मू.) मायाशक्त्या किं वा भवेत् ? ॥९॥ (पू.) ॥ मूर्छितः [सन्] भूमौ (मू.) तं आदातुं, ॥१०॥ (पू.); [तेन] अतिविस्मितः [आसीत्]. ॥ (मू.) ॥११॥ (पू.) लघुराक्षसः कथं तोलयेत् ? ॥ मारुतिः सौमित्रिं (मू.) वीक्ष्य ॥ १२ ॥ क्रुद्धः [सन्] (पू.) उरसि आजघान[4]. ॥

१ उचलण्यास. २ धरण्यास इच्छिणारा. ३ वज्रापेक्षां किंचित् न्यून, अशा. ४ मारिता झाला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

एकच प्रहार केला. त्याबरोबर रावण गुडघे टेंकून धाडकन भूमीवर पडला! ॥ १३ ॥ तोंडांतून, डोळ्यांतून व नाकांवाटे भडभडां रक्त वाहूं लागलें! डोळे पांढरे झाले! कसें बसें करून एकदांचा तो रथाच्या पाठी-मागें जाऊन चढून बसला! ॥ १४ ॥ इकडे मारुति, रावणानें घायाळ करून सोडिलेल्या लक्ष्मणाला बाहूंनीं कवटाळून उचलून, रामाजवळ घेऊन आला. ॥ १५ ॥ तो जन्मरहित स्वयंप्रकाश परमेश्वर ( लक्ष्मण ) सर्व जड पदार्थांपेक्षां अतिशय जड ( वजनदार ) होता खरा; परंतु मारुतीच्या प्रेमामुळें व भक्तीस्तव लघु ( हलका ) झाला ( त्याला उचलतांना मारुतीला आयास मुळींच पडला नाहीं ). ॥ १६ ॥ लक्ष्मणाला लागलेल्या शक्तीलाही कळून आलें कीं, हा ( लक्ष्मण ) नारायणाचा अंशावतार आहे; ह्मणून ती लक्ष्म-

तेन मुष्टिप्रहारेण जानुभ्यामपतद्भुवि ॥ १३ ॥ आस्यैश्च नेत्रश्रवणैरुद्वमन् रुधिरं बहु ॥ विघूर्णमाननयनो रथोपस्थ उपाविशत् ॥ १४ ॥ अथ लक्ष्मणमादाय हनूमान् रावणार्दितम् ॥ आनयद्रामसामीप्यं बाहुभ्यां परिगृह्य तम् ॥ १५ ॥ हनूमतः सुहृत्त्वेन भक्त्या च परमेश्वरः ॥ लघुत्वमगमद्देवो गुरूणां गुरुरप्यजः॥१६॥ सा शक्तिरपि तं त्यक्त्वा ज्ञात्वा नारायणांशजम् ॥

( मू. ) अपतत्, ॥ १३ ॥ ( पू. ) च बहु रुधिरं उद्वमन ॥ विघूर्णमाननयनः [सन्] ( मू. ).॥१४॥ ( पू. ) लक्ष्मणं आदाय, ॥ ( मू. ) [ च ] तं रामसामीप्यं आनयत्. ॥ १५ ॥ देवः गुरूणां गुरुः अपि अजः परमेश्वरः ( मू. ). ॥ १६ ॥ ( पू. ) ज्ञात्वा, त्यक्त्वा, ॥

१ गुडघ्यांच्या योगें. २ रथाच्या मागील बाजूस. ३ बसला. ४ जड पदार्थांत. ५ हलकेपणास. ६ अगमत् पावला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

णाला सोडून रावणाच्या रथाकडे परत गेली. पुढें रावणही हळूहळू ॥ १७ ॥ शुद्धीवर आला. - शूरच तो ! जरा अवसान आल्याबरोबर - लागलाच क्रोधानें धनुष्य हातीं घेऊन तडक रामाच्या आंगावर चालून गेला. त्याला पाहतांच रामही क्रुद्ध झाला. ॥ १८ ॥ रावण रथांत बसला आहे असें पाहून, जगत्प्रभु रामचंद्र तत्क्षणीं महापराक्रमी हनुमंताच्या खांद्यावर बसला आणि रावणासमोर येऊन उभा राहिला. ॥ १९ ॥ रामानें विजेच्या कडकडाटाप्रमाणें कठोर असा आपल्या धनुष्याच्या दोरीचा तीव्र टणत्कार केला, आणि गंभीर वाणीनें राक्षसाधिपतीला ह्मटलें :- ॥ २० ॥ ' हे राक्षसाधमा ! उभा राहा ! माझी सर्वत्र समदृष्टि असते ( मी कोणाशीं द्वेष करीत नाहीं ); असें अस-

रावणस्य रथं प्रागाद्रावणोऽपि शनैस्ततः ॥ १७॥ संज्ञामवाप्य जग्राह बाणास-
नमथो रुषा ॥ राममेवाभिदुद्राव दृष्ट्वा रामोऽपि तं क्रुधा ॥ १८ ॥ आरुह्य जग-
तां नाथो हनूमन्तं महाबलम् ॥ रथस्थं रावणं दृष्ट्वा अभिदुद्राव राघवः ॥ १९ ॥
ज्याशब्दमकरोत्तीव्रं वज्रनिष्पेषनिष्ठुरम् ॥ रामो गम्भीरया वाचा राक्षसेन्द्रमुवाच
ह ॥ २० ॥ राक्षसाधम तिष्ठाद्य क्व गमिष्यसि मे पुरः ॥

( मू. ) रावणः अपि शनैः ॥१७॥ ( पू. ) बाणासनं जग्राह, ॥ ( मू. ) दृष्ट्वा क्रुधा [अभिदुद्राव]. ॥ १८ ॥ जगतां नाथः राघवः रावणं रथस्थं दृष्ट्वा, महाबलं हनूमन्तं ( मू. ), ॥ १९ ॥ ( पू. ) ज्याशब्दं अकरोत्. ॥ ( मू. ) – ॥ २० ॥ ' ( पू. ) तिष्ठ.

१ गेली. २ शुद्धीस. ३ पावून. ४ धनुष्य. ५ घेता झाला. ६ विजेच्या घर्षणा(कडकडाटा)सारख्या कठोर. ७ धनुष्याच्या दोरीच्या टणत्काराला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तांना तूं माझा असह्य अपराध केलास! आतां आज माझ्या पुढून जाशील कोठें? ॥ २१ ॥ ज्या बाणानें जनस्थानीं तुझ्या राक्षसांचा घात केला, त्याच्याच योगें आज मी तुझा वध करितों! मजसमोर उभा राहा!' ॥ २२ ॥ श्रीरामचंद्राचें भाषण ऐकिल्यावर रावणानें, युद्धांत रामाला खांद्यावर वाहणाऱ्या मारुतीला तीक्ष्ण बाण मारिले. ॥ २३ ॥ तीव्र बाणांचे प्रहार लागले तरी वायुपुत्राचें तेज स्वतांच्या प्रभावानें उत्तरोत्तर वृद्धिंगतच होत चाललें. त्या महावानरानें मोठी गर्जना केली. ॥ २४ ॥ हनुमंताच्या शरीरावर व्रण झाले असें दृष्टीस पडल्याबरोबर रघुवीरानें क्रोधाचा इतका आवेश आणिला कीं त्यावेळीं, तो दुसरा प्रलयकालचा रुद्रच आहे कीं काय, असें

कृत्वा ऽपराधमेवं मे सर्वत्र समदर्शिनः ॥ २१ ॥ येन बाणेन निहता राक्षसास्ते जनालये[१] ॥ तेनैव त्वां हनिष्यामि तिष्ठाद्य मम गोचरे[२] ॥ २२ ॥ श्रीरामस्य वचः श्रुत्वा रावणो मारुतात्मजम् ॥ वहन्तं राघवं संख्ये शरैस्तीक्ष्णैरताडयत् ॥ २३ ॥ हतस्यापि शरैस्तीक्ष्णैर्वायुसूनोः स्वतेजसा ॥ व्यवर्धत पुनस्तेजो ननर्द च महाकपिः ॥ २४ ॥ ततो दृष्ट्वा हनूमन्तं सव्रणं रघुसत्तमः ॥

( मू. ) मे एवं अपराधं कृत्वा क्व गमिष्यसि? ॥२१॥ ( पू. ) राक्षसाः निहताः, ॥ ( मू. ) तिष्ठ.' ॥ २२ ॥ रावणः ( पू. ), संख्ये[३] राघवं वहन्तं[४] मारुतात्मजं तीक्ष्णैः ( मू. ). ॥ २३ ॥ तीक्ष्णैः शरैः ( पू. ) तेजः पुनः स्वतेजसा ( मू. ) ननर्द[६] च. ॥ २३ ॥ ततः रघुसत्तमः ( पू. ) दृष्ट्वा, ॥

१ जनस्थानीं ( पंचवटीजवळ ). २ दृष्टासमोर. ३ युद्धांत. ४ वाहणाऱ्या. ५ वाढत चाललें. ६ गर्जना करूं लागला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

भासूं लागलें! ॥ २५ ॥ त्यानें तीक्ष्ण बाण मारून रावणाचा रथ, घोडे, ध्वज, सारथि, शस्त्रसमूह, धनुष्य, छत्र, पताका, सगळें साहित्य क्षणमात्रांत सहज तोडून टाकिलें! ॥२६॥ पुढें, जसें पूर्वी इंद्रानें पर्वतावर वज्र सोडिलें त्याप्रमाणें, रघुवीरानें तत्काल एक वज्रतुल्य प्रचंड बाण रावणाला मारिला. ॥ २७ ॥ रामबाणाच्या प्रहाराबरोबर त्या वीराचें शरीर थरथर कांपूं लागलें, त्याला मूर्छा आली, व धनुष्य तर हातांतून गळून पडलें! ती त्याची अवस्था दृष्टीस पडल्यावर रघुवीरानें ॥ २८ ॥ एक अर्धचंद्राकृति बाण मारून त्याचा सूर्यासारखा तेजस्वी मुकुट तोडिला, - आणि त्याला सांगितलें : - ' रावणा! जा. सध्यां तूं

क्रोधमाहारयामास कालरुद्र इवापरः ॥२५॥ साश्वं रथं ध्वजं सूतं शस्त्रौघं धनुरञ्जसा ॥ छत्रं पताकां तरसा चिच्छेद शितसायकैः ॥ २६ ॥ ततो महाशरेणाशु रावणं रघुसत्तमः ॥ विव्याध वज्रकल्पेन पाकारिरिव पर्वतम् ॥ २७ ॥ रामबाणहतो वीरश्चचाल च मुमोह च ॥ हस्तान्निपतितश्चापस्तं समीक्ष्य रघूत्तमः॥२८॥ अर्धचन्द्रेण चिच्छेद तत्किरीटं रविप्रभम् ॥

अपरः कालरुद्रः इव, ( मू. ), ॥ २५ ॥ ( मू. ) च शितसायकैः, अंजसा, तरसा चिच्छेद. ॥२६॥ ततः रघुसत्तमः वज्रकल्पेन ( मू. ) इव विव्याध. ॥ २७ ॥ ( मू. ) निपतितः च ! रघूत्तमः तं समीक्ष्य, ॥ २८ ॥ ( पू. ) तत्किरीटं चिच्छेद, [ उवाच – च ] ॥

१ स्वीकारिता झाला. २ तीक्ष्ण बाणांच्या योगें. ३ सहज. ४ वेगानें. ५ तोडिता झाला. ६ वज्रतुल्य. ७ पाक दैत्याचा शत्रु ( इंद्र ). ८ प्रहार करिता झाला. ९ कांपला. १० मूर्छा पावला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

'रावणा! आज दमलास. आतां उद्यां ये.'

बाण लागून घायाळ झाला आहेस; मी तुला जाण्यास अनुज्ञा देतों. ॥ २९ ॥ लंकेंत जा. आजचा दिवस विश्रांति घेऊन स्वस्थ हो. मग उद्यां, माझें सामर्थ्य कसें काय आहे, तें तुला पाहतां येईल.' रामाच्या बाणाचा चांगलाच प्रहार लागून गर्व उतरला, तेव्हां रावण ॥३०॥ व्याकुळ व अत्यंत लज्जित होऊन लंकेंत गेला. इकडे रामही, लक्ष्मण भूमीवर निश्चेष्ट पडला आहे, असें पाहून ॥ ३१ ॥ शोक करूं लागला. मनुष्यपणा स्वीकारिला असल्यामुळें त्याला ही लीला करणें भाग पडलें. कांहीं वेळानें तो मारुतीला म्हणाला :– 'वत्सा! पूर्वीप्रमाणें त्या दिव्य ओषधि आणून लक्ष्मणाला आणि वानरांनाही जीवंत कर.' रामानें अशी

अनुजानामि गच्छ त्वमिदानीं बाणपीडितः ॥ २९ ॥ प्रविश्य लंकामाश्वा[१]स्य श्वः[२] पश्यसि बलं मम ॥ रामबाणेन संविद्धो[३] हतदर्पो[४]ऽथ रावणः ॥३०॥ महत्या लज्जया युक्तो लंकां प्राविशदातुरः ॥ रामोऽपि लक्ष्मणं दृष्ट्वा मूर्छितं पतितं भुवि ॥ ३१ ॥ मानुषत्वमुपाश्रित्य लीलयाऽनुशुशोच ह ॥ ततः प्राह हनूमन्तं वत्स जीवय लक्ष्मणम् ॥ ३२ ॥ महौषधीः समानीय पूर्ववद्वानरानापि ॥ तथेति राघवेणोक्तो जगामाशु महाकपिः ॥ ३३ ॥

'(मू.) गच्छ. ॥ २९ ॥ लङ्कां (पू.) बलं पश्यासि!' ॥ अथ (मू.) ॥३०॥ (पू.) [सन्] लङ्कां प्राविशत्. ॥ (मू.) पतितं [च] दृष्ट्वा, ॥ ३१ ॥ (मू.) प्राह – 'वत्स, लक्ष्मणं जीवय. ॥ ३२ ॥ (३३ पू) [जीवय].' ॥ (३३ उ.)

१ स्वस्थ होऊन. २ उद्यां. ३ ताडिलेला. ४ नाहींसा झाला गर्व ज्याचा, असा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आज्ञा दिल्याबरोबर तो महावानर ' ठीक आहे ' असें ह्मणून निघाला. ॥ ३२ ॥ ३३ ॥ मारुति वायूसारख्या वेगानें क्षणमात्रांत महासागर उल्लंघून पलिकडे गेला. इतक्यांत ती वार्ता हेरांनीं रावणाला कळविली : - ते ह्मणाले :- ॥ ३४ ॥ ' महाराज! रामानें लक्ष्मणाला जिवंत करण्यासाठीं दिव्य ओषधि आणण्याकरितां मारुतीला पाठविलें; त्याप्रमाणें तो क्षीरसमुद्राकडे गेला! ' ॥ ३५ ॥ तें दूतांचें भाषण ऐकिल्याबरोबर राजाला पराकाष्ठेची चिंता उद्भवली; तो तशा रात्रीच्या वेळीं एकाकी निघून क्षणमात्रांत कालनेमीच्या घरीं गेला. ॥ ३६ ॥ रावण आपल्या घरीं आला असें पाहून कालनेमीला विस्मय वाटला. त्यानें आगो-

हनूमान्वायुवेगेन क्षणात्तीर्त्वा महोदधिम् ॥ एतस्मिन्नन्तरे चारा रावणाय न्यवेदयन् ॥ ३४ ॥ रामेण प्रेषितो देव हनूमान् क्षीरसागरम् ॥ गतो नेतुं लक्ष्मणस्य जीवनार्थं महौषधीः ॥३५॥ श्रुत्वा तच्चारवचनं राजा चिन्तापरोऽभवत् ॥ जगाम रात्रावेकाकी कालनेमिगृहं क्षणात् ॥ ३६ ॥ गृहागतं समालोक्य रावणं विस्मयान्वितः ॥ कालनेमिरुवाचेदं प्राञ्जलिर्भयविह्वलः ॥ अर्घ्यादिकं ततः कृत्वा रावणस्याग्रतः स्थितः ॥ ३७ ॥

हनूमान् तथा इति [ उक्त्वा ], ( ३४ पू. ) तीर्त्वा आशु जगाम. ( मू. ) – ॥ ३३ ॥ ३४ ॥ ' देव, ( मू. ) नेतुं क्षीरसागरं गतः. ' ॥ ३५ ॥ राजा तच्चारवचनं ( मू. ) जगाम. ॥ ३६ ॥ रावणं ( मू. ) ततः रावणस्य अग्रतः स्थितः कालनेमिः प्राञ्जलिः [ सन् ] इदं उवाच – ॥ ३७ ॥

१ तरून. २ दूत. ३ कळविते झाले.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

दर रावणाला अर्ध्यादिक पूजोपचार अर्पण केले, आणि नंतर भीतीमुळें कांपत कांपत पुढें उभा राहून व हात जोडून त्याला ह्मटलें. :- ॥ ३७ ॥ ' राजाधिराजा! मी आपली कोणती सेवा करावी? आपण इकडे कोणत्या उद्देशास्तव येणें केलें? ' रावण दुःखानें अगदीं त्रासून गेला होता; त्यानें कालनेमीला उत्तर दिलें:- ॥ ३८ ॥ ' बा! कालचक्राच्या गर्तानें मजवरही हें संकट येऊन कोसळलें आहे! मी मारलेल्या शक्तीचा प्रहार लागून वीर लक्ष्मण भूमीवर पडला. ॥ ३९ ॥ त्याला जिवंत करण्यासाठीं औषधि आणण्याकरितां मारुति गेला आहे. - ह्या वेळीं माझें तुला एवढेंच सांगणें आहे कीं, - मारुतीला जेणें करून विघ्न होईल, अशी कांहीं तजवीज कर. तूं मोठा बुद्धिमान् आहेस; - तुझ्या हातून हें काम निःसंशय पार पडेल. - ॥ ४० ॥ तूं कपटानें मुनिवेष धारण करून त्या प्रबल वानराला फसव आणि उद्यां उजाडेपर्यंत त्याचा वेळ[1]

' उजाडेपर्यंत त्याला इकडे ये-ऊं देऊं नको.'

किं ते करोमि राजेन्द्र किमागमनकारणम् ॥ कालनेमिमुवाचेदं रावणो दुःख-पीडितः ॥ ३८ ॥ ममापि कालवशतः कष्टमेतदुपस्थितम् ॥ मया शक्त्या हतो वीरो लक्ष्मणः पतितो भुवि ॥ ३९ ॥ तं जीवयितुमानेतुमोषधीर्हनुमान् गतः ॥ यथा तस्य भवेद्विघ्नं तथा कुरु महामते ॥ ४० ॥ मायया मुनिवेषेण मोहयस्व महाकपिम् ॥ कालात्ययो यथा भूयात्तथा कृत्वैहि मन्दिरे ॥ ४१ ॥

' राजेन्द्र, ते (पू.) किं? '॥ दुःखपीडितः रावणः (मू.) उवाच - ॥ ३८ ॥ ' (पू.) कष्टं उपस्थितं! ॥ (मू.) पतितः. ॥३९॥ (पू.) आनेतुं हनुमान् गतः. ॥ महामते, (मू.) भवेद्, तथा कुरु. ॥ ४० ॥ (पू.) मोहयस्व. ॥ (मू.) एहि.[2] ' ॥ ४१ ॥

१ वेळ घालविणें (विलंब लागणें). २ ये.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तिकडे मोडेल अशी व्यवस्था करून नंतर आपल्या मंदिरांत परत ये. ' ॥ ४१ ॥ रावणाचें भाषण ऐकि-ल्यावर कालनेमि त्याला ह्मणाला :– " राजा रावणा ! मी आतां काय सांगतों, तें ऐक व खरें समजून नीट लक्ष्यांत वागव. ॥ ४२ ॥ तुझ्या मनाला प्रिय वाटेल ती गोष्ट मी करणारच; - पण तसें केलें असतां-माझे प्राण राहणार नाहींत ! पूर्वीं मारीच दैत्य हरणाचें रूप घेऊन अरण्यांत गेला होता, त्याची जशी अवस्था झाली, ॥ ४३ ॥ तशीच माझी होणार, ह्यांत संदेह नाहीं ! ! रावणा ! तुझे पुत्र, पौत्र, बांधव वगैरे सर्व राक्षस मरण पावले ! ॥४४॥ अशा रीतीनें राक्षसकुलाचा नाश करविल्यावर तुला जगून तरी काय करावयाचें आहे ? राज्य, सीता किंवा हा जडस्वरूपी देह ह्या सगळ्याचा तुला उपयोग कोणता ? ॥ ४५ ॥

रावणस्य वचः श्रुत्वा कालनेमिरुवाच तम् ॥ रावणेश वचो मे ऽद्य शृणु धारय[1]
तत्त्वतः ॥ ४२ ॥ प्रियं ते करवाण्येव न प्राणान् धारयाम्यहम् ॥ मारीचस्य यथा
ऽरण्ये पुरा ऽभून्मृगरूपिणः ॥ ४३ ॥ तथैव मे न संदेहो भविष्यति दशानन ॥
हताः पुत्राश्च पौत्राश्च बान्धवा राक्षसाश्च ते ॥ ४४ ॥ घातयित्वा[2] ऽसुरकुलं जीवि-
तेनापि किं तव ॥ राज्येन वा सीतया वा किं देहेन जडात्मना[3] ॥ ४५ ॥

कालनेमिः ( पू. ) उवाच – ॥ 'ईश रावण, अद्य मे ( मू. ) तत्त्वतः धारय. ॥४२॥ अहं ते ( पू. ) न धारयामि. ॥ यथा पुरा ( मू. ) मारीचस्य अभूत्, ॥ ४३ ॥ दशानन, ( पू. ) संदेहः न. ॥ ते ( मू. ) च हताः. ॥ ४४ ॥ असुरकुलं ( पू. ) किं ? ॥ ( मू. ) देहेन वा किं ? ॥ ४५ ॥

१ लक्ष्यांत घे. २ मारवून. ३ मृत्तिकारूपी.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तुझे बाहु प्रचंड आहेत; - तूं प्रतापी वीर आहेस; सर्व खरें; पण शक्तीचा उपयोग असा करावयाचा काय? ह्मणून, मी तुला सांगतों कीं, - सीता रामाच्या स्वाधीन कर, राज्य बिभीषणाला दे, आणि तूं खुशाल, जेथें ऋषिगण राहतात, त्या रमणीय अरण्यांत जाऊन राहा. ॥ ४६ ॥ तेथें त्वां प्रातःकाळीं पवित्र उदकांत स्नान करावें, संध्यादिक कर्में आचरावीं, आणि एकांतीं पद्मासनादि सुखावह आसनें घालून बसावें. ॥ ४७ ॥ राजा! बाह्य सर्व विषयांवरील आसक्ति सोडून दे. इंद्रियसमूह बाहेर विषयांकडे ओढ घेत असतो, त्याला हळूहळू अंतर्मुख करून आत्मस्वरूपाकडे लाव. ॥ ४८ ॥ हे पुण्यपुरुषा! आत्मा प्रकृतीहून भिन्न आहे असा नित्य विचार करीत राहा. देह, बुद्धि, इंद्रियें इत्यादि स्थावर

सीतां प्रयच्छ रामाय राज्यं देहि विभीषणे ॥ वनं याहि महाबाहो रम्यं मुनिगणाश्रयम् ॥ ४६ ॥ स्नात्वा प्रातः शुभजले कृत्वा सन्ध्यादिकाः क्रियाः ॥ तत एकान्तमाश्रित्य सुखासनपरिग्रहः ॥ ४७ ॥ विसृज्य सर्वतः संगमितरान्विषयान्बहिः ॥ बहिः[1]प्रवृत्ताक्षगणं शनैः प्रत्यक्[2] प्रवाहय[3] ॥ ४८ ॥ प्रकृतेर्भिन्नमात्मानं विचारय सदाऽनघ ॥ चराचरं जगत्कृत्स्नं देहबुद्धीन्द्रियादिकम् ॥ ४९ ॥

रामाय (पू.) राज्यं देहि. ॥ (मू.) वनं याहि. ॥४६॥ प्रातः शुभजले (पू.) कृत्वा ॥ ( मू. ) [ सन ] ॥४७॥ (पू.) विषयान च विसृज्य, ॥ (मू.), ॥४८॥ अनघ, (पू.) विचारय. ॥ (मू.) जगत् ॥४९॥



१ बाहेर चालू असलेल्या इंद्रियसमूहास. २ आंत (आत्म्याकडे). ३ वळव.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

जंगम सर्व जग ॥ ४९ ॥ -- म्हणजे ब्रह्मदेवापासून अतिसूक्ष्म कीटकापर्यंत जें कांहीं दिसतें व ऐकून ठाऊक आहे तें सर्व–ती प्रकृति होय. तिलाच कोणी 'माया' असें ह्मणत असतात. ॥ ५० ॥ जगद्रूपी वृक्षाचे उत्पत्तिस्थितिसंहार होण्याला कारण तीच (प्रकृति) होय. ती - त्रिगुणात्मक असल्यामुळें स्वतांच्या गुणांना अनुरूप अशा - रक्त (तांबड्या, राजस), श्वेत (पांढऱ्या, सात्विक) व कृष्ण (काळ्या, तामस) इत्यादि वर्णांच्या प्रजा नित्य उत्पन्न करीत असते. ॥ ५१ ॥ तिला काम, क्रोध इत्यादि पुत्र आणि हिंसा, तृष्णा वगैरे कन्या होतात. आत्मा (जीव) मूळचा विभु (व्यापक) व ज्ञानरूप आहे; पण प्रकृति अशी सृष्टि करून स्वतां उत्पन्न केलेल्या त्या पदार्थांच्या योगें त्या आत्म्याला नित्य मोहित करिते (त्या पदार्थांवर 'मी' व 'माझें' अशी बुद्धि ठेवायाला लाविते), ॥५२॥ समर्थ आत्म्यावर कर्तृत्वभोक्‌-

आब्रह्मस्तम्बपर्यन्तं [1]दृश्यते [2]श्रूयते च यत् ॥ सैषा प्रकृतिरित्युक्ता सैव मायेति कीर्तिता ॥५०॥ सर्गस्थितिविनाशानां जगद्वृक्षस्य कारणम् ॥ लोहितश्वेतकृष्णादिप्रजाः सृजति सर्वदा ॥ ५१ ॥ कामक्रोधादिपुत्राद्यान्हिंसातृष्णादिकन्यकाः ॥ मोहयत्यनिशं देवमात्मानं स्वैर्गुणैर्विभुम् ॥ ५२ ॥ कर्तृत्वभोक्तृत्वमुखान् स्वगुणानात्मनीश्वरे ॥ [5]आरोप्य स्ववशं कृत्वा तेन क्रीडति सर्वदा ॥ ५३ ॥

यत् (मू.). ॥ ५० ॥ [सा एव] जगद्वृक्षस्य (मू.) सृजति, ॥ ५१ ॥ (पू.) [च सृजति], ॥ (मू.) देवं स्वैः गुणैः मोहयति. ॥ ५२ ॥ (मू.) क्रीडति. ॥ ५३ ॥

---

१ ब्रह्मदेवापासून अतिसूक्ष्म कीटकापर्यंत. २ दिसतें. ३ ऐकूं येतें. ४ जगद्रूपी वृक्षाच्या. ५ वर लादून.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

त्वादि स्वतांचे गुण आरोपून त्याला आपल्या अधीन करून घेते आणि मग त्याच्याबरोबर सर्वकाळ क्रीडा करीत राहते. ॥ ५३ ॥ आत्मा वस्तुतः शुद्ध (दर्शनादिविकाररहित) आहे, परंतु तिचा समागम घडला कीं स्वस्वरूप विसरून जातो व मायेच्या गुणांनीं मोहित होत्साता जसा कांहीं बाह्य विषय पाहूं (भोगूं) लागतो. ॥ ५४ ॥ पुढें, ज्याला 'मी ज्ञानरूप आहें' असें ज्ञान असतें, त्या सद्‌गुरूची गांठ पडली व त्यानें उपदेश केला कीं, ह्याची दृष्टि विषयांपासून पराङ्मुख होते; मग ह्याला शुद्धबुद्धमुक्त अशा आत्मरूपाचें स्पष्ट दर्शन होऊं लागतेंच. ॥ ५५ ॥ प्राण्याला तसा गुरूपदेश मिळाला व तत्त्वचिंतनाची संवय झाली, कीं तो जीवन्मुक्त होतो ह्मणजे प्रकृतीच्या सुखदुःखादि गुणप्रवाहांतून सुटतो. ह्मणून, रावणा! तूंही स्वतांचीं इंद्रियें स्वाधीन ठेवून अशा प्रकारें आत्मविचार करूं लाग; ॥ ५६ ॥ ह्मणजे लवकरच तुला, आत्मा

शुद्धो ऽप्यात्मा यया युक्तः पश्यतीव सदा बहिः॥ विस्मृत्य च स्वमात्मानं मायागुणविमोहितः ॥ ५४ ॥ यदा सद्गुरुणा युक्तो बोध्यते बोधरूपिणा ॥ निवृत्तदृष्टिरात्मानं पश्यत्येव सदा स्फुटम् ॥५५॥ जीवन्मुक्तः सदा देही मुच्यते प्राकृतैर्गुणैः ॥ त्वमप्येवं सदा ऽऽत्मानं विचार्य नियतेन्द्रियः ॥ ५६ ॥ प्रकृतेरन्यमात्मानं ज्ञात्वा मुक्तो भविष्यसि ॥ ध्यातुं यद्यसमर्थो ऽसि सगुणं देवमाश्रय ॥५७॥

( पू. ) पश्यति इव. ॥ स्वात्मानं (मू.) [भवति]. ॥५४॥ युक्तः यदा बोधरूपिणा (पू.), ॥ [तदा] निवृत्तदृष्टिः [ सन् ] सदा स्फुटं ( मू. ). ॥ ५५ ॥ ( पू. ) सदा मुच्यते. ॥ त्वं अपि एवं नियतेन्द्रियः [ सन् ] ( मू. ) ॥ ५६ ॥ ( पू. ). ॥ यदि ( मू. ) [ तर्हि ] सगुणं देवं आश्रय. ॥ ५७ ॥

१ उपदेश केला जातो. २ परतली बुद्धि ज्याची, असा. ३ स्वाधीन करून घेतलीं इंद्रियें ज्यानें, असा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

प्रकृतीहून वेगळा आहे, असें ज्ञान ठसून मुक्ति मिळेल. मी सांगतों असें ध्यान करतां येणें अशक्य वाटत असेल तर, देवाच्या सगुण रूपाचा आश्रय धर. ॥ ५७ ॥ हृदयकमलाच्या कर्णिकेंत ( गाभ्यांत ) रत्नपुंजांनीं खचलेल्या मृदु व तुळतुळीतशा सुवर्णसिंहासनावर रामचंद्र जानकीसह बसला आहे; ॥ ५८ ॥ त्यानें वीरासन घातलें आहे; त्याचे नेत्र विशाल असून वस्त्र विद्युल्लतेच्या पुंजासारखें आहे; किरीट, हार, बाहुभूषणें, कौस्तुभ इत्यादि अलंकार शरीरावर जागच्या जागीं दिसत आहेत; ॥ ५९ ॥ पैंजणें, कडीं व वनमाळा ह्यांच्या योगें त्याची मूर्ति विशेष खुलत आहे; लक्ष्मण हातांत दोन धनुष्यें ( एक स्वतांचें व दुसरें रामाचें ) घेऊन सेवेसाठीं जवळ उभा आहे. ॥ ६० ॥ जो पुरुष सर्वांतर्यामी आत्मरूपी रामचंद्राचें

हृत्पद्मकर्णिके स्वर्णपीठे मणिगणान्विते ॥ मृदुश्लक्ष्णतरे तत्र जानक्या सह संस्थितम् ॥ ५८ ॥ वीरासनं विशालाक्षं विद्युत्पुञ्जनिभाम्बरम् ॥ किरीटहारकेयूरकौस्तुभादिभिरन्वितम् ॥ ५९ ॥ नूपुरैः कटकैर्भान्तं तथैव वनमालया ॥ लक्ष्मणेन धनुर्द्वन्द्वकरेण परिसेवितम् ॥ ६० ॥ एवं ध्यात्वा सदाऽऽत्मानं रामं सर्वहृदि स्थितम् ॥

( मू. ) स्वर्णपीठे जानक्या सह संस्थितं ॥ ५८ ॥ ( मू. ) ॥५९॥ ( पू. ) ॥ धनुर्द्वन्द्वकरेण ( मू. ) ॥ ६० ॥ ( पू. ) रामं सदा एवं ध्यात्वा, ॥

---

१ हृदयरूप कमलाच्या कर्णिकेंत (गाभ्यांत). २ फार मृदु व स्निग्ध अशा. ३ सुवर्णाच्या सिंहासनीं. ४ वीरासारखें आसन घालून बसलेल्या. ५ विशाल नेत्र ज्याचे, अशा. ६ विजेच्या राशीसारखें वस्त्र ज्याचें, अशा. ७ शोभत असलेल्या. ८ धनुष्याची जोडी ( एक रामाचें व एक स्वतांचें ) हातांत ज्याच्या, अशा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

अशा प्रकारें नित्य ध्यान करितो. त्याची रामावर अत्युत्तम भक्ति जडते, आणि तो मुक्त होतो, ह्यांत संदेह नाहीं. ॥ ६१ ॥ रावणा! भक्तजन त्याचीं चरित्रें गात असतात : तूं दुसरेकडे मन जाऊं न देतां तीं आख्यानें निरंतर ऐकत जा. असें केलेंस ह्मणजे, जरी तूं पूर्वी असंख्य महापातकें केलीं आहेस, तरी जसा अग्नि लागल्याबरोबर कापसाच्या मोठाल्या राशि जळून जातात, त्याप्रमाणें तीं तुझीं पापें क्षणमात्रांत नष्ट होतील. ॥ ६२ ॥ राम हा परिपूर्ण एक पुराण पुरुष होय. त्याला नांवें व रूपें नाहींत. योगी लोक त्याचें सत्तारूपानें ( तो शुद्धबुद्धमुक्तस्वभाव होय, अशा भावनेनें ) निरंतर हृदयांत चिंतन करितात. तूं वैर सोडून व निश्चल भक्ति स्वीकारून रामाची सेवा करीत जा." ॥ ६३ ॥ इति षष्ठः सर्गः ॥ ६ ॥

कालनेमीचें भाषण अमृतासारखें - मधुर व हितकर होतें खरें, परंतु रावणाला गोड लागलें नाहीं. -

भक्त्या परमया युक्तो मुच्यते नात्र संशयः ॥६१॥ शृणु वै चरितं तस्य भक्तैर्नित्यमनन्यधीः॥एवं चेत्कृतपूर्वाणि पापानि च महान्त्यपि ॥ क्षणादेव विनश्यन्ति यथा ऽग्नेस्तूलराशयः ॥ ६२ ॥ भजस्व रामं परिपूर्णमेकं विहाय वैरं निजभक्तियुक्तः ॥ हृदा सदा भावितभावरूपमनामरूपं पुरुषं पुराणम् ॥ ६३ ॥ इति युद्धकाण्डे षष्ठःसर्गः ॥ ६ ॥ कालनेमिवचः श्रुत्वा रावणो ऽमृतसन्निभम् ॥

परमया भक्त्या युक्तः [सन्] (मू.) न. ॥६१॥ [ त्वं ] अनन्यधीः [सन्] तस्य (पू.) शृणु. ॥ (द्वि.) पापानि ॥ ( मू. ) [ तथा ] क्षणात् एव विनश्यन्ति. ॥ ६२ ॥ [ त्वं ] वैरं विहाय निजभक्तियुतः [ सन् ] ( मू. ) रामं भजस्व.' ॥ ६३ ॥ इति षष्ठः सर्गः ॥ ६ ॥ ( पू. ) कालनेमिवचः श्रुत्वा ॥

१ कापसाच्या राशी. २ चितिलें सत्तारूप रूप ज्याचें, अशा. ३ ज्याला नामें व रूपें नाहींत अशा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

जसें तापलेलें तूप आंत पाणी टाकलें असतां पेट घेतें, त्याप्रमाणें हें भाषण कानीं पडल्याबरोबर रावणाच्या अंगाची आग झाली. तो क्रोधानें डोळे लाल करून - कालनेमीला ह्मणाला :- ॥ १ ॥ 'दुष्टा ! माझी आज्ञा मान्य करीत नाहींस त्याअर्थीं मी तुझा आतांच वध करितों. तूं शत्रूकडून कांहीं लांचलुचपत घेऊन रामाचा दास झाला आहेस ह्मणूनच अशीं भाषणें बोलतोस, - ह्यांत संशय नाहीं ! - ' ॥ २ ॥ कालनेमीनें रावणाला उत्तर दिलें :– ' महाराज ! व्यर्थ रागावतां कशाला ? माझें बोलणें आपल्याला रुचत नसेल, तर मी जाऊन - आपण सांगतां - तसें करितों. ' ॥ ३ ॥ इतकें बोलून तो महादैत्य कालनेमि तेथून लागलाच निघाला. कारण, रावणानें त्याला पुन्हां मारुतीला विघ्न करण्यास जाण्याविषयीं आग्रहाची आज्ञा दिली,

जज्वाल क्रोधताम्राक्षः सर्पिरद्भिरिवाग्निमत् ॥ १ ॥ निहन्मि त्वां दुरात्मानं मच्छासनपराङ्मुखम् ॥ परैः किंचिद्गृहीत्वैवं त्वं भाषसे रामकिंकरः ॥ २ ॥ कालनेमिरुवाचेदं रावणं देव किं क्रुधा ॥ न रोचते मे वचनं यदि गत्वा करोमि तत् ॥ ३ ॥ इत्युक्त्वा प्रययौ शीघ्रं कालनेमिर्महासुरः ॥ नोदितो रावणेनैव हनुमद्विघ्नकारणात् ॥ ४ ॥

क्रोधताम्राक्षः [ सन् ] (मू.) सर्पिः इव जज्वाल, [ आह च – ] ॥ १ ॥ '( पू. ) त्वां निहन्मि. ॥ त्वं ( मू. ) [ इव ] भाषसे. ' ॥ २ ॥ ( पू. ) इदं उवाच – ' देव, क्रुधा किं ? ॥ (मू.) न रोचते, [ तर्हि ] गत्वा तत् करोमि. ' ॥ ३ ॥ ( उ. ) नोदितः ॥ (पू.) इति उक्त्वा शीघ्रं प्रययौ. ॥ ४ ॥

१ अद्भिः उदकाच्या योगें. २ अग्नियुक्त ( तापविलेलें ). ३ तूप. ४ पेटला. ५ शत्रूंकडून. ६ घेऊन. ७ रुचतें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

कालनेमि दीक्षितांचें तपोवन !

तेव्हां त्याचा निरुपाय झाला. ॥ ४ ॥ त्यानें हिमालयाच्या पार्श्वभागीं ( उतरणीवर ) जाऊन व महात्मा वायुपुत्र मारुति ज्या मार्गानें जावयाचा ती वाट साधून एक तपोवन तयार केलें, आणि स्वतां मुनीचा वेष धारण करून शिष्यसमुदायासह तेथें तळ दिला. त्याच्या अंतरीं दुष्ट हेतु भरला होता. मारुति त्या वाटेनें जाऊं लागला तों हा रम्य आश्रम त्याच्या दृष्टीस पडला. ॥ ५ ॥ ६ ॥ तेव्हां त्या तेजस्वी वायुपुत्राच्या मनांत विचार आला कीं, पूर्वीं मी द्रोणपर्वत आणायला गेलों होतों तेव्हां कांहीं हें उत्तम आश्रमस्थान माझ्या पाहण्यांत आलें नव्हतें; ॥ ७ ॥ मग आज काय मी वाट चुकलों किंवा माझ्या चित्ताला कांहीं भ्रम उत्पन्न झाला आहे ( आश्रम नसून मला आश्रम भासत आहे ) ? अथवा, सध्यां आपण ह्या आश्रमस्थलीं

स गत्वा हिमवत्पार्श्वं तपोवनमकल्पयत् ॥ तत्र शिष्यैः परिवृतो मुनिवेषधरः खलः ॥ ५ ॥ गच्छतो मार्गमासाद्य वायुसूनोर्महात्मनः ॥ ततो गत्वा ददर्शाथ हनूमानाश्रमं शुभम् ॥ ६ ॥ चिन्तयामास मनसा श्रीमान्पवननन्दनः ॥ पुरा न दृष्टमेतन्मे मुनिमण्डलमुत्तमम् ॥ ७ ॥ मार्गो विभ्रंशितो वा मे भ्रमो वा चित्तसंभवः ॥ यद्वा ऽऽविश्याश्रमपदं दृष्ट्वा मुनिमशेषतः ॥ ८ ॥

खलः सः हिमवत्पार्श्वं ( ५ मू. ) [ भूत्वा ], ( ६ पू. ) वायुसूनोः मार्गं आसाद्य, तत्र तपोवनं अकल्पयत ॥ ततः हनूमान् ( मू. ) आश्रमं ददर्श. ॥५॥६॥ ( पू. ) मनसा चिन्तयामास – ॥ '( मू. ) एतत् मुनिमण्डलं न दृष्टं. ॥ ७ ॥ मे ( पू. ) भ्रमः वा ! ॥ यद्वा आश्रमपदं ( मू. ) दृष्ट्वा, ॥ ८ ॥

१ दुष्ट. २ गांठून. ३ रचिता झाला. ४ चुकला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

शिरावें, सगळ्या मुनींचें दर्शन घ्यावें, ॥ ८ ॥ उदक प्राशन करावें, आणि नंतर त्या अत्युत्तम द्रोणपर्वताकडे जावें. ' असें आपल्याशींच बोलून मारुति आश्रमांत शिरला. तो आश्रम औरस चौरस चार कोस पर्यंत पसरला होता. ॥ ९ ॥ आंत केळी, शाल, खजुरी, फणस इत्यादि वृक्ष जिकडे तिकडे सारखे लागले असून त्यांच्या फांद्या पिकलेल्या फळांच्या भारानें लवून गेल्या होत्या; ॥ १० ॥ तेथें - सर्प मुंगूस इत्यादि परस्परांचे हाडवैरी प्राणी आपला - वैरभाव सोडून एकत्र क्रीडा करीत असत; जिकडे तिकडे पवित्रपणा व निर्मल लक्षणें दिसत होतीं. अशा त्या विस्तीर्ण रम्य आश्रमामध्यें तो राक्षस कालनेमि ॥ ११ ॥ कपटयोग स्वीकारून शंकराची आराधना करीत बसला होता. मारुति पूज्यबुद्धिपुरःसर त्या महादैत्याला

पीत्वा जलं ततो यामि द्रोणाचलमनुत्तमम् ॥ इत्युक्त्वा प्रविवेशाथ सर्वतो योजनायतम्[२] ॥ ९ ॥ आश्रमं कदलीशालखर्जूरपनसादिभिः[३] ॥ समावृतं पक्कफलैर्नम्रशाखैश्च[४] पादपैः ॥ १० ॥ वैरभावविनिर्मुक्तं[५] शुद्धं निर्मललक्षणम् ॥ तस्मिन्महाश्रमे रम्ये कालनेमिः स राक्षसः ॥ ११ ॥ इन्द्रयोगं[७] समास्थाय[८] चकार शिवपूजनम् ॥ हनूमानभिवाद्याह गौरवेण महासुरम् ॥ १२ ॥

जलं ( ९ पू. ) द्रोणाचलं यामि. ' ॥ ( ९ उ. १० मू. ) समावृतं ( ११ पू. ) आश्रमं प्रविवेश. ॥ रम्ये ( मू. ) ॥ ९ ॥ १० ॥ ११ ॥ ( पू. ) चकार. ॥ ( मू. ) आह - ॥ १२ ॥

---

१ जातों. २ योजनाइतकें लांब. ३ केळी, शाल, खजुरी, फणस इत्यादि. ४ लवल्या फांद्या ज्यांच्या, अशा. ५ वृक्षांनीं. ६ वैरभावानें सोडिलेल्या. ७ कपटास. ८ स्वीकारून.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

वंदन करून ह्मणाला :– ॥ १२ ॥ ‘ त्रिकालज्ञ मुने! मी रामाचा दूत आहें. माझें नांव हनुमान. रामाचें कांहीं महत्वाचें कार्य करण्यासाठीं मी क्षीरसमुद्रावर जात आहें. ॥१३॥ परंतु, अहो ब्रह्मनिष्ठ मुने! तृषेमुळें माझा कंठ अगदीं सुकून गेला. येथें पाणी कोठें आहे बरें? मला पोटभर उदक प्यावें अशी इच्छा आहे. मुनिवरा! तें कोठें आहे, मला सांगा. ’ ॥ १४ ॥ तें मारुतीचें वाक्य ऐकून कालनेमि त्याला ह्मणाला :– ‘ वा! माझ्या कमंडलूंत उदक आहे तें तूं प्राशन कर, ॥१५॥ हीं पक्क फळें खा, व येथें राहून सुखानें निद्रा घे. पाणी प्याल्याबरोबर लागलेंच जाण्याची त्वरा करण्याचें कारण नाहीं. ॥ १६ ॥ मी स्वतांच्या तपः-सामर्थ्यानें भूत भविष्य वर्तमान जाणत असतों. लक्ष्मण शुद्धीवर आला व सगळे वानरही रामाच्या दृष्टि-

भगवन् रामदूतो ऽहं हनूमान्नाम नामतः ॥ रामकार्येण महता क्षीराब्धिं गन्तुमुद्यतः ॥ १३ ॥ तृषा मां बाधते ब्रह्मन्नुदकं कुत्र विद्यते ॥ यथेच्छं पातुमिच्छामि कथ्यतां मे मुनीश्वर ॥१४॥ तच्छ्रुत्वा मारुतेर्वाक्यं कालनेमिस्तमब्रवीत् ॥ कमण्डलुगतं तोयं मम त्वं पातुमर्हसि ॥ १५ ॥ भुंक्ष्व चेमानि पक्वानि फलानि तदनन्तरम् ॥ नि[1]वसस्व सुखेनात्र निद्रां[2]मेहि त्वरा ऽस्तु मा॥१६॥भूतं भव्यं भविष्यं च जानामि तपसा स्वयम् ॥

‘ ( पू. ) अहं ॥ महता ( मू. ) [ अस्मि ]. ॥ १३ ॥ ब्रह्मन्, ( मू. ), कथ्यतां. ’ ॥ १४ ॥ काल-नेमिः ( पू. ) श्रुत्वा तं अब्रवीत् – ॥ ‘ त्वं मम ( मू. ). ॥१५॥ ( पू. ) [ च ] भुङ्क्ष्व. तदनन्तरं ॥ अत्र सुखेन ( मू. ) अस्तु. ॥ १६ ॥ ( पू. ) जानामि. ॥

१ राहा. २ प्राहि घे.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पातानेंच जिवंत झाले.' ॥ १७ ॥ तें ऐकून मारुति ह्मणाला :– 'मुने! मला फारच तृषा लागली आहे; कमंडलूंतील उदकानें ती शांत होत नाहीं. ह्मणून मला एखादें सरोवर दाखवून द्या.' ॥ १८ ॥ कालनेमीनें 'बरें' ह्मणून लागलीच मायेनें निर्मिलेल्या एका बटूला आज्ञा दिली :– 'बटो! ह्या वायुपुत्राला विस्तीर्ण सरोवर दाखव.' ॥ १९ ॥ - पुढें कालनेमि मारुतीकडे वळून ह्मणाला :- 'वायुपुत्रा! डोळे मिटून पाणी पी आणि तसाच मजजवळ ये; ह्मणजे मी तुला मंत्रोपदेश करीन. त्याच्या सामर्थ्यानें तुला ओषधि दिसून येतील.' ॥ २० ॥ मारुति 'बरें' ह्मणून त्वरित बटूनें दाखविलेल्या सरोवरांत शिरला व डोळे मिटून पाणी पिऊं

उत्थितो लक्ष्मणः सर्वे वानरा राम[1]वीक्षिताः॥ १७॥तच्छ्रुत्वा हनूमानाह कमण्डलुजलेन मे॥न [2]शाम्यत्यधिका तृष्णा ततो दर्शय मे जलम्॥ १८॥तथेत्याज्ञापयामास बटुं मायाविकल्पितम् ॥ बटो दर्शय विस्तीर्णं वायुसूनोर्जलाशयम् ॥ १९॥निमील्य[4] चाक्षिणि[3] तोयं[5] पीत्वा ऽऽगच्छ ममान्ति[6]कम् ॥ उपदेक्ष्यामि ते मन्त्रं येन द्रक्ष्यसि चौषधीः ॥ २०॥ तथेति दर्शितं शीघ्रं बटुना सलिलाशयम् ॥ प्रविश्य हनुमांस्तोयमपिबन्मीलिते[7]क्षणः ॥ २१॥

लक्ष्मणः ( मू. ) च रामवीक्षिताः [ सन्तः उत्थिताः ].' ॥ १७ ॥ हनुमान् तत् श्रुत्वा आह – '(पू.) ॥ अधिका तृष्णा (मू.) दर्शय.' ॥१८॥ (पू.) बटुं आज्ञापयामास – ॥ 'बटो, वायुसूनोः ( मू. ) दर्शय.' ॥ १९ ॥ '[ हनुमन् ], [3]अक्षीणि ( पू. ) आगच्छ. ॥ ते मन्त्रं ( मू. ) द्रक्ष्यसि.' ॥ २० ॥ हनुमान् तथा इति [ उक्त्वा ], बटुना शीघ्रं ( मू. ) [ सन् ] तोयं अपिबत्. ॥ २१ ॥

१ रामानें पाहिलेले. २ शमते ( भागते ). ३ नेत्र. ४ मिटून. ५ उदक. ६ जवळ. ७ मिटले नेत्र ज्यानें, असा. ८ प्याला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

लागला. ॥ २१ ॥ इतक्यांत एक महामाया मकरी तेथें येऊन भराभर त्या महावानराला—मारुतीला—गिळूं लागली! तिचें शरीर फार भयंकर होतें. ॥ २२॥ - हनुमंतानें डोळे उघडले - तों, सुसर आपल्याला गिळीत आहे, असें त्याला दिसून आलें. त्यानें क्रुद्ध होऊन दोन्ही हातांनीं त्या सुसरीचें तोंड फाडून टाकिलें! तत्काल ती मरण पावली! ॥ २३ ॥ इतक्यांत आकाशामध्यें दिव्य स्वरूप धारण करणारी एक स्त्री दिसूं लागली. तिचें नांव 'धान्यमाली' असें होतें. ती मारुतीला ह्मणाली :– ॥ २४ ॥ 'वानरेश्वरा! तुझ्या कृपेनें मी आज शापापासून मुक्त झाल्यें. मी एक अप्सरा आहें. कांहीं कारणामुळें मला मुनीनें शाप दिला

ततश्चागत्य मकरी महामाया महाकपिम् ॥ अग्रसत्तं महावेगान्मारुतिं घोररूपिणी ॥ २२ ॥ ततो ददर्श हनुमान् ग्रसन्तीं मकरीं रुषा ॥ दारयामास हस्ताभ्यां वदनं सा ममार ह ॥२३॥ ततोऽन्तरिक्षे ददृशे दिव्यरूपधरांगना ॥ धान्यमालीतिविख्याता हनुमन्तमथाब्रवीत् ॥ २४ ॥ त्वत्प्रसादादहं शापाद्विमुक्ताऽस्मि कपीश्वर ॥ शप्ताऽहं मुनिना पूर्वमप्सरा कारणान्तरे ॥ २५ ॥

ततः च घोररूपिणी महामाया मकरी (मू.) महावेगात् अग्रसत्! ॥२२॥ (पू.) ददर्श, ॥ (मू.) दारयामास. सा ममार ह. ॥ २३ ॥ (मू.) अङ्गना ददृशे. अथ [सा] हनुमन्तं अब्रवीत् – ॥ २४ ॥ 'कपीश्वर, अहं (पू.). ॥ अहं (मू.) शप्ता अप्सरा [अस्मि]. ॥ २५ ॥

१ सुसर. २ ग्रासूं लागली. ३ फाडिता झाला. ४ मेली. ५ आकाशांत. ६ स्त्री. ७ दिसली. ८ कांहीं कारणामुळें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

होता. असो. ॥ २५ ॥ बा पुण्यपुरुषा! - आतां मीं काय सांगत्यें, तें लक्ष्य देऊन ऐक : - आश्रमामध्यें जो पुरुष तूं पाहिलास, तो कालनेमि नामक महादैत्य होय. मार्गामध्यें तुला विघ्न करण्यासाठीं रावणानें त्याला पाठविलें आहे, ॥ २६ ॥ तो मुनि नव्हे तर मुनीसारखा वेष धारण करणारा मुनींचा घातक राक्षस आहे! तूं त्या दुष्टाचा वध कर आणि लागलाच अत्युत्तम द्रोणपर्वताकडे चालता हो. ॥ २७ ॥ तुझा स्पर्श घडल्यामुळें माझीं पातकें नष्ट झालीं. आतां मी ब्रह्मलोकीं जात्यें.' इतकें बोलून ती स्वर्गास गेली. इकडे मारुतिही आश्रमांत आला. ॥ २८ ॥ तो जवळ येत आहे, असें पाहून कालनेमि ह्मणाला :-

आश्रमे यस्तु ते दृष्टः कालनेमिर्महासुरः ॥ रावणप्रहितो मार्गे विघ्नं कर्तुं तवानघ ॥ २६ ॥ मुनिवेषधरो नासौ मुनिर्विप्रविहिंसकः ॥ जहि दुष्टं गच्छ शीघ्रं द्रोणाचलमनुत्तमम् ॥२७॥ गच्छाम्यहं ब्रह्मलोकं त्वत्स्पर्शाद्धूतकल्मषा ॥ इत्युक्त्वा सा ययौ स्वर्गं हनूमानप्यथाश्रमम् ॥ २८ ॥ आगतं तं समालोक्य कालनेमिरभाषत ॥ किं विलम्बेन महता तव वानरसत्तम ॥ २९ ॥

अनघ, ते ( पू. ) दृष्टः, ॥[ सः ] मार्गे तव विघ्नं कर्तुं ( मू. ). ॥ २६ ॥ असौ मुनिः न [ किन्तु ] ( पू. ) [ अस्ति ]. ॥दुष्टं ( मू. ) द्रोणाचलं गच्छ. ॥ २७ ॥ ( पू. ) अहं ब्रह्मलोकं गच्छामि." ॥ ( मू. ), अथ हनूमान् अपि आश्रमं ययौ. ॥ २८ ॥ कालनेमिः ( पू. ) – ॥ '( मू. ), तव महता विलम्बेन किं? ॥ २९ ॥

१ मार. २ नाहीं उत्तम ज्याहून ( अत्युत्तम ), अशा. ३ धुवून गेलीं ( नाहींशीं झालीं ) पापें जिचीं, अशी.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

' वानरवीरा ! इतका वेळ तिकडे काय करीत होतास? ॥ २९ ॥ बरें; आतां मजपासून मंत्र शीक; आणि मला गुरुदक्षिणा दे.' त्यानें असें सांगितलें असतां मारुति घट्ट मूठ आंवळून त्या राक्षसाला ह्मणाला:—॥३०॥ ' ही घे दक्षिणा ! ' असें बोलून मारुतीनें त्याला एक गुद्दा दिला ! तत्क्षणीं तो महादैत्य कालनेमि ऋषिवेष सोडून ॥ ३१ ॥ मारुतीबरोबर युद्ध करूं लागला. दैत्यानें अनेक प्रकारच्या माया निर्माण केल्या; पण हा मारुति ह्मणजे महामायाव्याचा (सर्व जगाचें आदि कारण माया ज्याच्या स्वाधीन, त्या रामाचा) दूत व मायावी ( कपटी ) राक्षसांचा शत्रु ! - ह्याच्यापुढें क्षुद्र राक्षसी मायांचें काय चालणार ? - ॥३२॥ ह्यानें मस्तकावर एकच मुष्टिप्रहार केला. त्या तडाक्याबरोबर मस्तक फुटून तो दैत्य मरण पावला ! नंतर मारुति क्षीरसमु-

गृहाण मत्तो मन्त्रांस्त्वं देहि मे गुरुदक्षिणाम् ॥ इत्युक्तो हनुमान्मुष्टिं दृढं बद्ध्वा ऽऽह राक्षसम् ॥ ३० ॥ गृहाण दक्षिणामेतामित्युक्त्वा निजघान तम् ॥ विसृज्य मुनिवेषं स कालनेमिर्महासुरः ॥ ३१ ॥ युयुधे वायुपुत्रेण नानामायाविधानतः ॥ महा[4]मायिकदूतो ऽसौ हनूमान्मायिनां रिपुः ॥ ३२ ॥ जघान मुष्टिना शी[5]र्ष्णि भग्न-[6]मूर्धा ममार सः ॥ ततः क्षीरनिधिं गत्वा दृष्ट्वा द्रोणं महागिरिम् ॥ ३३ ॥

त्वं मत्तः मन्त्रान ( पू. ) देहि.' ॥ (मू.) मुष्टिं बध्वा राक्षसं आह – ॥३०॥ 'एतां दक्षिणां गृ[1]हाण !' ( पू. ) नि[2]र्जघान. ॥ ( मू. ) मुनिवेषं वि[3]सृज्य, ॥ ३१ ॥ ( पू ) युयुधे. ॥ ( मू. ) असौ हनूमान ॥ ३२ ॥ मुष्टिना शी[5]र्ष्णि ( पू. ) ममार. ॥ [ मारुतिः ] ( मू. ) दृष्ट्वा, ॥ ३३ ॥

१ घे. २ मारिता झाला. ३ सोडून. ४मोठ्या मायाव्याचा (ईश्वराचा, रामाचा) दूत. ५मस्तकावर. ६ फुटलें मस्तक ज्याचें, असा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

द्रावर गेला. तेथें द्रोण महागिरि त्याच्या दृष्टीस पडला; ॥ ३३ ॥ पण त्यावर ओषधि कोठें दिसत ना! ह्मणून हनुमान् त्या पर्वतालाच उचलून घेऊन सत्वर वायुवेगानें रामाजवळ आला आणि त्याला ह्मणाला :– 'देवाधिदेवा! हा महापर्वत आणिला आहे. ह्याचा जो उपयोग करून घेणें असेल तो करावा. ह्या कामाला विलंब लावणें योग्य नाहीं.' ॥ ३४ ॥ ३५ ॥ हें मारुतीचें वाक्य ऐकून रामाचें अंतःकरण प्रसन्न झालें. त्यानें विलंब न लावितां पर्वतावरील ओषधि काढून घेतल्या. - रामाचा हस्तस्पर्श झाल्याबरोबर ओषधींचें तेज वृद्धिंगत झालें. - पुढें त्या महाबुद्धिमान प्रभूनें, - कुशल वैद्याकडून रोग्याला औषध द्यावें असा विचार ठरवून, - सुषेणाकरवीं ॥ ३६ ॥ महासमर्थ लक्ष्मणाची चिकित्सा करविली. तत्क्षणीं लक्ष्मण झोंपेंतून

अदृष्ट्वा चौषधीस्तत्र गिरिमुत्पाट्य सत्वरः ॥ गृहीत्वा वायुवेगेन गत्वा रामस्य सन्निधिम् ॥ ३४ ॥ उवाच हनुमान् राममानीतोऽयं महागिरिः ॥ यद्युक्तं कुरु देवेश विलम्बो नात्र युज्यते ॥ ३५ ॥ श्रुत्वा हनूमतो वाक्यं रामः संतुष्टमानसः ॥ गृहीत्वा चौषधीः शीघ्रं सुषेणेन महामतिः ॥ ३६ ॥ चिकित्सां कारयामास लक्ष्मणाय महात्मने ॥ तत सुप्तोत्थित इव बुद्ध्वा प्रोवाच लक्ष्मणः ॥ ३७ ॥

तत्र ओषधीः (पू.) [सन्] ॥ (मू.) गत्वा [स्थितः]. ॥ ३४ ॥ हनुमान् रामं उवाच – '( पू. ) आनीतः. ॥ देवेश यत् युक्तं, [ तत् ] कुरु. अत्र ( मू. ).' ॥ ३५ ॥ हनूमतः वाक्यं ( पू. ) महामतिः रामः ओषधीः ( मू. ) ॥ ३६ ॥ महात्मने लक्ष्मणाय ( पू. ). ॥ ततः लक्ष्मणः ( मू. ) – ॥ ३७ ॥

१ न पाहून. २ उपटून. ३ उपचार. ४ निजलेला ( झोंप घेऊन ) उठलेला. ५ जागा होऊन.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

जागा झाल्यासारखा उठला व ह्मणाला :– ॥३७॥ 'दशानना ! उभा रहा उभा रहा ! जाशील कोणीकडे ! आतां तुझा वध करितों !' लक्ष्मण असें बोलत आहे, हें पाहून रामानें त्याचें मस्तक हुंगिलें आणि॥३८॥मारुतीला ह्मटलें :– वत्सा वानरेश्वरा ! आज केवळ तुझ्या अनुग्रहामुळें माझ्या भावाची पीडा दूर झाली व हा लक्ष्मण माझ्या दृष्टीस पडला ! ' ॥ ३९ ॥ रामचंद्र इतकें भाषण करून व वानरांना आणि सुग्रीवाला बरोबर घेऊन, विभीषणाच्या मताप्रमाणें ( कारण, त्याला लंकेंतील सर्व बारीकसारीक माहिती होती ) युद्धाच्या तयारीनें उभा राहिला. ॥ ४० ॥ वानरांना युद्धाची मोठी हौस वाटे. ते सगळेजण पाषाण, वृक्ष, व पर्वतांचीं शिखरें घेऊन युद्धासाठीं शत्रूंच्या समोर जावयास निघाले. ॥ ४१ ॥

तिष्ठ[1] तिष्ठ क्व गन्तासि[2] हन्मीदानीं दशानन ॥ इति ब्रुवन्तमालोक्य मूर्ध्न्यवघ्राय[3][4] राघवः ॥ ३८ ॥ मारुतिं प्राह वत्साद्य त्वत्प्रसादान्महाकपे ॥ निरामयं[5] प्रपश्यामि लक्ष्मणं भ्रातरं मम ॥ ३९ ॥ इत्युक्त्वा वानरैः सार्धं सुग्रीवेण समन्वितः ॥ विभीषणमतेनैव युद्धाय समवस्थितः ॥ ४० ॥ पाषाणैः पादपैश्चैव[7] पर्वताग्रैश्च वानराः ॥ युद्धायाभिमुखा भूत्वा ययुः सर्वे युयुत्सवः ॥ ४१ ॥

' दशानन, ( पू. ) [ त्वां ] हन्मि ! ' ॥ राघवः ( मू. ), ॥३८॥ मारुतिं प्राह – ' वत्स महाकपे, ( पू. )॥ लक्ष्मणं मम भ्रातरं (मू.) '॥३९॥ (मू.)॥४०॥ सर्वे युयुत्सवः[6] वानराः ( मू. ). ॥ ४१ ॥

१ उभा राहा. २ जाशील. ३ मूर्ध्नि मस्तकीं. ४ अवघ्राय हुंगून. ५ निरोगी अशास. ६ युद्ध करूं इच्छिणारे. ७ वृक्षांनीं.





CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

इकडे, महादैत्य रावण रामाचे बाण लागून घायाळ झाला होता; सिंहानें हत्तीची किंवा गरुडानें सर्पाची त्रेधा उडवावी, त्याप्रमाणें रामानें रावणाची अवस्था केली होती. ॥ ४२ ॥ महासमर्थ रामचंद्रानें पराभव केला असतां, तो राजा घरीं गेला आणि सिंहासनावर बसून राक्षसांना सांगूं लागला :- ॥ ४३ ॥ " राक्षसांनो ! ब्रह्मदेवानें, मला मनुष्याकडून मृत्यु येईल, असें पूर्वी सांगितलें ( ठरविलें ) आहे. माझा वध करण्यास समर्थ असा मनुष्य पृथ्वीवर कोणी नाहीं; ॥ ४४ ॥ ह्मणून, साक्षात् नारायण मनुष्य झाला आहे, ह्यांत संशय नाहीं. परमेश्वरच दशरथाचा पुत्र राम होऊन मला मारण्यासाठीं येथें आला आहे. ॥ ४५ ॥ राक्षसवीरांनो ! अनरण्यानें पूर्वी मला शाप दिला आहे कीं ' माझ्या ( अनरण्याच्या ) वंशांत सनातन

रावणो विव्यथे रामबाणैर्विद्धो महासुरः ॥ मातंगे इव सिंहेन गरुडेनेव पन्नगः ॥ ४२ ॥ अभिभूतो ऽगमद्राजा राघवेण महात्मना ॥ सिंहासने समाविश्य राक्षसानिदमब्रवीत् ॥ ४३ ॥ मानुषेणैव मे मृत्युमाह पूर्वं पितामहः ॥ मानुषो हि न मां हन्तुं शक्तो ऽस्ति भुवि कश्चन ॥ ४४ ॥ ततो नारायणः साक्षान्मानुषो ऽभून्न संशयः ॥ रामो दाशरथिर्भूत्वा मां हन्तुं समुपस्थितः ॥ ४५ ॥ अनरण्येन यत्पूर्वं शप्तो ऽहं राक्षसेश्वराः ॥

महासुरः (पू.) [सन] सिंहेन (मू.) इव विव्यथे.॥४२॥(पू.) राघवेण अभिभूतः [सन गृहं] अगमत्,॥ (मू.) -॥४३॥ "पितामहः पूर्वं (मू.) मां हन्तुं शक्तः न अस्ति. ॥४४॥( मू. ) ॥४५॥ (पू.) शप्तः-॥

१ ताडिलेला. २ हत्ती. ३ सर्प. ४ घायाळ झाला. ५ पराभव केलेला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

परमात्मा अवतार घेईल; ॥ ४६ ॥ त्याच्या हातून पुत्र, पौत्र, बांधव सर्वांसह तूं ( रावण ) मरण पावशील, ह्यांत किमपि अन्यथा होणें नाहीं !' मला इतकें बोलून अनरण्य स्वर्गास गेला. ॥ ४७ ॥ तोच हा राम मजकारितां ( मला मारण्यासाठीं ) उत्पन्न झाला आहे, ह्मणून माझा वध करणारच ! कुंभकर्ण तर बेटा अगदीं मूर्ख आहे, नेहमीं आपला झोंपेंत गढलेला असतो ! ॥ ४८ ॥ पण त्याची शक्ति विलक्षण आहे. कोणी तरी त्याला जागा करून मजजवळ घेऊन या." रावणानें असें सांगितलें असतां ते धिप्पाड राक्षस तसेच गेले व मोठ्या प्रयत्नांनीं ॥ ४९ ॥ कुंभकर्णाला जागा करून रावणाजवळ घेऊन आले. तो राजाला

उत्पत्स्यते च मद्वंशे परमात्मा सनातनः ॥ ४६ ॥ तेन त्वं पुत्रपौत्रैश्च बान्धवैश्च समन्वितः ॥ हनिष्यसे न संदेह इत्युक्त्वा मां दिवं गतः ॥ ४७ ॥ स एव रामः संजातो मदर्थे मां हनिष्यति ॥ कुम्भकर्णस्तु मूढात्मा सदा निद्रावशं गतः ॥४८॥ तं विबोध्य महासत्त्वमानयन्तु ममान्तिकम् ॥ इत्युक्तास्ते महाकायास्तूर्णं गत्वा तु यत्नतः ॥ ४९ ॥ विबोध्य कुम्भश्रवणं निन्यू रावणसन्निधिम् ॥ नमस्कृत्य स राजानमासनोपरि संस्थितः ॥ ५० ॥

'( मू. ) परमात्मा उत्पत्स्यते; ॥४६॥ ( पू. ) त्वं ॥ ( मू. ). ' [सः] मां इति उक्त्वा दिवं गतः. ॥ ४७ ॥ ( पू. ) संजातः; मां हनिष्यति ! ॥ ( मू. ). ॥ ४८ ॥ महासत्त्वं ( पू. ) आनयन्तु. " ॥ ( मू. ) गत्वा, यत्नतः ॥ ४९ ॥ ( पू. ) निन्युः. ॥ सः राजानं ( मू. ). ॥ ५० ॥

१ उत्पन्न होईल. २ मारिला जाशील. ३ स्वर्गास. ४ जागा करून. ५ मोठीं शरीरें ज्यांचीं, असे. ६ कुंभकर्णास. ७ नेते झाले.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

नमस्कार करून आसनावर बसला. ॥ ५० ॥ तेव्हां राजा रावण त्या आपल्या भावाला दीन वाणीनें सांगूं लागला :– ' कुंभकर्णा ! मोठें संकट पुढें उभें राहिलें आहे ! तूं कांहीं तरी मनावर घे. ॥ ५१ ॥ आपले शूर पुत्र, पौत्र व बांधव रामानें मारून टाकिले ! माझा मृत्युकाल जवळ आला, - असें वाटतें ! - ह्या वेळीं मी करावें काय ? ॥ ५२ ॥ हा पराक्रमी दशरथपुत्र रामचंद्र सुग्रीवासह मोठी सेना बरोबर घेऊन समुद्र तरून इकडे आला व आमचीं पाळें मुळें खणून काढूं लागला आहे ! ॥५३॥ निवडक निवडक जे कांहीं राक्षस होते, त्यांचा युद्धांत वानरांनीं वध केला ! युद्धामध्यें वानर मरून पडले, असें मला कधींच दिसत नाहीं ! ॥५४॥

तमाह रावणो राजा भ्रातरं दीनया गिरा ॥ कुम्भकर्ण निबोध त्वं महत्कष्टमुपस्थितम् ॥ ५१ ॥ रामेण निहताः शूराः पुत्राः पौत्राश्च बान्धवाः ॥ किं कर्तव्यमिदानीं मे मृत्युकाल उपस्थिते ॥ ५२ ॥ एष दाशरथी रामः सुग्रीवसहितो बली ॥ समुद्रं सबलस्तीर्त्वा मूलं नः परिकृन्तति ॥ ५३॥ ये राक्षसा मुख्यतमास्ते हता वानरैर्युधि ॥ वानराणां क्षयं युद्धे न पश्यामि कदाचन ॥ ५४ ॥

रावणः राजा ( पू. ) आह – ॥ ' कुम्भकर्ण, त्वं ( मू. )! ॥ ५१ ॥ ( पू. ) च निहताः. ॥ ( मू. ) [ सति ], इदानीं मे किं कर्तव्यं ? ॥ ५२ ॥ ( पू. ) सबलः रामः समुद्रं तीर्त्वा नः ( मू. ) ! ॥ ५३ ॥ ( पू. ) हताः. ॥ ( मू. ) न पश्यामि. ॥ ५४ ॥

---

१ सैन्यासहित. २ कापून काढितो. ३ अति मुख्य.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

कुंभकर्णा! तुझे बाहु प्रचंड (शक्तीनें भरलेले) आहेत. तूं शत्रूचा नाश कर. एवढ्यासाठींच आह्मी तुला जागें केलें. हे महासमर्था! हें काम करणें अत्यंत कठिण आहे खरें, पण भावासाठीं तुला केलें पाहिजे.' ॥ ५५ ॥ हें राजा रावणाचें रडकें भाषण ऐकून कुंभकर्ण खदखदां हांसत सुटला आणि रावणाला ह्मणाला :— ॥ ५६ ॥ "राजा! पूर्वी एकांतीं मसलती झाल्या त्या वेळीं मीं जें ह्मटलें होतें, तेंच पापकर्माचें फळ आज तुला प्राप्त झालें! ॥ ५७ ॥ त्या वेळींच मीं तुला सांगितलें कीं, राम परमात्मा नारायण होय व सीता योगमाया आहे. किती उपदेश केला तरी तूं उमजला नाहींस! ॥ ५८ ॥ एके प्रसंगीं रात्रीच्या वेळीं मी

नाशयस्व महाबाहो यदर्थं परिबोधितः ॥ भ्रातुरर्थे महासत्त्व कुरु कर्म सुदुष्करम् ॥ ५५ ॥ श्रुत्वा तद्रावणेन्द्रस्य वचनं परिदेवितम् ॥ कुम्भकर्णो जहासोच्चैर्वचनं चेदमब्रवीत् ॥ ५६ ॥ पुरा मन्त्रविचारे ते गदितं यन्मया नृप ॥ तदद्य त्वामुपगतं फलं पापस्य कर्मणः ॥५७॥ पूर्वमेव मया प्रोक्तो रामो नारायणः परः ॥ सीता च योगमायेति बोधितोऽपि न बुध्यसे ॥ ५८ ॥ एकदाऽहं वने सानौ विशालायां स्थितो निशि ॥

महाबाहो, [ तत् वानरबलं ] (पू.). ॥ महासत्त्व, (मू.) कर्म कुरु.' ॥ ५५ ॥ कुम्भकर्णः (पू.) श्रुत्वा, उच्चैः जहास, इदं (मू.) — ॥ ५६ ॥ "नृप, मया पुरा ते (पू.) पापस्य कर्मणः फलं गदितं, (मू.). ॥५७॥ मया (पू.) नारायणः प्रोक्तः; ॥ (मू.). ॥५८॥ अहं (पू.) [शिलायां], निशि स्थितः. ॥



१ मोठ्यानें. २ हांसला. ३ उपायाची गुप्त योजना चालली असतां. ४ सांगितलेलें. ५ मिळालें. ६ शिखरावर. ७ विस्तीर्ण शिळेवर.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

अरण्यांत पर्वताशिखरीं विस्तीर्णशा शिळेवर बसलों होतों. इतक्यांत साक्षात् नारदमुनि माझ्या दृष्टीस पडले. त्याचें दर्शन सर्व जगांत अलभ्य लाभ समजलें जातें. ॥ ५९ ॥ मी त्यांना विचारिलें :– ' महाज्ञानवंता ! आपण कोणीकडून आलां मला सांगा. ' हा प्रश्न ऐकून नारद ह्मणाले :– ' देवांचे कांहीं गुप्त विचार झाले, तेथें मी इतका वेळ बसलों होतों, - हा तिकडूनच आलों. - ॥ ६० ॥ तिकडे काय वृत्तांत झाला तो खरा खरा तुला सांगतों ऐक :– तूं आणि तुझा भाऊ रावण दोघांनीं सर्व देवांना फार त्रास दिला ह्मणून ते विष्णूकडे गेले. ॥ ६१ ॥ त्यांचा अंतःकरणें भक्तीस्तव विष्णूकडे नित्य लागलेलीं असतात. त्यांनीं त्या समर्थ देवाधिदेवाची स्तुति करून प्रार्थना केली कीं, देवा ! रावण हा त्रैलोक्याला शत्रु उत्पन्न झाला आहे; त्याच्यापुढें कोणाचें कांहीं चालत नाहीं; तूं त्याचा वध कर; ॥ ६२ ॥

दृष्टो मया मुनिः साक्षान्नारदो दिव्यदर्शनः ॥ ५९ ॥ तमब्रुवं महाभाग कुतो गन्तासि मे वद ॥ इत्युक्तो नारदः प्राह देवानां मन्त्रणे स्थितः ॥ ६० ॥ तत्रोत्पन्नमुदन्तं ते वक्ष्यामि शृणु तत्त्वतः ॥ युवाभ्यां पीडिता देवाः सर्वे विष्णुमुपागताः ॥ ६१ ॥ ऊचुस्ते देवदेवेशं स्तुत्वा भक्त्या समाहिताः ॥ जहि रावणमक्षय्यं देव त्रैलोक्यकण्टकम् ॥ ६२ ॥

मया दिव्यदर्शनः ( मू. ) दृष्टः. ॥ ५९ ॥ ( पू. ). ॥ इति उक्तः नारदः प्राह – ॥ ६० ॥ ( पू. ) शृणु ॥ ( मू. ). ॥ ६१ ॥ ( पू ) ते देवदेवेशं स्तुत्वा ऊचुः – ॥ 'देव, ( मू. ) रावणं जहि. ॥ ६२ ॥

१ विचारस्थानीं. २ वृतांताला. ३ तुह्मा दोघांनीं. ४ नाश करितां येत नाहीं ज्याचा, अशा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

त्याला मनुष्याच्या हातून मृत्यु यावयाचा, असा ब्रह्मदेवानें पूर्वी संकेत करून ठेविला आहे; ह्मणून, तूं मनुष्यरूप घेऊन रावणनामक शत्रूचा घात कर. ॥ ६३ ॥ महाविष्णूनें, बरें आहे, असे ह्मटलें. त्या प्रभूचा संकल्प कधीं अन्यथा व्हावयाचा नाहीं. तो देव सध्यां रघुकुळामध्यें राम ह्या नामें अवतरला आहे. ॥ ६४ ॥ तो तुह्मां सर्वांचा नाश करणार.' इतकें सांगून मुनि स्वर्गास गेले. ह्यावरून, रावणा! राम हा सनातन परब्रह्म होय, असें पक्कें समज, ॥ ६५ ॥ आणि वैरभाव सोडून त्याची भक्ति करूं लाग. त्यानें मायेच्यायोगें मनुष्यरूप स्वीकारिलें आहे. भक्तिभावानें सेवा करणाराला रघुवीर प्रसन्न होतो.॥६६॥

मानुषेण मृतिस्तस्य कल्पिता ब्रह्मणा पुरा॥ अतस्त्वं मानुषो भूत्वा जहि रावण-कण्टकम्[1] ॥ ६३ ॥ तथेत्याह महाविष्णुः सत्यसंकल्प ईश्वरः॥ जातो रघुकुले देवो राम इत्यभिविश्रुतः[2] ॥६४॥ स हनिष्यति वः सर्वानित्युक्त्वा प्रययौ मुनिः॥ अतो जानीहि रामं त्वं परं ब्रह्म सनातनम्॥ ६५॥ त्यज वैरं भजस्वाद्य मायामानुषविग्रहम्[3] ॥ भजतो भक्तिभावेन प्रसीदति रघूत्तमः॥ ६६ ॥

ब्रह्मणा पुरा तस्य ( मू. ) जहि.' ॥ ६३ ॥ ( पू. ) 'तथा इति' आह.॥ देवः ( मू. ) जातः. ॥ ६४ ॥ सः वः सर्वान ( पू. ) प्रययौ. ॥ अतः त्वं ( मू. ) जानीहि. ॥६५॥ वैरं ( पू. ) [ रामं ] भजस्व. ॥ रघूत्तमः भक्तिभावेन ( मू. ). ॥ ६६ ॥

१ रावणरूप कांट्याला. २ प्रसिद्ध. ३ मायेनें मनुष्याचें शरीर - घेतलें - ज्यानें, असा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

भक्ति ज्ञान उत्पन्न करिते; व भक्तिच मोक्ष देते. भक्तिहीन प्राण्यानें कांहीं कर्म केलें तरी तें न केल्यासारखेंच आहे ( त्याचें फळ मिळत नाहीं ). ॥ ६७ ॥ विष्णूचे अनेक अवतार होऊन गेले. तो जें स्वरूप घेतो, त्याला अनुरूप लीला करीत असतो. अशा सहस्त्र अवतारांसारखा ( सामान्य अवतारांच्या सहस्त्र पटीनीं मोठा ) हा एक रामावतार आहे. हा ज्ञानरूप व कल्याणकारक होय. ॥ ६८ ॥ जे कुशल पुरुष कायावाचामनांनीं नित्य रामाचें भजन करितात, ते अनायासें संसारांतून तरून हरिपदीं प्राप्त होतात. ॥ ६९ ॥ पृथ्वीवर जे शुद्ध मनाचे पुरुष नित्य रामाचें ध्यान करितात व त्याचीं चरित्रें पठण करितात, ते

भक्तिर्जनित्री[1] ज्ञानस्य भक्तिर्मोक्षप्रदायिनी॥ भक्तिहीनेन यत्किंचित्कृतं सर्वमसत्समम्[2] ॥ ६७ ॥ अवताराः सुबहवो विष्णोर्लीलानुकारिणः ॥ तेषां सहस्त्रसदृशो रामो ज्ञानमयः शिवः ॥ ६८ ॥ रामं भजन्ति निपुणा मनसा वचसाऽनिशम् ॥ अनायासेन संसारं तीर्त्वा यान्ति हरेः पदम् ॥६९॥ ये राममेव सततं भुवि शुद्धसत्त्वा ध्यायन्ति तस्य चरितानि पठन्ति सन्तः ॥ मुक्तास्त एव भवभोगमहाहि[3]पाशैः सीतापतेः पदमनन्तसुखं प्रयान्ति ॥७०॥ इति युद्धकाण्डे सप्तमः सर्गः॥७॥

भक्तिः ज्ञानस्य (मू.), [तत्] सर्वं असत्समं. ॥६७॥ लीलानुरूपिणः विष्णोः (पू.) [जाताः]. ॥(मू.) [अस्ति]. ॥ ६८ ॥ निपुणाः (पू.) भजन्ति, ॥ (मू.) यान्ति. ॥ ६९ ॥ ये शुद्धसत्त्वाः सन्तः (पू.) पठन्ति, ॥ (पू.) मुक्ताः [सन्तः] अनन्तसुखं सीतापतेः पदं प्रयान्ति. ॥७०॥ इति सप्तमः सर्गः ॥७॥

---

१ उत्पन्न करणारी. २ नसल्यासारखें. ३ संसार हें शरीर ज्याचें अशा त्या महासर्पाच्या विळख्यातून.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

साधु होत. काल हा एक महासर्प आहे; संसार हें त्या सर्पाचें शरीर होय :- सर्व लोक ह्या सर्पाच्या विळख्यांत सांपडले असतात :- पण ते साधु ह्या पाशांतून नित्य मुक्तच असतात. त्यांना सीतापतीच्या अनंतसुखरूपी पदाची प्राप्ति व्हावयाचीच, - ह्यांत संदेह नाहीं. - ॥ ७० ॥ ॥ इति सप्तमः सर्गः ॥ ७ ॥

कुंभकर्णाचें भाषण कानीं पडतांच रावणानें भिवया चढविल्या व मुख उग्र केलें. ह्या वेळीं, तो आसनावरून उडतो कीं काय, असें भासे! अशा स्थितींत रावण बोलूं लागला :– ॥ १ ॥ ' कुंभकर्णा! तूं महाबुद्धिमान्, ह्मणून तुझ्या तोंडून चार ज्ञानाच्या गोष्टी ऐकाव्या, एवढ्यासाठीं कांहीं मी तुला येथें आणिलें नाहीं. मी जें कांहीं केलें आहे, त्यांत मिळून ( माझ्यासारखें वर्तन ठेवून ), तुला रुचेल तर युद्ध कर. ॥ २ ॥ नाहीं तर खुशाल झोंप घ्यायला जा! ह्या वेळीं झोपेनें तुला फारच गुंगविलें असेल! '

कुम्भकर्णवचः श्रुत्वा भ्रुकुटीविकटाननः ॥ दशग्रीवो जगादेदमासनादुत्पतन्निव ॥ १ ॥ त्वमानीतो न मे ज्ञानबोधनाय सुबुद्धिमान् ॥ मया कृतं समीकृत्य युध्यस्व यदि रोचते ॥ २ ॥ नो चेद्गच्छ सुषुप्त्यर्थं निद्रा त्वां बाधतेऽधुना ॥ रावणस्य वचः श्रुत्वा कुम्भकर्णो महाबलः ॥ ३ ॥

( मू. ) इदं जगाद – ॥ १ ॥ ' सुबुद्धिमान ( पू. ) न आनीतः! ॥ यदि रोचते, [ तर्हि ] ( मू. ); ॥ २ ॥ नो चेत, [ तर्हि ] सुषुप्त्यर्थं ( पू. ) बाधते! ' ॥ महाबलः कुम्भकर्णः ( मू ), ॥ ३ ॥

१ भुंवया वांकड्या केल्यामुळें भयंकर दिसतें मुख ज्याचें, असा. २ उत्पतन् उडणारा. ३ बोलला. ४ स्वाकारून ( एकमताचा होऊन ). ५ झोंप घेण्यास.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रावणाचें भाषण ऐकिल्यावर महापराक्रमी कुंभकर्णाला ॥ ३ ॥ वाटलें कीं, हा संतापला आहे; - ह्यावेळीं अधिक उपदेश उपयोगी नाहीं. - ह्मणून लागलाच तो युद्धाला निघाला. त्याचें शरीर प्रचंड पर्वतासारखें होतें. तो नगराचा कोट वलांडून ॥ ४ ॥ वानरवीरांना घाबरवीत नगरांतून सत्वर बाहेर आला. त्यानें इतकी मोठी गर्जना केली कीं, घोंघो वाजणाऱ्या समुद्रांतून तिचा प्रतिध्वनि उठला ! ॥ ५ ॥ तो क्रोधानें वानरांना दोन्ही हातांनीं धरून खाऊं व पीडा देऊं लागला. एखाद्या पर्वताला - त्याच्या विस्तीर्ण आकृतीस योग्य - असे पंख असले ह्मणजे जसा देखावा दिसेल, तसा कुंभकर्ण दिसत होता ! त्याची काळासारखी किंवा मृत्यूप्रमाणें उग्र आकृति पाहून त्या वेळीं एकूनएक सगळे वानर पळूं लागले. तो महाशक्तिमान् राक्षस

रुष्टो ऽयमिति विज्ञाय तूर्णं युद्धाय निर्ययौ ॥ स लंघयित्वा प्राकारं महापर्वतसन्निभः ॥ ४ ॥ निर्ययौ नगरात्तूर्णं भीषयन्हरिसैनिकान् ॥ स ननाद महानादं समुद्रमभिनादयन् ॥ ५ ॥ वानरान्कालयामास बाहुभ्यां भक्षयन् रुषा ॥ कुम्भकर्णं तदा दृष्ट्वा सपक्षमिव पर्वतम् ॥ ६ ॥ दुद्रुवुर्वानराः सर्वे कालान्तकमिवाखिलाः ॥

( मू. ) सः प्राकारं लंघयित्वा, ॥ ४ ॥ ( पू. ) भीषयन् [ सन् ] नगरात् तूर्णं निर्ययौ. ॥ ( मू. ) [ सन् ] ननाद. ॥ ५ ॥ [ सः ] ( ६ पू. ) भक्षयन् [ सन् ] बाहुभ्यां कालयामास. ॥ तदा अखिलाः सर्वे वानराः ( ६ उ. ) इव [ स्थितं ] कुम्भकर्णं ( ७ पू. ) दृष्ट्वा दुद्रुवुः. ॥

१ वानरवीरांस. २ भिववणारा. ३ शीघ्र. ४ निघाला. ५ दणाणविणारा. ६ गर्जना करिता झाला. ७ त्रासवूं लागला. ८ पंखयुक्त. ९ पळाले.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

हातांत मुद्गर घेऊन वानरांच्या सैन्यांत गरगर फिरे, ॥ ६ ॥ ७ ॥ फिरण्याच्या झपाट्यांत कित्येक वानरांना भूमीवर पाडी, आसपास हाताला लागतील त्यांना तोंडांत टाकी, कांहींना मुद्गरप्रहारानें चुरी, व कित्येकांना अनेक प्रकारें लाथाबुक्या मारून तुडवी. ॥ ८ ॥ विभीषण त्याप्रसंगीं हातांत गदा घेऊन -तेथें आला होता; - कुंभकर्ण त्याचा वडील भाऊ. म्हणून त्या बुद्धिमान राक्षसानें तो ( कुंभकर्ण ) दृष्टीस पडल्याबरोबर, त्याच्या चरणांस वंदन केलें व ह्मटलें :– ॥ ९ ॥ "दादा! मी विभीषण आपला भाऊ वंदन करीत आहें. आपण थोर ज्ञानसंपन्न आहां. मजवर दया करा. रावणाला मी अनेक प्रकारें बोध केला ॥ १० ॥ कीं, सीता रामाला दे; राम साक्षात् सर्ववंद्य परमेश्वर आहे. परंतु त्यानें माझें

भ्रमन्तं हरिवाहिन्यां मुद्गरेण महाबलम् ॥७॥ कालयन्तं हरीन्वेगाद्भक्षयन्तं समन्ततः ॥ चूर्णयन्तं मुद्गरेण पाणिपादैरनेकधा ॥ ८ ॥ कुम्भकर्णं तदा दृष्ट्वा गदापाणिर्विभीषणः ॥ ननाम चरणौ तस्य भ्रातुर्ज्येष्ठस्य बुद्धिमान् ॥ ९ ॥ विभीषणोऽहं भ्रातुर्मे दयां कुरु महामते ॥ रावणस्तु मया भ्रातर्बहुधा परिबोधितः॥ १० ॥ सीतां देहीति रामाय रामः साक्षाज्जनार्दनः ॥

हरिवाहिन्यां ( पू. ) [ युतं ] महाबलं ॥ ६ ॥ ७ ॥ हरीन् ( पू. ) भक्षयन्तं (मू.) चूर्णयन्तं ॥ ८ ॥ कुम्भकर्णं दृष्ट्वा, तदा बुद्धिमान् ( मू. ) भ्रातुः चरणौ ननाम, [ उवाच च – ] ॥ ९ ॥ "महामते, ( १० पू. ). भ्रातः, मया ( १० मू. ) – 'रामाय ( ११ पू. )' ॥

१ वानरसेनेंत. २ फिरणाऱ्या. ३ त्रासतिणाऱ्या. ४ वानरांना.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ऐकलें नाहीं इतकेंच नव्हे, तर मला मारण्यासाठीं खड्ग उचलून सांगितलें, ॥ ११ ॥ कीं, ‘ तुला धिक्कार असो! येथून निघून जा! ’ दादा! भोंवतालच्या दुष्ट पापी राक्षसांच्या नादीं लागून त्यानें मला लाथ कींहो मारिली! ह्मणून मी चौघांमंत्र्यांना बरोबर घेऊन रामाला शरण आलों. ” ॥ १२ ॥ तें सगळें भाषण कानीं पडल्यावर कुंभकर्णाला समजलें कीं, आपला भाऊ जवळ आला आहे. ( क्रोधाच्या आवेशामुळें इतका वेळ स्वारीला दादच नव्हती! ) मग त्यानेंही विभीषणाला पोटाशीं धरून - ह्मटलें : - ‘ वत्सा! तूं रामचरणाचा आश्रय केलास, - फार चांगली गोष्ट झाली. - बा! तूं तरी जिवंत राहा; ॥ १३ ॥ ह्मणजे राक्षसांच्या कुलाचें संरक्षण व हित होईल. तूं महाभगवद्भक्त आहेस, असें मीं पूर्वीच नारदाच्या मुखांतून ऐकिलें आहे. ॥ १४ ॥ बाळा! जा, ह्या वेळीं मला स्वकीय किंवा परकीय कांहींच दिसत अथवा ओळखितां येत नाहीं.

न शृणोति च मां हन्तुं खड्गमुद्यम्य चोक्तवान् ॥ ११ ॥ धिक् त्वां गच्छेति मां हत्वा पदा पापिभिरावृतः ॥ चतुर्भिर्मन्त्रिभिः सार्धं रामं शरणमागतः ॥ १२ ॥ तच्छ्रुत्वा कुम्भकर्णोऽपि ज्ञात्वा भ्रातरमागतम् ॥ समालिंग्य च वत्स त्वं जीव रामपदाश्रयः ॥ १३ ॥ कुलसंरक्षणार्थाय राक्षसानां हिताय च ॥ महाभागवतोऽसि त्वं पुरा मे नारदाच्छ्रुतम् ॥१४॥ गच्छ तात ममेदानीं दृश्यते न च किंचन ॥

इति बोधितः [ अपि ] ( ११ मू. ), मां हन्तुं उद्यतः पापिभिः आवृतः [ रावणः ] मां पदा हत्वा, ‘ त्वां ( १२ पू. ) ’ उक्तवान [ ततः अहं ] ( मू. ). ॥ १० ॥ ११ ॥ १२ ॥ कुम्भकर्णः अपि ( १३ पू. ) ज्ञात्वा, समालिङ्ग्य च [ आह - ] ‘ ( १३ मू. ) [सन] ( १४ मू. ) जीव. त्वं ( १४ मू. ) [ इति ] मे पुरा नारदात् श्रुतं. ॥ १३ ॥ १४ ॥ तात, ( मू. ) किंचन न दृश्यते.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

माझे नेत्र मदानें धुंद झाले आहेत; - कदाचित चुकून तुलाही प्रहार लागावयाचा! - ' ॥ १५ ॥ कुंभकर्णानें असें सांगितलें, तेव्हां बिभीषणाच्या मुखावरून अश्रूंचे ओघळ वाहूं लागले. तो भावाच्या चरणांस वंदन करून रामाच्या पार्श्वभागीं आला आणि चिंताग्रस्त होऊन उभा राहिला. ॥ १६ ॥ इकडे कुंभकर्णही हातांपायांनीं वानरांना चुरीत सैन्यांत फिरूं लागला. गंधहत्तीच्या मदाचा वास आल्याबरोबर जसे हत्ती दूर दूर पळतात त्याप्रमाणें कुंभकर्णाला पाहतांक्षणीं वानरसेना भिऊन पळत सुटली. ॥ १७ ॥ त्याला पाहून रामचंद्रास क्रोध आला. त्यानें व्यवस्थितपणें वायव्यास्त्राची एका शस्त्रावर स्थापना करून तें कुंभकर्णावर

मदीयो वा परो वाऽपि मदमत्तविलोचनः ॥ १५ ॥ इत्युक्तोऽश्रुमुखो भ्रातुश्चरणावभिवन्द्य सः ॥ रामपार्श्वमुपागत्य चिन्तापर उपस्थितः ॥ १६ ॥ कुम्भकर्णोऽपि हस्ताभ्यां पादाभ्यां पेषन्यहरीन् ॥ चचार वानरीं सेनां कालयन् गन्धहस्तिवत् ॥ १७ ॥ दृष्ट्वा तं राघवः क्रुद्धो वायव्यं शस्त्रमादरात् ॥ चिक्षेप कुम्भकर्णाय तेन चिच्छेद रक्षसः ॥ १८ ॥ समुद्गरं दक्षहस्तं तेन घोरं ननाद सः॥

[ यतः अहं ] मदमत्तविलोचनः [ अस्मि ]. ॥ १५ ॥ ( पू. ) भ्रातुः चरणौ अभिवन्द्य ॥ ( मू. ). ॥ १६ ॥ ( पू. ) पेषयन् ॥ ( मू. ) कालयन् [ सन ] चचार. तं दृष्ट्वा क्रुद्धः ( १८ पू. ) ॥ कुम्भकर्णाय ( १८ उ. १९ पू. ) चिच्छेद. सः तेन घोरं ननाद. ॥

१ चुरणारा. २ ज्याच्या मदाचा वास आल्याबरोबर दुसरे हत्ती पळून जातात, त्या हत्तीला ' गंधगज ' असें म्हणतात; त्याच्याप्रमाणें. ३ पळविणारा. ४ वायु देवता ज्याची, अशा. ५ मुद्गरसहित. ६ उजव्या हातास. ७ तोडिता झाला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

फेंकिलें आणि त्याच्या योगें त्या राक्षसाचा मुद्गरासह उजवा हात तोडिला. हात तुटल्याबरोबर कुंभकर्णानें भयंकर गर्जना केली. त्या हातानें भूमीवर पडतां पडतां अनेक वानरांना लोळविलें! ॥ १८ ॥ १९ ॥ कांहीं धूर्त वानर कुंभकर्णाच्या अगदीं आंगाजवळ उभे होते ( कुंभकर्ण हात लांब पसरून धांवे. पंज्याजवळ असतील ते त्याच्या हातांत सांपडावयाचे. वानर कसले छट. ते पंजा चुकवून त्याच्या बगलेखालीं उभे राहत व तो जसजसा फिरेल तसतसे बगलेखालून फिरत; हा त्यांचा धूर्तपणा कुंभकर्णाच्या लक्ष्यांत येत नसे ). - पण आतां हात तुटला तेव्हां, - भयानें ते सगळेजण थरथर कांपूं लागले, व रामाचें राक्षसाशीं चाललेलें युद्ध टकमक पाहत जागच्याजागीं स्तब्ध उभे राहिले! ॥ २० ॥ एक हात तुटला तरी कुंभकर्ण दुसऱ्या हातांत वृक्ष उचलून घेऊन युद्धांत रामाला मारण्यासाठीं वेगानें त्याच्या आंगावर धांवला.

स हस्तः पतितो भूमावनेकानर्दयन्[1]कपीन् ॥ १९ ॥ पर्यन्तं[2]माश्रिताः सर्वे वानरा भयवेपिताः ॥ रामराक्षसयोर्युद्धं पश्यन्तः पर्यवस्थिताः ॥ २० ॥ कुम्भकर्णश्छिन्नहस्तः शालं[3]मुद्यम्य[4] वेगतः ॥ समरे राघवं हन्तुं दुद्राव[5] तमथोऽच्छिनत्[6] ॥ २१ ॥ शालेन सहितं वामहस्तमैन्द्रेण राघवः ॥ छिन्नबाहुमथायान्तं नर्दन्तं वीक्ष्य राघवः ॥ २२ ॥

( मू. ) अर्दयन् [ सन् ] भूमौ पतितः ॥१७॥१८॥१९॥ ( पू. ) वानराः ॥ ( मू. ) [ सन्तः ] पर्यवस्थिताः ॥ २० ॥ छिन्नहस्तः ( २१ मू. ) राघवः तं ( २२ पू. ) अच्छिनत्. ॥ अथ राघवः ( मू. ) [ तं ] आयान्तं वीक्ष्य, ॥ २१ ॥ २२ ॥

---

१ पीडा देणारा. २ जवळच्या भागास. ३ वृक्षास. ४ उचलून. ५ धांवला. ६ तोडिता झाला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

कुंभकर्णाचे हा-
तपाय तुटले.

पण रामानें इंद्रास्त्राच्या योगें त्याचा तो वृक्षासहित डावा हातही तोडून टाकिला. दोन्ही बाहु तुटले तरी तो गर्जना करीत आंगावर येतच आहे, असें पाहून रामानें ॥ २१ ॥ २२ ॥ दोन अर्धचंद्राकृति तीक्ष्ण बाण घेतले आणि त्यांच्या योगें कुंभकर्णाचे दोन्ही पाय तोडिले. ते पाय सों सों शब्द करीत लंकेच्या दारांत जाऊन पडले; ॥ २३ ॥ दोन्ही हात व दोन्ही पाय तुटले तरी तो अतिभयंकर कुंभकर्ण, जसा राहु चंद्रावर धांवतो त्याप्रमाणें, वडवामुखासारखें आपलें मुख पसरून गर्जना करीत रामाच्या आंगावर धांवला. रघुवीरानें तीक्ष्ण अग्रांचे बाण मारून त्याचें तोंड भरून टाकिलें. ॥ २४ ॥ २५ ॥ बाणांनीं तोंड भरलें तेव्हां तो अतिभयंकर दैत्य घुरघुरूं लागला. पुढें रामानें सूर्यासारखा तेजस्वी असा एक अत्युत्तम बाण

द्वावर्धचन्द्रौ निशितावादायास्य पदद्वयम् ॥ चिच्छेद पतितौ पादौ लंकाद्वारि महास्वनौ ॥ २३ ॥ निकृत्तपाणिपादो ऽपि कुम्भकर्णो ऽतिभीषणः ॥ वडवामुखवद्वक्त्रं व्यादाय रघुनन्दनम् ॥ २४ ॥ अभिदुद्राव निनदन्राहुश्चन्द्रमसं यथा ॥ अपूरयच्छिताग्रैश्च सायकैस्तद्रघूत्तमः ॥ २५ ॥ शरपूरितवक्त्रो ऽसौ चुक्रोशातिभयंकरः ॥ अथ सूर्यप्रतीकाशमैन्द्रं शरमनुत्तमम् ॥ २६ ॥

( पू. ) [ बाणौ ] आदाय अस्य पदद्वयं ॥ ( मू. ) [ सन्तौ ] लङ्काद्वारि पतितौ. ॥ २३ ॥ अतिभीषणः ( मू. ) ॥ २४ ॥ निनदन् [ सन् ], यथा ( पू. ), [ तथा ] अभिदुद्राव. ॥ रघूत्तमः तत् (मू.) अपूरयत्. ॥ २५ ॥ ( २६ पू. ) असौ चुक्रोश. ॥ अथ रामः ( २६ उ. ) ॥

१ तीक्ष्ण. २ मोठा शब्द ज्यांचा, असा. ३ तोडिले हातपाय ज्याचे, असा. ४ समुद्राच्या पोटांत औरसचौरस शंभर योजनें विस्तीर्ण असें वडवाग्नीचें कुंड आहे "वडवामुख" म्हणतात: त्यासारखें. ५ मुख. ६ पसरून. ७ तीक्ष्ण अग्रें ज्यांचीं, अशा. सूर्यासारखा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

घेऊन त्याच्यावर इंद्रास्त्राची स्थापना केली आणि इंद्राच्या वज्रासारखा किंवा विजेसारखा तो बाण, दैत्य मरावा एवढ्यासाठीं, त्याच्या आंगावर सोडिला. जसा इंद्राच्या वज्रानें वृत्रासुराचा वध केला, त्याप्रमाणें त्या बाणानें त्या राक्षसवीराचें मस्तक तोडून धडावेगळें केलें. तें मस्तक पर्वतासारखें प्रचंड होतें; त्यावरील कुंडलें व दाढा चमकत होत्या. तें कुंभकर्णाचें शिर लंकेच्या दारांत आदळलें आणि धड महासागरांत पडलें. ॥२६॥२७॥२८॥ त्याच्या मस्तकानें दरवाजा बंद केला व धडानें समुद्रांतील नक्रादिक प्राणी चुरून टाकिले ! कुंभकर्ण मरण पावला तेव्हां ऋषींसह देव, गंधर्व, सर्प, पक्षी, ॥ २९ ॥ सिद्ध, यक्ष, गुह्यक आणि अप्सरा

वज्राशनिसमं रामश्चिक्षेपासुरमृत्यवे ॥ स तत्पर्वतसंकाशं स्फुरत्कुण्डलदंष्ट्रकम् ॥ २७ ॥ चकर्त रक्षोधिपतेः शिरो वृत्रमिवाशनिः ॥ तच्छिरः पतितं लंकाद्वारि [6]कायो महोदधौ ॥ २८ ॥ शिरो ऽस्यारो[7]धयद्द्वारं कायो नक्राद्यचूर्णयत् ॥ ततो देवाः सऋषयो गन्धर्वाः [8]पन्नगाः [9]खगाः ॥ २९ ॥ सिद्धा यक्षा गुह्यकाश्च अप्सरोभिश्च राघवम् ॥ [10]ईडिरे [11]कुसुमासारैर्वर्षन्तश्चाभिनन्दिताः ॥ ३० ॥

( २७ पू. ) [1]ऐन्द्रं शरं [2]असुरमृत्यवे चिक्षेप[3]. ( मू. ) ॥ २६ ॥ २७ ॥ ( पू. ) वृत्रं इव [5]चकर्त. ॥ ( मू. ) पतितं; कायः [ च ] महोदधौ [ पतितः ]. ॥ २८ ॥ अस्य शिरः द्वारं ( मू. ) ॥ २९ ॥ ( पू. ) [ सह ] राघवं ॥( मू. ) [ सन्तः ] अभिनन्दिताः. ॥ ३० ॥

---

१ इंद्र देवता ज्याची, अशा. २ राक्षस मरावा ह्मणून. ३ फेंकिता झाला. ४ वज्र. ५ कापिता झाला. ६ धड. ७ बंद करितें झालें. ८ सर्प. ९ पक्षी १० स्तुति करिते झाले. ११ पुष्पवृष्टीच्या योगें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

अशा सर्वांना आनंद झाला. त्यांनीं रामावर ओंजळीच्याओंजळी फुलें उधळलीं व त्याची स्तुति केली. ॥ ३० ॥ त्या प्रसंगीं श्रेष्ठ देवर्षि नारद रामचंद्राच्या दर्शनासाठीं आकाशांतून त्वरेनें खालीं आले. त्यांची अंगकांति जिकडेतिकडे फांकल्यामुळें दशदिशा उज्वल दिसूं लागल्या. ॥ ३१ ॥ रामाचा शरीरवर्ण नीलकमलाप्रमाणें श्यामल होता; मूर्ति अतिसुंदर; हातांत धनुष्य धारण केलेलें; नेत्र किंचित् रक्तवर्ण व विशाल; दुसरा हात इंद्रास्त्रानें गुंतविलेला; ॥ ३२ ॥ असा तो प्रभु, बाणांच्या प्रहारांनीं विव्हल होऊन पडलेल्या वानरांकडे, दयार्द्र दृष्टीनें पाहत होता. ती मूर्ति पाहून नारदाच्या अंतरीं भक्ति उचंबळली. त्यानें सद्गदित वाणीच्या योगें प्रभूची स्तुति करण्यास प्रारंभ केला :- ॥ ३३ ॥ नारद ह्मणाला:- "हे देवाधिदेवा ! तूं सर्व जगाचा स्वामी सनातन परमात्मा आहेस. ज्याला नारायण

आजगाम तदा रामं द्रष्टुं देवमुनीश्वरः ॥ नारदो गगनात्तूर्णं स्वभासा भासयन्दिशः ॥ ३१॥ राममिन्दीवरश्याममुदारांगं धनुर्धरम् ॥ ईषत्ताम्रविशालाक्षमैन्द्रास्त्राङ्‌चितबाहुकम् ॥ ३२ ॥ दयार्द्रदृष्ट्या पश्यन्तं वानरान् शरपीडितान् ॥ दृष्ट्वा गद्गदया वाचा भक्त्या स्तोतुं प्रचक्रमे ॥ ३३ ॥ नारद उवाच ॥देवदेव जगन्नाथ परमात्मन्सनातन ॥ नारायणाखिलाधार विश्वसाक्षिन्नमो ऽस्तु ते ॥ ३४ ॥

( पू. ) नारदः रामं द्रष्टुं, ( मू. ) भासयन् [ सन् ] गगनात् तूर्णं आजगाम. ॥ ३१ ॥ [ सः ] (३२मू.३३) वानरान् पश्यन्तं रामं (मू.) – ॥ ३२॥३३ ॥ नारदः उ० – ' (मू.) नमः अस्तु. ॥३४॥



१ किंचित् तांबूस असे विशाल नेत्र ज्याचे अशा. २ ऐंद्र अस्त्रानें युक्त बाहु ज्याचा, अशा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

असें ह्मणतात, तो सकल जगाचा आधार व सर्व विश्वाचा साक्षी तूंच. तुला नमस्कार असो. ॥३४॥ अतिनिर्मल ज्ञान हेंच तुझें वास्तव स्वरूप होय. असें असतांही तूं मायेच्या योगें मनुष्य अवतार घेऊन 'मला इतर जीवांप्रमाणेंच सुखदुःखें भोगावीं लागतात,' असें दाखवितोस; पण हीं केवळ तुझी लोकांना पूर्णपणें फसविण्याची एक युक्ति आहे! ॥३५॥ तूं, सर्वांच्या हृदयांत राहत असूनही, मायेनें आच्छादिला असतोस ह्मणून कोणाला ओळखूं येत नाहींस. - तुझें स्वरूप स्वयंप्रकाश आहे. ज्यांचीं अंतःकरणें शुद्ध होतात, त्यांना तुझें स्पष्ट दर्शन मिळतें. ॥३६॥ रामा! तूं स्वतांचे नेत्र उघडतोस व त्यायोगें हें त्रैलोक्य उत्पन्न करितोस. तसेंच तूं आपले डोळे मिटतोस, आणि त्या रीतीनें विश्वाचा लय करितोस (तुझ्या डोळ्यांची उघडझांप हेच

विशुद्धज्ञानरूपोऽपि त्वं लोकानतिवञ्चयन्[1] ॥ मायया मनुजाकारः सुखदुःखादिमानिव ॥३५॥ त्वं मायया गूह्यमानः[3] सर्वेषां हृदि संस्थितः ॥ स्वयंज्योतिः[2]स्वभावस्त्वं व्यक्त एवामलात्मनाम्[4] ॥ ३६ ॥ उन्मीलयन्[5] सृजस्येतन्नेत्रे राम जगत्त्रयम् ॥ उपसंह्रियते सर्वं त्वया चक्षुर्निमीलनात्[6] ॥ ३७ ॥

( मू. ) [ भासि ]. ॥ ३५ ॥ ( पू. ) त्वं मायया गूह्यमानः [भवसि]. ॥ (मू.) व्यक्तः एव [असि]. ॥ ३६ ॥ राम, [त्वं] नेत्रे उन्मीलयन् [सन्] ( पू. ) सृजसि. ॥ त्वया (मू.) उपसंह्रियते. ॥३७॥

---

१ अतिशय फसविणारा. २ स्वयंप्रकाश. ३ आच्छादिला जाणारा. ४ निर्मळ मनें ज्यांचीं असांना. ५ उघडणारा. ६ डोळे मिटण्यामुळें. ७ आटोपून घेतलें जातें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

जगाचे उत्पत्तिलय होत ). ॥३७॥ ज्याच्या आधारानें हें सर्व जग भासतें, ज्याच्यापासून विश्वाचे उत्पत्ति-स्थितिलय होतात, व ज्याच्याहून अधिक असें लोकांत कांहीं नाहीं, तें ब्रह्म तूं होस : तुला नमस्कार असो. ॥ ३८ ॥ प्रकृति, पुरुष, आणि स्पष्ट समजणारा ( निमेषापासून संवत्सर वगैरे ) व स्पष्ट न कळणारा ( अणूपासून क्षणापर्यंत ) काल हीं ज्याचीं रूपें, असें श्रेष्ठ मुनि समजतात, तो तूंच आहेस. रामा, तुला नमस्कार असो. ॥३९॥ वेदांनीं कित्येक स्थलीं, तुझें स्वरूप विकाररहित व शुद्ध ज्ञानमय होय, असें ह्मटलें आहे : बरें, तेच वेद कांहीं ठिकाणीं, सर्व जग हाच तुझ्या मूर्तीचा आकार, असेंही ह्मणतात. ॥ ४० ॥ देवा, - कोणी 'तुझें रूप निर्विकार' ह्मणतात; कांहीं लोक 'जग हेंच तुझें रूप' ह्मणतात, जग तर

यस्मिन्सर्वमिदं भाति यतश्चैतच्चराचरम् ॥ यस्मान्न किंचिल्लोकेऽस्मिंस्तस्मै ते ब्रह्मणे नमः ॥ ३८ ॥ प्रकृतिं पुरुषं कालं व्यक्ताव्यक्तस्वरूपिणम् ॥ यं जानन्ति मुनिश्रेष्ठास्तस्मै रामाय ते नमः ॥ ३९ ॥ विकाररहितं शुद्धं ज्ञानरूपं श्रुतिर्जगौ ॥ त्वां सर्वजगदाकारमूर्तिं चाप्याह सा श्रुतिः ॥ ४० ॥ विरोधो दृश्यते देव वैदिको वेदवादिनाम् ॥ निश्चयं नाधिगच्छन्ति त्वत्प्रसादं विनाऽबुधाः ॥ ४१ ॥

( पू. ) [ जायते ]. ॥ अस्मिन् लोके ( मू. ). ॥ ३८ ॥ मुनिश्रेष्ठाः यं ( पू. ) कालं [ च ] ( मू. ) ॥ ३९ ॥ श्रुतिः [त्वां ] (पू) ॥ सा श्रुतिः (मू.). ॥४०॥ (पू) वैदिकः विरोधः दृश्यते. ॥ अबुधाः त्वत्प्रसादं विना ( मू. ). ॥ ४१ ॥

१ माती झाली. २ पावतात.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

विकारी आहे :- एकंदरींत वेदवादी पुरुषांचा अशा वचनांवरून वेदविषयक विरोध वरकमीं एकदम दिसून येतो. तुझी कृपा झाली नाहीं तोंपर्यंत लोक अज्ञानीच असायाचे. त्यांना वेदवचनांचा निश्चित ( परस्परांस विरुद्ध नसणारा ) अर्थ कळावयाचा नाहीं. ॥ ४१ ॥ - तुझा प्रसाद झाला असतां जो निश्चय समजतो, तो हा :- देवा! तूं मायेच्या योगें क्रीडा करीत असतोस असें ह्मटलें ह्मणजे वेदवचनांत कोणताही विरोध राहत नाहीं : पहा :- जसा सूर्याचा किरणसमूह भ्रमामुळें उदकासारखा भासतो, ॥ ४२ ॥ त्याप्रमाणें, रामा ! हें सर्व जग तुझ्या ठिकाणीं भ्रांतिज्ञानामुळें कल्पिलें जात असतें. - अर्थात, तुझें विकार पावणारें विश्वरूप केवळ मायिक होय; वास्तव ज्ञानरूप तर विकाररहित आहेच, हा सिद्धांत ठरतो व वेदवचनांची अशा प्रकारें एकवाक्यता होते. - देवा! तुझें निर्गुण केवल रूप मनाला कळण्याजोगें देखील नाहीं, ॥ ४३ ॥ तें दिसेल कसें? दिसत नाहीं तर मनुष्यानें भक्ति तरी करावी कशी? ह्मणून ह्या भूतलावर बुद्धिमान् लोक,

मायया क्रीडतो देव न विरोधो मनागपि[1] ॥ रश्मिजालं रवेर्यद्वद्दृश्यते जलवद्भ्रमात् ॥ ४२ ॥ भ्रान्तिज्ञानात्तथा राम त्वयि सर्वं प्रकल्प्यते ॥ मनसोऽविषयो देव रूपं ते निर्गुणं परम् ॥ ४३ ॥ कथं दृश्यं भवेद्देव दृश्याभावे भजेत्कथम् ॥ अतस्तवावतारेषु रूपाणि निपुणा भुवि ॥ ४४ ॥

देव, ( पू. ) विरोधः न.॥ यद्वत् रवेः ( मू. ) जलवत् दृश्यते, ॥ ४२ ॥ तथा राम, ( पू. ). ॥ देव, ( मू. ) ते रूपं ॥ ४३ ॥ दृश्यं (४४ पू.) भजेत् ? ॥ अतः भुवि बुद्धिसम्पन्नाः निपुणाः (४४उ.) ॥

१ मनाक् किंचित्. २ सूर्याचें. ३ किरणसमूह. ४ न समजण्याजोगें. ५ दिसण्याजोगें नाहीं तेव्हां. ६ सेवा करावी.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तूं वेगवेगळ्या अवतारीं जीं जीं रूपें धरितोस. ॥ ४४ ॥ त्यांचें भजन करितात. पुढें तेच ज्ञानसंपन्न होऊन संसारसमुद्रांतून तरून जातात. भक्तिमार्गांत कामक्रोध इत्यादि अनेक शत्रु आहेत. ॥ ४५ ॥ जसे बोके उंदराला घाबरवितात, त्याप्रमाणें हे शत्रु नेहमीं अंतःकरणाला भिववीत असतात. तुझें नामस्मरण करणाऱ्या जनांच्या अंतरीं तुझें रूपही नित्य प्रकट राहतें. ॥ ४६ ॥ रामा ! हा संसार - समुद्रासारखा विस्तीर्ण आहे खरा; - परंतु, जे लोक तुझी पूजा करण्यांत तत्पर असतात, तुझें कथामृत प्राशन करण्याकडे चित्ताची प्रवृत्ति ठेवितात आणि तुझ्या भक्तांची संगत धरितात, त्यांना तो ( संसारसमुद्र ) - चिखलांत उमटलेल्या - गाईच्या पावलांत सांचलेल्या पाण्याप्रमाणें अल्प वाटूं लागतो. ॥ ४७ ॥ ह्यासाठीं देवा ! मी तुझ्या सगुण

भजन्ति बुद्धिसंपन्नास्तरन्त्येव भवार्णवम् ॥ कामक्रोधादयस्तत्र बहवः परिपन्थिनः ॥ ४५ ॥ भीषयन्ति सदा चेतो मार्जारा मूषकं यथा ॥ त्वन्नाम स्मरतां नित्यं त्वद्रूपमपि मानसे ॥४६॥ त्वत्पूजानिरतानां ते कथामृतपरात्मनाम् ॥ त्वद्भक्तसंगिनां राम संसारो गोष्पदायते ॥ ४७ ॥ अतस्ते सगुणं रूपं ध्यात्वा ऽहं सर्वदा हृदि ॥ मुक्तश्चरामि लोकेषु पूज्यो ऽहं सर्वदैवतैः ॥ ४८ ॥

भजन्ति, [ तावता ] भवार्णवं ( ४५ पू. ). ॥ तत्र ( मू. ), ॥ ४४ ॥ ४५ ॥ यथा मार्जाराः मूषकं, [ तथा ] ( पू. ) भीषयन्ति. ॥ नित्यं (मू. ) [ भवति ]. ॥ ४६ ॥ राम, ( मू. ). ॥ ४७ ॥ अतः अहं ( पू. ) ध्यात्वा, ॥ मुक्तः [ सन ] लोकेषु ( मू. ) पूज्यः. ॥ ४८ ॥

१ शत्रु. २ उंदराला. ३ भिवविताात. ४ अंतरीं. ५ चिखलांत उमटलेल्या गाईच्या पावलासारखा होतो.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रूपाचें हृदयांत सर्वदा चिंतन करीत त्रैलोक्यामध्यें फिरत असतों. - तुझ्या ध्यानाच्या प्रभावानें - मी संसारतापांतून सुटलों आहें; व ह्मणूनच सर्व देवता मला पूज्य मानितात. ॥ ४८ ॥ रामा ! तूं देवांचें हित करण्याच्या इच्छेनें आज मोठें कार्य पार पाडिलेंस : प्रभो ! कुंभकर्ण मरण पावला, त्याअर्थी भूमीचा भार उतरलाच, - असें मानावयास चिंता नाहीं. - ॥४९॥ उद्यां लक्ष्मण युद्धामध्यें इंद्रजिताचा वध करील; आणि रामा ! परवांचें दिवशीं तूं दशाननाला मारशील ! ॥ ५० ॥ देवाधिदेवा ! मी सिद्धांसह आकाशांत उभा राहून हा सर्व प्रकार पाहीन. देवा ! मजवर कृपादृष्टि असूं दे. मी आतां देवलोकीं जातों. " ॥ ५१ ॥ त्रिकालज्ञानी नारदऋषि इतकें बोलून व रामाचा निरोप घेऊन निष्पाप अशा ब्रह्मलोकीं गेले. जातांना वाटेंत देवांनीं त्यांची पूजा केली. ॥ ५२ ॥

राम त्वया महत्कार्यं कृतं देवहितेच्छया ॥ कुम्भकर्णवधेनाद्य भूमारो ऽयं गतः प्रभो ॥ ४९ ॥ श्वो[1] हनिष्यति सौमित्रिरिन्द्रजेतारमाहवे[2] ॥ हनिष्यसे ऽथ राम त्वं परश्वो[3] दशकन्धरम् ॥ ५० ॥ पश्यामि सर्वं देवेश सिद्धैः सह नभोगतः[4] ॥ अनुगृह्णीष्व[5] मां देव गमिष्यामि सुरालयम्[6] ॥ ५१ ॥ इत्युक्त्वा राममामन्त्र्य[7] नारदो भगवानृषिः ॥ ययौ देवैः पूज्यमानो ब्रह्मलोकमकल्मषम्[8] ॥ ५२ ॥

( पू. ) महत् कार्यं कृतं. ॥ प्रभो, अद्य ( मू. ) भूभारः गतः. ॥ ४९ ॥ ( पू. ) हनिष्यति. ॥ (मू.) हनिष्यसे. ॥ ५० ॥ ( पू. ) [ अहं ] सर्वं पश्यामि. ॥ देव मां ( मू. ) गमिष्यामि. ' ॥ ५१ ॥ भगवान ऋषिः नारदः ( मू. ) [ सन ] अकल्मषं ब्रह्मलोकं ययौ. ॥ ५२ ॥

१ उद्यां २ युद्धांत. ३ परवां. ४ आकाशांत आलेला. ५ कृपा कर. ६ स्वर्गास. ७ विचारून ( निरोप घेऊन ). ८ निष्पाप.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

'राम कोणतेंही कार्य सफाईनें किंवा आयासावांचून पार पाडितो : त्यानें आपला ( रावणाचा ) महापराक्रमी भाऊ कुंभकर्ण मारिला,' ही गोष्ट रावणाच्या कानीं गेली; तेव्हां शोकामुळें त्याचें सर्वांग तप्त झालें. ॥५३॥ प्रथम तर तो मूर्छा येऊन भूमीवर पडला, पण कांहीं वेळानें शुद्धीवर आला व विलाप करूं लागला. इंद्रजिताला, चुलता मृत्यु पावला, ही वार्ता कळली, आणि पिता अत्यंत व्याकुळ होऊन पडला आहे, - असें दिसून आलें; - तेव्हां तो शोकानें विव्हल झालेल्या पित्याला ह्मणाला :– ' राजाधिराजा, आपण पोक्त विचारी आहां; - मी आपल्याला सांगावें असें नाहीं; परंतु - शोक करणें सोडून द्या. मी महाबलाढ्य मेघनाद जीवंत असतांना ॥ ५४ ॥ ५५ ॥ आपल्याला शोक करण्याचा प्रसंग येईल कोठून? महाबुद्धिमता !

भ्रातरं निहतं श्रुत्वा कुम्भकर्णं महाबलम् ॥ रावणः शोकसंतप्तो रामेणाक्लिष्टकर्मणा[1] ॥ ५३ ॥ मूर्च्छितः पतितो भूमावुत्थाय विललाप[2] ह ॥ पितृव्यं[3] निहतं श्रुत्वा पितरं चातिविह्वलम् ॥ ५४ ॥ इन्द्रजित्प्राह शोकार्तं त्यज शोकं महामते ॥ मयि जीवति राजेन्द्र मेघनादे महाबले ॥ ५५ ॥ दुःखस्यावसरः कुत्र देवान्तक[4] महामते ॥ व्येतु[5] ते दुःखमखिलं स्वस्थो भव महीपते ॥ ५६ ॥

( पू. ) भ्रातरं अक्लिष्टकर्मणा रामेण निहतं श्रुत्वा शोकसन्तप्तः रावणः ॥ ५३ ॥ मूर्छितः, भूमौ पतितः [ च ], ( मू. ) [ दृष्ट्वा ], ॥ ५४ ॥ इन्द्रजित् शोकार्तं रावणं प्राह – ' महामते, शोकं त्यज. ॥( मू. ) मयि जीवति [ सति ], ॥५५॥ (पू.). ॥ते अखिलं दुःखं (मू.), स्वस्थः भव. ॥५६॥

१ अनायासें कर्म होतें ज्याचें, अशा. २ शोक करूं लागला. ३ चुलत्याला. ४ देवांचा नाश करणाऱ्या. ५ दूर होवो.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आपण देवांशीं शत्रुत्व बांधून त्यांना देखील जर्जर करून सोडिलें, - मग यःकश्चित् मानवाची भीति काय ह्मणून धरितां ? - पृथ्वीपते ! आपलें सकल दुःख दूर होवो. आपण स्वस्थ असा. ॥ ५६ ॥ मी शत्रूं-कडील - मुख्य वीर - मारून त्यांचें आणि आपलें दुःख व बल सारखें करून सोडितों. आगोदर निकुंभि-लेंत ( विवरांत ) जाऊन अग्नीला प्रसन्न करून घेतों ॥ ५७ ॥ व त्याच्यापासून रथादि सामग्री मिळवितों. ह्मणजे शत्रूला माझा पराभव करितां येणार नाहीं.' इतकें बोलून इंद्रजित लागलाच वर सांगितलेल्या होम-स्थलीं गेला. ॥ ५८ ॥ निकुंभिलास्थानीं जाऊन पोंचल्यावर त्यानें तांबडीं फुलें व वस्त्रें आंगावर धारण केलीं, रक्तचंदनाची उटी लावली आणि मौन व्रत स्वीकारून हवन करण्यास प्रारंभ केला. ॥ ५९ ॥ विभीषणाला इंद्रजिताच्या ह्या कृत्याची बातमी कळली. तेव्हां त्यानें रामाला त्या दुष्टानें आरंभिलेल्या होमाचा

सर्वं समीकरिष्यामि हनिष्यामि च वै रिपून् ॥ गत्वा निकुम्भिलां सद्यस्तर्पयित्वा हुता-शनम् ॥ ५७ ॥ लब्ध्वा रथादिकं तस्मादजेयो ऽहं भवाम्यरेः ॥ इत्युक्त्वा त्वरितं गत्वा निर्दिष्टं हवनस्थलम् ॥ ५८ ॥ रक्तमाल्याम्बरधरो रक्तगन्धानुलेपनः ॥ निकुम्भिला-स्थले मौनी हवनायोपचक्रमे ॥५९॥ विभीषणो ऽथ तच्छ्रुत्वा मेघनादस्य चेष्टितम् ॥

( पू. ) हनिष्यामि च,॥ निकुम्भिलां ( मू. ) तर्पयित्वा, ॥ ५७ ॥ रथादिकं ( पू. ) अजेयः भवा-मि. ॥' ( मू. ) गत्वा, ॥ ५८ ॥ ( पू. ) ॥ मौनी [ सन् ] ( मू. ). ॥ ५९ ॥ अथ (पू.) श्रुत्वा, ॥

---

१ त्यांची आपली स्थिति सारखी करीन. २ विवरास. ३ अग्नीला. ४ तृप्त करून. ५ पराभव न पावणारा. ६ होम करण्या-च्या स्थानास. ७ तांबडीं फुलें व वस्त्रें धारण करणारा. ८ आरंभिता झाला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

सकल वृत्तांत सांगून ह्मटलें :– ॥ ६० ॥ ' रामा ! मेघनादाची बुद्धि अत्यंत दुष्ट आहे; त्यानें आरंभिलेला हा होम निर्विघ्नपणें शेवटास गेला, तर मेघनादाचा पराभव देवांना किंवा दैत्यांनाही करितां येणार नाहीं ! ॥६१॥ ह्मणून, मी लवकर - जाऊन - लक्ष्मणाकडून रावणपुत्राचा वध करवितों. हे बलवच्छ्रेष्ठा ! लक्ष्मणाला मजबरोबर चलण्यास आज्ञा दे. तुझा कनिष्ठ बंधु मेघनादाचा वध करील, ह्यांत संदेह नाहीं. ' ॥ ६२ ॥ श्रीरामचंद्र ह्मणाला:– 'बिभीषणा! इंद्रजिताला मारण्यासाठीं मीच येतों ह्मणजे झालें. मजजवळ सर्व राक्षसांचा घात करण्यास समर्थ असें प्रचंड आग्नेय अस्त्र आहे, त्याच्या योगें मी शत्रूचा - वध करीन. - ' ॥ ६३ ॥

प्राह रामाय सकलं होमारम्भं दुरात्मानः ॥ ६० ॥ समाप्यते चेद्धोमो ऽयं मेघनादस्य दुर्मतेः ॥ तदा ऽजेयो भवेद्राम मेघनादः सुरासुरैः ॥ ६१ ॥ अतः शीघ्रं लक्ष्मणेन घातयिष्यामि रावणिम् ॥ आज्ञापय मया सार्धं लक्ष्मणं बलिनांवरम् ॥ हनिष्यति न संदेहो मेघनादं तवानुजः ॥ ६२ ॥ श्रीरामउवाच ॥ अहमेवागमिष्यामि हन्तुमिन्द्रजितं रिपुम् ॥ आग्नेयेन महास्त्रेण सर्वराक्षसघातिना ॥ ६३ ॥

( मू. ) होमारम्भं प्राह – ॥ ६० ॥ ' दुर्मतेः मेघनादस्य अयं होमः ( मू. ) अजेयः भवेत्. ॥६१॥ ( पू. ) घातयिष्यामि. ॥ ( द्वि. ) लक्ष्मणं आज्ञापय. ॥ तव अनुजः मेघनादं ( मू. ) न. ' ॥६२॥ श्रीराम उवाच – ॥ ' (मू.) महास्त्रेण हन्तुं आगमिष्यामि.' ॥ ६३ ॥



१ संपविला जातो. २ रावणाच्या पुत्राला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

विभीषणानेंही त्याला सांगितलें :- ' रामा ! ह्याचा वध मनुष्याच्या हातून होणें नाहीं. जो पुरुष बारा वर्षेंपर्यंत झोंप व आहार वर्ज करून राहिला असेल, ॥६४॥ त्याच्याच हातून ह्या दुष्टाचा वध होईल, असा ब्रह्मदेवाचा संकेत आहे. लक्ष्मणामध्यें मात्र ते गुण दिसून येतात. तो तुजबरोबर अयोध्येंतून निघून आला, ॥ ६५ ॥तेव्हांपासून, राजाधिराजा रघुवीरा ! तुझ्या सेवेंत दक्ष असतो; ह्मणून त्याला झोंपेचें व आहाराचें स्मरण देखील होत नाहीं. हें सर्व मला ठाऊक आहे. ॥६६॥ ह्मणून, देवाधिदेवा ! लक्ष्मणाला सत्वर मजबरोबर जाण्याविषयीं आज्ञा दे. तो इंद्रजिताला मारील, ह्यांत संशय नाहीं; तो साक्षात् पृथ्वीला मस्तकीं

विभीषणो ऽपि तं प्राह नासावन्यैर्निहन्यते ॥ यस्तु द्वादशवर्षाणि निद्राहारविवर्जितः ॥६४॥ तेनैव मृत्युर्निर्दिष्टो ब्रह्मणा ऽस्य दुरात्मनः ॥ लक्ष्मणस्तु अयोध्याया निर्गम्यायास्त्वया सह ॥ ६५॥ तदादि निद्राहारादीन्न जानाति रघूत्तम ॥ सेवार्थं तव राजेन्द्र ज्ञातं सर्वमिदं मया ॥ ६६ ॥ तदाज्ञापय देवेश लक्ष्मणं त्वरया मया ॥ हनिष्यति न संदेहः शेषः साक्षाद्धराधरः ॥ ६७ ॥

( पू. ) – ' असौ अन्यैः न निर्हन्यते[1]. ॥( मू. ), ॥ ६४ ॥ (पू.) अस्य तेन एव मृत्युः निर्दिष्टः[2]. ॥ ( मू. ) [ यत्[3]प्रभृति ] अयोध्यायाः निर्गम्य[4] आयात[5], ॥ ६५ ॥ रघूत्तम, तदादि तव सेवार्थं (मू.) इदं सर्वं ज्ञातं. ॥६६॥ (पू.) [सह] लक्ष्मणं आज्ञापय. ॥ [सः] साक्षात् धराधरः[6] शेषः (मू.). ॥६७॥

१ मारिला जातो. २ ठरविलेला. ३ जेव्हांपासून. ४ निघून. ५ आला. ६ पृथ्वीला उचलून धरणारा.

धरणारा शेष आहे. ॥ ६७ ॥ रामा ! तूं चतुर्दश भुवनांचा अधिपति साक्षात् नारायण आहेस व लक्ष्मण तर शेष होय. तुह्मी दोघे जगद्रूपी नाटकाचे सूत्रधार असून पृथ्वीचा भार उतरण्यासाठीं येथें अवतरलां आहां.' ॥ ६८ ॥ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणार्थबोधे युद्धकाण्डे अष्टमः सर्गः ॥ ८ ॥

विभीषणाचें भाषण ऐकून घेतल्यावर राम ह्मणाला :– 'विभीषणा ! त्या भयंकर राक्षसाचें सगळें कपट मला अवगत आहे– ॥ १ ॥ तो महापराक्रमी, शूर व कपटी असून ब्रह्मास्त्राचे उपक्रमोपसंहार ( ब्रह्मास्त्र टाकावें कसें व परत घ्यावें कसें तें ) जाणतो. लक्ष्मणाचें स्वरूप व त्यानें केलेली सेवा ही मी जाणून आहें. ॥ २ ॥ - लक्ष्मण स्वतांचे हाल करून माझी सेवा करितो - हें कळत असूनही मी त्याला - निषेधिलें नाहीं

त्वमेव साक्षाज्जगतामधीशो नारायणो लक्ष्मण एव शेषः ॥ युवां धराभारनिवारणार्थं जातौ जगन्नाटकसूत्रधारौ ॥ ६८॥ इति अ॰ रा॰ युद्धकाण्डे अष्टमः सर्गः ॥८॥ विभीषणवचः श्रुत्वा रामो वाक्यमथाब्रवीत् ॥ जानामि तस्य रौद्रस्य मायां कृत्स्नां विभीषण ॥ १ ॥ स हि ब्रह्मास्त्रविच्छूरो मायावी च महाबलः ॥ जानामि लक्ष्मणस्यापि स्वरूपं मम सेवनम् ॥ २ ॥ ज्ञात्वैवासमहं तूष्णीं भविष्यत्कार्यगौरवात् ॥

( मू. ) जातौ.' ॥ ६८ ॥ इति युद्धकाण्डे अष्टमः सर्गः ॥ ८ ॥ अथ रामः ( पू. ) वाक्यं अब्रवीत् – ॥ 'विभीषण, ( मू. ) मायां जानामि. ॥ १ ॥ ( पू. ). ॥ अहं ( मू. ) स्वरूपं जानामि. ॥ २ ॥ अहं ( पू. ) तूष्णीं आसं.' ॥

---

१ सृष्टिरूपी नाटकाचे चालक. २ अति तामस, अशा. ३ सगळ्या. ४ ब्रह्मास्त्रास जाणणारा. ५ होतों.





CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

( 'स्वतांचे हाल करून घेऊं नको, कांहीं खात जा; झोंप घे,' असें सांगितलें नाहीं )- ह्याचें कारण, मला, त्याच्या हातून पुढें महत्त्वाचें कार्य ( इंद्रजिताचा वध ) व्हावयाचें आहे, असें दिसत होतें, हें होय.' इतकें बोलून त्या महाज्ञानी पुरुषानें लक्ष्मणाला हांक मारिली व सांगितलें :- ॥ ३ ॥ 'लक्ष्मणा! मोठें सैन्य बरोबर घेऊन जा आणि रावणाच्या पुत्राचा वध कर. लक्ष्मणा! मारुति आदिकरून सर्व सेनापतींना समागमें असूं दे. ॥४ ॥ अस्वलांचा राजा जांबवान आपल्या सैन्यासह तुजबरोबर घेईल. बिभीषणही सचिवांना घेऊन तुझ्या संगतीं येत आहे. ॥५॥ ह्याला त्या प्रदेशाची चांगली माहिती आहे. विवरें कोठें आहेत, तीं सर्व हा जाणितो.' रामाची आज्ञा लक्ष्मणानें ऐकून शिरसा मान्य - केली. बिभीषण जवळ होताच. ॥ ६ ॥

इत्युक्त्वा लक्ष्मणं प्राह रामो ज्ञानवतां वरः ॥ ३ ॥ गच्छ लक्ष्मण सैन्येन महता जहि रावणिम् ॥ हनूमत्प्रमुखैः सर्वैर्यूथपैः सह लक्ष्मण ॥ ४ ॥ जाम्बवानृक्षराजोऽयं सह सैन्येन संवृतः ॥ विभीषणश्च सचिवैः सह त्वामभियास्यति ॥ ५ ॥ अभिज्ञस्तस्य देशस्य जानाति विवराणि सः ॥ रामस्य वचनं श्रुत्वा लक्ष्मणः सविभीषणः ॥ ६ ॥

ज्ञानवतांवरः रामः ( मू. ) - ॥ ३ ॥ 'लक्ष्मण, लक्ष्मण, महता ( मू. ) गच्छ; रावणिं जहि. ॥४॥ सैन्येन सह संवृतः अयं ( मू. ). ॥५॥ अभिज्ञः सः ( ६ पू. ) जानाति.' ॥ भीमपराक्रमः सविभीषणः लक्ष्मणः ( ६ मू. ) ॥

---

१ येईल. २ ज्ञाता ( माहितगार ).

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

लक्ष्मणाचा पराक्रम फार प्रखर असे. त्यानें हातांत दुसरें मोठें धनुष्य घेतलें आणि रामाच्या चरणकमलास स्पर्श ( वंदन ) करून प्रसन्न मुद्रेनें भाषण केलें :- ॥ ७ ॥ ' आज माझ्या धनुष्यापासून सुटलेले बाण इंद्रजिताचें शरीर फाडून भोगावतीच्या उदकांत स्नान करण्यासाठीं पाताळीं जाणार !' ॥८॥ तो लक्ष्मण इतकें बोलून आणि रामाला प्रदक्षिणा घालून इंद्रजिताला मारण्यासाठीं त्वरेनें पावलें उचलीत चालूं लागला. ॥ ९ ॥ पाठीमागून मारुति, बरोबर अनेक सहस्र वानर घेऊन, निघाला. बिभीषणही मंत्र्यांसह त्वरित

जग्राह कार्मुकं[1] श्रेष्ठमन्यद्भीमपराक्रमः ॥ रामपादाम्बुजं स्पृष्ट्वा[3] हृष्टः सौमित्रिरब्रवीत् ॥ ७ ॥ अद्य मत्कार्मुकान्मुक्ताः शरा निर्भिद्य[4] रावणिम् ॥ गमिष्यन्ति हि पातालं[5] स्नातुं[6] भोगावतीजले ॥ ८ ॥ एवमुक्त्वा स सौमित्रिः परिक्रम्य[7] प्रणम्य तम् ॥ इन्द्रजिन्निर्धनाकांक्षी[8] ययौ त्वरितविक्रमः ॥ ९ ॥ वानरैर्बहुसाहस्रैर्हनुमान्पृष्ठतोऽन्वगात् ॥ विभीषणश्च सहितो मन्त्रिभिस्त्वरितं ययौ ॥ १० ॥

अन्वय श्रेष्ठं कार्मुकं ( मू. ) - ॥ ६ ॥ ७ ॥ '( पू. ) निर्भिद्य, ॥ ( मू. ) स्नातुं गमिष्यन्ति.' ॥८॥ त्वरितविक्रमः सः सौमित्रिः तं ( पू. ) [ च ] ( मू. ) [ सन् ] ययौ. ॥ ९ ॥ हनूमान् बहुसाहस्रैः वानरैः [ सह ] ( पू. ). ॥ मन्त्रिभिः सहितः ( मू. ). ॥ १० ॥

१ धनुष्यास. २ धरिता झाला. ३ स्पर्श करून. ४ विदारण करून. ५ पाताळगंगेच्या उदकांत. ६ स्नान करण्यास. ७ प्रदक्षिणा घालून. ८ इंद्रजिताला मारण्याची इच्छा करणारा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

चालला. ॥ १० ॥ जांबवान व त्याच्या हाताखालचे रीस लक्ष्मणामागें घाईघाईनें चालूं लागले. लक्ष्मण वानरांसह, निकुंभिला जेथें होती, त्या प्रदेशीं जाऊन पोंचला; ॥ ११ ॥ इतक्यांत दुरून एक सैन्याचा घोळका त्याच्या दृष्टीस पडला. तो समुदाय राक्षसांचा होता. महापराक्रमी लक्ष्मण धनुष्य लववून ( सज्य करून ) सिद्ध झाला. ॥ १२ ॥ त्याच्या बरोबर वीर अंगद आणि जांबवान हे दोघे तयार झाले. त्या वेळीं राक्षसाधिपति बिभीषण लक्ष्मणाला ह्मणाला :– ' लक्ष्मणा ! हे राक्षस पहा. ॥ १३ ॥ हें जें मेघांसारखें काळें कुळकुळीत राक्षसांचें सैन्य दिसत आहे, त्या ह्या प्रचंड फळीला फोडण्याचा यत्न चालूं दे. ॥ १४ ॥

जाम्बवत्प्रमुखा ऋक्षाः सौमित्रिं त्वरया ऽन्वगुः[1] ॥ गत्वा निकुम्भिलादेशं लक्ष्मणो वानरैः सह ॥ ११ ॥ अपश्यद्बलसंघातं[2] दूराद्राक्षससंकुलम् ॥ धनुरायम्य[4] सौमित्रि-र्यत्तो[5] ऽभूद्भूरिविक्रमः[3] ॥ १२ ॥ अंगदेन च वीरेण जाम्बवान् राक्षसाधिपः ॥ तदा विभीषणः प्राह सौमित्रिं पश्य राक्षसान् ॥ १३ ॥ यदेतद्राक्षसानीकं मेघश्यामं[6] विलोक्यते ॥ अस्यानीकस्य महतो भेदने यत्नवान् भव ॥ १४ ॥

( मू. ) निकुम्भिलोदशं गत्वा, ॥११॥ ( पू. ) बलसंघातं अपश्यत्. ॥ भूरिविक्रमः सौमित्रिः (मू.). ॥ १२ ॥ वीरेण ( पू. ) [ यत्तः अभूत् ]. ॥ तदा राक्षसाधिपः ( मू. ) प्राह – ' राक्षसान् पश्य. ॥ १३ ॥ ( पू. ). ॥ महतः ( मू. ) ॥ १४ ॥

---

१ मागून गेले. २ सैन्यसमूहास. ३ महापराक्रमी. ४ लववून. ५ सिद्ध. ६ मेघांसारखें काळें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ह्या सैन्याची दाणादाण झाली कीं, रावणाचा पुत्रही दिसून येईल. त्याचें अनुष्ठान संपलें नाहीं, तोंपर्यंत तूं जलदीनें त्याच्या आंगावर चालून जा. ॥१५॥ त्या दुष्टाला हिंसा करणें हाच परम धर्म वाटतो. वीरा ! तूं त्याचा वध कर.' त्या शुभलक्षणसंपन्न लक्ष्मणानें विभीषणाचें ऐकून घेतलें, ॥ १६ ॥ व राक्षसाधिपतीच्या पुत्रावर बाणांचा वर्षाव चालविला. वानरसेनापति पाषाण, पर्वतशिखरें व वृक्ष ह्या आयुधांच्या योगें ॥१७॥ चोहोंकडून दैत्यांवर प्रहार करूं लागले. राक्षसांनींही वानरसेनापतींवर व वानरसेनेवर कुऱ्हाडी, तीक्ष्ण बाण, तरवारी, काठ्या, व तोमर ह्या शस्त्रांचा मारा चालविला. शस्त्रांच्या खणाखणीनें - आकाश दुमदुमविलें. -

राक्षसेन्द्रसुतोऽप्यस्मिन् भिन्ने दृश्यो भविष्यति ॥ अभिद्रवाशु यावद्वै नैतत्कर्म समाप्यते ॥१५॥ जहि वीर दुरात्मानं हिंसापरमधार्मिकम् ॥ विभीषणवचः श्रुत्वा लक्ष्मणः शुभलक्षणः॥१६॥ ववर्ष शरवर्षाणि राक्षसेन्द्रसुतं प्रति ॥ पाषाणैः पर्वताग्रैश्च वृक्षैश्च हरियूथपाः ॥१७॥ निर्जघ्नुः सर्वतो दैत्यांस्ते ऽपि वानरयूथपान् ॥ परश्वधैः शितैर्बाणैरसिभिर्यष्टितोमरैः ॥ १८ ॥ निर्जघ्नुर्वानरानीकं तदा शब्दो महानभूत् ॥

अस्मिन भिन्ने [ सति ] ( मू. ) न समाप्यते, [ तावत ] आशु अभिद्रव. ॥ १५ ॥ ( पू. ) दुरात्मानं जहि.' ॥ शुभलक्षणः लक्ष्मणः ( मू. ), ॥ १६॥ ( पू. ) शरवर्षाणि ववर्ष. ॥ हरियूथपाः (मू ) ॥ १७ ॥ सर्वतः दैत्यान, ( १८ पू. ), वानरानीकं [ च ] ( १८ उ. १९ पू. ) शब्दः अभूत. ॥

१ संपविलें जातें. २ आंगावर जा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तें वानरांचें व राक्षसांचें युद्ध मोठें तुमुल झालें. ॥ १८ ॥ १९ ॥ आपल्या सर्व सैन्याला अतिशय मार खावा लागत आहे, असें इंद्रजिताला दिसून आलें. तेव्हां तो लागलाच निकुंभिला आणि होम सोडून देऊन बाहेर पडला. ॥ २० ॥ तो मोठ्या त्वेषानें धनुष्य हातीं घेऊन व रथांत बसून रणभूमीवर आला आणि लक्ष्मणाला युद्धास बोलावून ह्मणाला :– ॥ २१ ॥ 'लक्ष्मणा! मी मेघनाद आहें! तूं माझ्या हातून जिवंत सुटणार नाहींस!' इतक्यांत इंद्रजिताची दृष्टि तेथें असलेल्या चुलत्यावर (विभीषणावर) गेली; तेव्हां ता त्याला निष्ठुर शब्द बोलला :– ॥ २२ ॥ "अरे! तूं माझ्या पित्याचा सख्खा भाऊ! लंकेंतच जन्मलास व इतका मोठा वाढलास! आणि सांप्रत त्या आपल्या हितकर्त्याला सोडून त्याच्या शत्रूची सेवा करीत

स संप्रहारस्तुमुलः संजज्ञे हरिरक्षसाम् ॥ १९ ॥ इन्द्रजित्स्वबलं सर्वमर्द्यमानं विलोक्य सः ॥ निकुम्भिलां च होमं च त्यक्त्वा शीघ्रं विनिर्गतः ॥ २० ॥ रथमारुह्य सधनुः क्रोधेन महता ऽगमत् ॥ समाह्वयित्वा सौमित्रिं युद्धाय रणमूर्धनि ॥ २१ ॥ सौमित्रे मेघनादो ऽहं मया जीवन्न मोक्ष्यसे ॥ तत्र दृष्ट्वा पितृव्यं स प्राह निष्ठुरभाषणम् ॥ २२ ॥ इहैव जातः संवृद्धः साक्षाद्भ्राता पितुर्मम ॥

हरिरक्षसां (मू.) संप्रहारः संजज्ञे. ॥ १८ ॥ १९ ॥ सः इन्द्रजित् सर्वं (मू.). ॥ २० ॥ सधनुः महता क्रोधेन [युतः सः] (पू.) युद्धाय अगमत्, (मू.) समाह्वयित्वा [आह –] ॥ २१ ॥ '(पू.).' सः तत्र पितृव्यं (मू.) प्राह – ॥ २२ ॥ '(पू.) पितुः भ्राता [असि]; ॥

---

१ युद्ध. २ झालें. ३ पीडिलें जाणारें. ४ धनुष्यासहित. ५ रणांगणांत. ६ बोलावून.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आहेस अँ! - धिक्कार असो तुला! - ॥ २३ ॥ मी तर तुझ्या पुत्रासारखा आहें. असें असतांना, तूं मजशीं द्वेष करण्यास प्रवृत्त होतोस कसा ! खरोखर, तुला ' अत्यंत अधम ' व ' नीच मनाचा ' हीं विशेषणें योग्य होत ! '' विभीषणाला असें बोलून इंद्रजितानें आपली दृष्टि मारुतीच्या पाठीवर बसलेल्या लक्ष्मणाकडे वळविली. ॥ २४ ॥ तो ( इंद्रजित ) ज्या विशाल रथांत बसला होता, त्यांत अनेक शस्त्रें व खड्गं सिद्ध ठेवलेलीं दिसत होतीं. त्यानें एक लांबलचक (साडेसात विती) धनुष्य उचलून त्याचा भयंकर टणत्कार केला. आणि ह्मटलें :- ॥ २५ ॥ ' वानरहो ! आज माझे बाण तुमच्या प्राणांचे घोट घेणार ! ' इकडे, शत्रूला

यस्त्वं स्वजनमुत्सृज्य परभृत्यत्वमागतः ॥ २३ ॥ कथं द्रुह्योसि पुत्राय पापीयानसि दुर्मतिः ॥ इत्युक्त्वा लक्ष्मणं दृष्ट्वा हनूमत्पृष्ठतः स्थितम् ॥ २४ ॥ उद्यदायुधनिस्त्रिंशे रथे महति संस्थितः ॥ महाप्रमाणमुद्यम्य घोरं विस्फारयन्धनुः ॥ २५ ॥ अद्य वो मामका बाणाः प्राणान्पास्यन्ति वानराः ॥ ततः शरं दाशरथिः संधायामित्रकर्शनः ॥ २६ ॥

( मू. ). ॥ २३ ॥ पुत्राय ( पू. ) असि ! ' ( मू. ) लक्ष्मणं दृष्ट्वा, ॥ २४॥ ( पू. ) रथे संस्थितः ॥ ( मू. ) उद्यम्य विस्फारयन् [ सन् उवाच – ] ॥ २५ ॥ ' वानराः ! मामकाः बाणाः ( पू. ) ! ' ( मू. ) दाशरथिः शरं सन्धाय, ॥ २६ ॥

---

१ दुसऱ्याच्या सेवेस. २ द्वेष करितोस. ३ उघड ठेविलीं आयुधें व खड्ग ज्यांत, अशा. ४ मोठ्या प्रमाणाचें ( साडेसात विती लांब ). ५ टणत्कार करणारा. ६ पितील. ७ शत्रूंला त्रासविणारा. ८ जोडून.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

जर्जर करणारा लक्ष्मण सिद्ध होताच. त्यानेंही लागलाच एक बाण जोडून ॥२६॥ राक्षसेश्वरावर सोडिला. लक्ष्मण क्रोधामुळें सापासारखा फोंफावत होता. इंद्रजितानें डोळे लाल करून लक्ष्मणाकडे पाहिलें. ॥ २७ ॥ लक्ष्मणानें सोडलेले इंद्राच्या वज्रासारखे तीक्ष्ण बाण आंगाला लागल्याबरोबर इंद्रजित क्षणमात्र मूर्छित झाला पण लागलींच त्याचीं इंद्रियें शुद्धीवर आलीं. ॥ २८ ॥ तों, वीर दशरथपुत्र ( लक्ष्मण ) आपल्या पुढें उभा आहे, असें त्याला दिसून आलें. तो शूर राक्षस क्रोधानें डोळे लाल करून लक्ष्मणाच्या आंगावर धांवून गेला, ॥ २९ ॥ व धनुष्याला बाण जोडून लक्ष्मणाला ह्मणाला :— तूं पहिल्या युद्धप्रसंगीं माझा परा-

ससर्ज राक्षसेन्द्राय क्रुद्धः सर्प इव [१]श्वसन् ॥ इन्द्रजिद्रक्तनयनो लक्ष्मणं [२]समुदैक्षत ॥ २७ ॥ [३]शक्राशनिसमस्पर्शैर्लक्ष्मणेनाहतः शरैः ॥ मुहूर्तमभवन्[४]मूढः पुनः प्रत्या-[५]हृतेन्द्रियः ॥ २८ ॥ ददर्शावस्थितं वीरं वीरो दशरथात्मजम् ॥ सो ऽभिचक्राम सौमित्रिं क्रोधसंरक्तलोचनः ॥ २९ ॥ शरान्धनुषि संधाय लक्ष्मणं चेदमब्रवीत् ॥ यदि ते प्रथमे युद्धे न दृष्टो मे पराक्रमः ॥ ३० ॥

( पू. ) [ सन ] राक्षसेन्द्राय ससर्ज. ॥ रक्तनयनः (मू.). ॥२७॥ लक्ष्मणेन ( पू. ) आहतः ॥ [ इन्द्रजित् ] मुहूर्तं मूढः ( मू. ) [ आसीत् ]. ॥ २८ ॥ वीरः ( पू. ) ददर्श. ॥ ( मू. ) सः सौमित्रिं अभिचक्राम, ॥ २९ ॥ ( पू. ) – ॥ ‘ ( मू. ) न दृष्टः, ॥ ३० ॥

१ फोंफावणारा. २ सोडिता झाला. ३ पाहता झाला. ४ इंद्राच्या वज्रासारखा स्पर्श ज्यांचा, अशा. ५ मूर्छित. ६ शुद्धीवर आलीं इंद्रियें ज्याचीं असा. ७ वर चालून गेला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

इंद्रजिताचें कवच फाटतें.

क्रम पाहिला नसलास तर ॥ ३० ॥ आज तुला दाखवितों. नीट जपून उभा राहा.' असें बोलून इंद्रजितानें लक्ष्मणाला सात बाण मारिले, ॥ ३१ ॥ आणि मारुतीवर तिखट धारेचे दहा उत्तम बाण सोडिले. तो पराक्रमी राक्षस विभीषणावर क्रोधामुळें दुप्पट खवळला होता; ह्मणून त्यानें धनुष्यापासून शंभर बाण सोडून त्याच्या ( विभीषणाच्या ) आंगाचे तुकडे काढिले! तसेंच लक्ष्मणानेंही शत्रूवर बाणसमूहाचा नुसता पाऊस पाडिला ! ॥ ३२ ॥ ३३ ॥ इंद्रजिताचें सुवर्णासारखें तेजःपुंज कवच बाण लागून तुटून उकललें व रथांत पडलें; तेथें पुन्हां बाण लागल्यामुळें त्याचे तिळाएवढे तुकडे होऊन भूमीवर पडले. ॥ ३४ ॥

**अद्य त्वां दर्शयिष्यामि तिष्ठेदानीं व्यवस्थितः॥ इत्युक्त्वा सप्तभिर्बाणैरभिविव्याध लक्ष्मणम् ॥ ३१ ॥ दशभिश्च हनूमन्तं तीक्ष्णधारैः शरोत्तमैः ॥ ततः शरशतेनैव संप्रयुक्तेन वीर्यवान्॥ ३२ ॥ क्रोधद्विगुणसंरब्धो निर्बिभेद विभीषणम् ॥ लक्ष्मणोऽपि तथा शत्रुं शरवर्षैरवाकिरत्॥ ३३ ॥ तस्य बाणैः सुसंविद्धं कवचं काञ्चनप्रभम् ॥ व्यशीर्यत रथोपस्थे तिलशः पतितं भुवि ॥ ३४ ॥**

[ तथा अपि] ( पू. ) तिष्ठ. ॥ ( मू. ) अभिविव्याध. ॥३१॥ ( ३२ पू. ) हनूमन्तं [ विव्याध ]॥ ( ३२ उ. ) [ सः ] ( ३३ पू. ) [ सन्] सम्प्रयुक्तेन शरशतेन एव विभीषणं निर्बिभेद. ॥ ( मू. ). ॥ ३२ ॥३३॥ (पू.) कवचं ॥ रथोपस्थे (मू.), [पुनः बाणैः] तिलशः [खण्डितं सत्] पतितं. ॥३४॥

१ प्रहार करिता झाला. २ क्रोधामुळें दुप्पट खवळलेला. ३ सोडिलेल्या. ४ भेदिता झाला. ५ आच्छादिता झाला. ६ ताडिलेलें. ७ चिलखत. ८ रथामध्यें. ९ उकललें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तेव्हां रावणपुत्राला अतिशयच संताप आला; त्यानें युद्धांत महापराक्रमी शूर लक्ष्मणाला सहस्र बाण मारिले. ॥ ३५ ॥ लक्ष्मणाचेंही दिव्य कवच उकलून खालीं पडलें. दोघांनीं एकमेकांच्या आंगावर धांवून आपल्या घेण्यादेण्याचा निकाल लाविला ( उधारी ठेविली नाहीं)! ॥३६ ॥ दोघेही एक सारखे धांपा टाकीत होते. पुन्हां तुमुल युद्ध चालू झालें. उभयतांचीं सर्वांगें बाणांनीं आच्छादिलीं असून जेथून तेथून रक्ताच्या धारा चालल्यामुळें भिजून गेलीं होतीं. ॥ ३७ ॥ दोघेही महापराक्रमी व शूर होते; त्यांनीं पुष्कळ वेळपर्यंत तीक्ष्ण बाणांच्या योगें परस्परांशीं युद्ध केलें; पण कोणालाही जय किंवा पराजय मिळाला नाहीं. ॥ ३८ ॥

ततः शरसहस्रेण संक्रुद्धो रावणात्मजः ॥ बिभेद समरे वीरं लक्ष्मणं भीमविक्रमम् ॥ ३५ ॥ व्यशीर्यतापतद्दिव्यं कवचं लक्ष्मणस्य च ॥ कृतप्रतिकृतान्योन्यं बभूवतुरभिद्रुतौ ॥ ३६ ॥ अभीक्ष्णं निःश्वसन्तौ तौ युध्येतां तुमुलं पुनः ॥ शरसंवृतसर्वांगौ सर्वतो रुधिरोक्षितौ ॥ ३७ ॥ सुदीर्घकालं तौ वीरावन्योन्यं निशितैः शरैः ॥ अयुध्यतां महासत्त्वौ जयाजयविवर्जितौ ॥ ३८ ॥

( पू. ) शरसहस्रेण ॥ ( मू. ) लक्ष्मणं बिभेद. ॥३५॥ ( पू. ) कवचं व्यशीर्यत, अपतत् च ॥ (मू.) बभूवतुः. ॥ ३६ ॥ ( मू. ) तौ पुनः तुमुलं अयुद्ध्येतां. ॥ ३७ ॥ महासत्वौ जयाजयविवर्जितौ तौ वीरौ ( मू. ). ॥ ३८ ॥

१ प्रहार करिता झाला. २ परस्परांच्या कार्यावर प्रतिकार केला ज्यांनीं असे. ३ वारंवार. ४ रक्तानें भिजलेले. ५ जय किंवा पराजय ह्यांनीं रहित.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

इंद्रजिताचें ध-
नुष्य तोडिलें.

इतक्यांत शूर लक्ष्मणानें, आपलें हस्तकौशल्य दाखविण्यासाठीं पांच बाण मारून, रावणपुत्राचा सारथि मारिला, घोड्यांसह रथ चुरला, आणि धनुष्याचे तुकडे उडविले! इंद्रजितानेंही झटपट दुसरें उत्तम धनुष्य घेऊन सज्य केलें. ॥ ३९ ॥ ४० ॥ लक्ष्मणानें तीन बाण मारून तेंही धनुष्य तोडून टाकिलें, व ज्याचें धनुष्य तुटलें अशा त्या शत्रूवर अनेक बाण सोडिले. ॥ ४१ ॥ इंद्रजिताचा पराक्रम फार मखर असे. त्यानें पुन्हां दुसरें धनुष्य घेऊन लक्ष्मणाला सूर्यासारखे चकचकीत तीक्ष्ण बाण मारिले, ॥ ४२ ॥

एतस्मिन्नन्तरे वीरो लक्ष्मणः पञ्चभिः शरैः ॥ रावणेः सारथिं साश्वं रथं च सम-चूर्णयत् ॥ ३९ ॥ चिच्छेद कार्मुकं तस्य दर्शयन्हस्तलाघवम्[1] ॥ सोऽन्यत्तु कार्मुकं भद्रं सज्यं चक्रे त्वरान्वितः ॥ ४० ॥ तच्चापमपि चिच्छेद लक्ष्मणस्त्रिभिराशुगैः[2] ॥ तमेव च्छिन्नधन्वानं[3] विव्याधानेकसायकैः[4] ॥ ४१ ॥ पुनरन्यत्समादाय कार्मुकं भीम-विक्रमः ॥ इन्द्रजिल्लक्ष्मणं बाणैः शितै[5]रादित्यसन्निभैः ॥ ४२ ॥

( मू. ). ॥ ३९ ॥ ( पू. ) दर्शयन् [ सन् ] तस्य कार्मुकं चिच्छेद. ॥ सः तु त्वरान्वितः [ सन् ] अन्यत् भद्रं ( मू. ). ॥ ४० ॥ लक्ष्मणः ( पू. ) चिच्छेद. ॥ ( मू. ) विव्याध. ॥ ४१ ॥ भीम-विक्रमः इन्द्रजित् ( पू. ) समादाय ॥ ( मू. ) बाणैः [ विव्याध ]. ॥ ४२ ॥

---

१ हस्तचापल्य. २ बाणांनीं. ३ तोडिलें धनुष्य ज्याचें, अशा. ४ अनेक बाणांनीं. ५ तीक्ष्ण.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आणि दिशा बाणांच्यायोगें भरून टाकून सर्व वानरांची दाणादाण उडविली. नंतर, लक्ष्मणानें एका बाणावर इंद्रास्त्राची स्थापना केली, तो बाण उचलून इंद्रजितावर रोंखून॥ ४३॥धनुष्यास जोडिला, व धनुष्य घट्ट आंवळून धरून दोरी कर्णापर्यंत ओढिली. अशा तयारीनें उभा राहिल्यावर तो वीर लक्ष्मण रामाच्या चरणकमलांचें स्मरण करीत ह्मणाला :– ॥ ४४ ॥ ' जर ( ज्या अर्थी ) दाशरथि राम परम धार्मिक, व सत्यवचनी आहे आणि जर त्रैलोक्यांत त्याच्या पुढें टिकणारा शत्रु कोणी नाहीं, तर ( त्या अर्थी ), हे बाणा! तूं ह्या रावणपुत्राचा वध कर. ' ॥ ४५ ॥ वीर लक्ष्मणानें अशी शपथ घालून तो सरळ जाणारा बाण कर्णापर्यंत

बिभेद वानरान्सर्वान्बाणैरापूरयन्दिशः ॥ तत ऐन्द्रं समादाय लक्ष्मणो रावणिं प्रति ॥ ४३ ॥ संधायाकृष्य कर्णान्तं कार्मुकं दृढनिष्ठुरम् ॥ उवाच लक्ष्मणो वीरः स्मरन् रामपदाम्बुजम् ॥ ४४ ॥ धर्मात्मा सत्यसन्धश्च रामो दाशरथिर्यदि ॥ त्रिलो-क्यामप्रतिद्वन्द्वस्तदेनं जहि रावणिम् ॥ ४५ ॥ इत्युक्त्वा बाणमाकर्णाद्विकृष्य तमजिह्मगम् ॥ लक्ष्मणः समरे वीरः ससर्जेन्द्रजितं प्रति ॥ ४६ ॥

(पू.) आपूरयन् [सन्] सर्वान् वानरान् बिभेद. ॥ ततः लक्ष्मणः (मू.) ॥४३॥ (पू.) कार्मुकं कर्णान्तं आकृष्य [ स्थितः ]. ॥ वीरः ( मू. ) स्मरन् [ सन् ] उवाच – ॥ ४४ ॥ 'दाशरथिः रामः (मू.) च यदि [ स्यात् ], तत् एनं रावणिं जहि. ' ॥ ४५ ॥ वीरः लक्ष्मणः ( पू. ) बाणं आकर्णात् विकृष्य, ( मू. ) ससर्ज. ॥ ४६ ॥

१ सत्य प्रतिज्ञा ज्याची, असा. २ ज्याच्या जोडीचा कोणी नाहीं, असा. ३ सरळ जाणाऱ्या( बाणा )ला. ४ सोडिता झाला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ओढिला आणि इंद्रजिताच्या आंगावर सोडून दिला.॥४६॥त्या बाणानें इंद्रजिताचें तेजःपुंज मस्तक धडापासून वेगळें करून भूमीवर पाडिलें! त्या शिरावर शिरस्त्राण (मुकुट) होतें व कानांत कुंडलें चमकत होतीं. ॥४७॥ त्या वेळीं देवांना परमानंद झाला. ते रघुवीराची कीर्ति वर्णूं लागले. स्वर्गांतून पुष्पवृष्टि झाली. देवांनीं रामाची स्तुति केली. ॥ ४८ ॥ देव आणि महर्षि ह्यांसह इंद्राला हर्ष झाला. आकाशांत देवांच्या नगाऱ्याचा शब्द ऐकूं येऊं लागला. ॥ ४९ ॥ आकाश स्वच्छ झालें. रावणाचा पुत्र मरण पावला, असें पाहून

स शरः सशिरस्त्राणं श्रीमज्ज्वलितकुण्डलम् ॥ प्रमथ्येन्द्रजितः कायात्पातयामास भूतले ॥ ४७ ॥ ततः प्रमुदिता देवाः कीर्तयन्तो रघूत्तमम् ॥ ववर्षुः पुष्पवर्षाणि स्तुवन्तश्च मुहुर्मुहुः ॥ ४८ ॥ जहर्ष शक्रो भगवान्सह देवैर्महर्षिभिः ॥ आकाशेऽपि च देवानां शुश्रुवे दुन्दुभिस्वनः ॥४९॥ विमलं गगनं चासीत्स्थिरा ऽभूद्धिश्वधारिणी ॥ निहतं रावणिं दृष्ट्वा जयजल्पसमन्वितः ॥ ५० ॥

( पू. ) ॥ इन्द्रजितः [ शिरः ] ( मू. ) पातयामास. ॥ ४७ ॥ ( पू. ) कीर्तयन्तः, ( मू. ) स्तुवन्तः च [ सन्तः ] पुष्पवर्षाणि ववर्षुः. ॥ ४८ ॥ भगवान् ( पू. ) [ च ] सह जहर्ष. ॥ ( मू. ) शुश्रुवे. ॥ ४९ ॥ गगनं च ( पू. ) स्थिरा अभूत. ॥ रावणिं ( मू. ) ॥ ५० ॥

---

१ मुकुटासह. २ हालवून ( हिसकाहिसक करून ). ३ शरीरापासून. ४ आनंद पावला. ५ नगाऱ्याचा शब्द. ६ ऐकूं आला. ७ पृथ्वी. ८ ' जय ' शब्दानें युक्त.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पृथ्वी स्थिर झाली. देवांनीं लक्ष्मणाचा जयजयकार केला. ॥ ५० ॥ - तो शब्द कानीं पडतांच - लक्ष्मणाचा श्रम दूर झाला. त्या समर्थानें रणांत शंख वाजविला, व सिंहनाद करून धनुष्याच्या दोरीचा टणत्कार केला. ॥५१॥ तो शब्द ऐकून वानरांना हर्ष वाटला व त्यांचे श्रम दूर झाले. वानरवीरांचीं अंतःकरणें समाधान पावलीं. त्यांनीं लक्ष्मणाची स्तुति केली. ॥५२॥ लक्ष्मणाचेंही मन प्रसन्न झालें. तो वानरांना बरोबर घेऊन परत आला. त्यानें हनुमान् आणि बिभीषण दोघांसहवर्तमान जाऊन नम्रतापुरःसर रामाचें दर्शन घेतलें. ॥५३॥ आपला वडील भाऊ राम साक्षात् सर्वव्यापी नारायण होय, हें - लक्ष्मणाला विदित होतें. - त्यानें रामाला वंदन करून म्हटलें :–'रघुवीरा! तुझ्या कृपेनें आज मी युद्धांत रावणपुत्राचा वध केला.'॥५४॥

गतश्रमः स सौमित्रिः शंखमापूरयद्रणे ॥ सिंहनादं ततः कृत्वा ज्याशब्दमकरोद्विभुः ॥५१॥ तेन नादेन संहृष्टा वानराश्च गतश्रमाः॥वानरेन्द्रैश्च सहितः स्तुवद्भिर्हृष्टमानसैः ॥ ५२ ॥ लक्ष्मणः परितुष्टात्मा ददर्शाभ्येत्य राघवम् ॥ हनूमद्राक्षसाभ्यां च सहितो विनयान्वितः ॥ ५३ ॥ ववन्दे भ्रातरं रामं ज्येष्ठं नारायणं विभुम् ॥ त्वत्प्रसादाद्रघुश्रेष्ठ हतो रावणिराहवे ॥ ५४ ॥

( पू. ) शंखं आपूरयत्. ॥ ततः विभुः ( मू. ). ॥५१॥ ( पू. ) [ बभूवुः ]. ॥ ( मू. ) वानरेन्द्रैः सहितः ॥ ५२ ॥ ( उ. ) परितुष्टात्मा ( पू. ) ददर्श, ॥५३॥ ज्येष्ठं ( पू. ) रामं ववन्दे, ॥ [ उवाच च – ] ' रघुश्रेष्ठ, ( मू. ) हतः. ' ॥५४॥

१ भरिता ( वाजविता ) झाला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

राम लक्ष्मणाची पाठ थोपटतो.

लक्ष्मणाच्या मुखांतून निघालेलें तें वाक्य कानीं पडतांच रघुवीराला आनंद झाला. त्यानें प्रेमपूर्वक लक्ष्मणाला पोटाशीं धरिलें व मस्तक हुंगून गोड शब्दांनीं त्याला ह्मटलें:— ॥९९॥ 'लक्ष्मणा! शाबास! तूं आज मोठें दुर्घट कार्य पार पाडिलेंस. मला फार संतोष झाला. हे शत्रुदमना! मेघनाद मेला, आतां आपण सर्व कांहीं जिंकलें, असें ह्मणण्यास चिंता नाहीं! ॥ ९६ ॥ तीन दिवस आणि तीन रात्री खटपट केलीस, तेव्हां तो मरण पावला आँ! एकंदरींत तो शूर खरा! आज तूं माझे सर्व शत्रु नाहींसे केलेस, असें मी समजतों आतां रावण पुत्रशोकास्तव मजबरोबर युद्ध करण्यास येईल. मग मी रावणाला मारितों.' महाबलाढ्य मेघनादाचा लक्ष्मणानें वध केला, ही वार्ता कानीं पडल्याबरोबर ॥ ९७ ॥ ९८ ॥

श्रुत्वा तल्लक्ष्मणाद्वक्त्या तमालिंग्य रघूत्तमः ॥ मूर्ध्न्यवघ्राय मुदितः सस्नेहमिदमब्रवीत् ॥ ५५ ॥ साधु लक्ष्मण तुष्टोऽस्मि कर्म ते दुष्करं कृतम् ॥ मेघनादस्य निधने जितं सर्वमरिन्दम ॥ ५६ ॥ अहोरात्रैस्त्रिभिर्वीरः कथंचिद्विनिपातितः ॥ निःसपत्नः कृतोऽस्म्यद्य निर्यास्यति हि रावणः ॥ ५७ ॥ पुत्रशोकान्मया योद्धुं तं हनिष्यामि रावणम् ॥ मेघनादं हतं श्रुत्वा लक्ष्मणेन महाबलम् ॥ ५८ ॥

रघूत्तमः लक्ष्मणात् तत् (मू.) [सन्] सस्नेहं इदं अब्रवीत् — ॥ ५५ ॥ 'लक्ष्मण, (पू.) कर्म कृतं. ॥ अरिन्दम, (मू.) जितं. ॥५६॥ त्रिभिः (९७ पू.). ॥ अद्य (९७ उ. ९८ पू.) निर्यास्यति; तं रावणं हनिष्यामि.' ॥ महाबलं (मू.) हतं श्रुत्वा, ॥ ५७ ॥ ५८ ॥

१ मरण झालें तेव्हां. २ दिवसरात्रींनीं. ३ शत्रुरहित. ४ निघेल.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रावण घेरी येऊन भूमीवर पडला. कांहीं वेळानें तो शुद्धीवर आला, व विलाप करूं लागला. पुत्रशोक तो! त्याच्या मनाला वाटे कीं, आतां आपण अगदीं निराधार झालों! ॥ ५९ ॥ तो मुलाचे गुण व चरित्रें आठवून आठवून रडे:– 'आज सगळे देवगण, लोकपाल, व महान् महान् ऋषि, ॥ ६० ॥ इंद्रजित मेला असें कळलें कीं, निर्भयपणें खुशाल झोंपा घेतील!' इत्यादि बहुतप्रकारें तो विलाप करूं लागला. त्याची मुलावर फारच प्रीति होती. ॥ ६१ ॥ पुढें तो राक्षसांचा राजा रावण अतिशयच चिडला. त्याला वाटलें कीं, युद्धांत सगळे राक्षस मारवून टाकावे झालें! - ह्मणून, त्यानें सगळ्यांना युद्धास जाण्याची - आज्ञा

रावणः पतितो भूमौ मूर्च्छितः पुनरुत्थितः ॥ विललापातिदीनात्मा पुत्रशोकेन रावणः ॥ ५९ ॥ पुत्रस्य गुणकर्माणि संस्मरन्पर्यदेवयत् ॥ अद्य देवगणाः सर्वे लोकपाला महर्षयः ॥ ६० ॥ हतमिन्द्रजितं ज्ञात्वा सुखं स्वप्स्यन्ति निर्भयाः ॥ इत्यादि बहुशः पुत्रलालसो विललाप ह ॥ ६१ ॥ ततः परमसंक्रुद्धो रावणो राक्षसाधिपः ॥ उवाच राक्षसान्सर्वान्निनाशयिषुराहवे ॥ ६२ ॥

( पू. ) [ सन् ] भूमौ पतितः, पुनः उत्थितः. ॥ पुत्रशोकेन ( मू. ) विललाप. ॥५९॥ ( पू. ) – ॥ 'अद्य सर्वे ( मू. ) [ च ] ॥ ६० ॥ इन्द्रजितं ( पू. ) [ सन्तः ] सुखं स्वप्स्यन्ति!' (मू.) [सन्] विललाप ह. ॥ ६१ ॥ (पू.) आहवे सर्वान् (मू.) रावणः [ 'युद्धाय गच्छध्वं' इति ] उवाच. ॥६२॥

---

१ शोक करूं लागला. २ झोंप घेतील. ३ पुत्राविषयीं वत्सल. ४ नाश करूं इच्छिणारा.

६।२०

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

दिली. ॥ ६२ ॥ तो शूर राक्षस पुत्र मेल्यामुळें संतप्त होऊन क्रोधाच्या अगदीं अधीन झाला. इतक्यांत त्याला एक विचार सुचला कीं, - सीता मेली कीं राम मरेल ! - ह्मणून तो सीतेला मारण्यासाठीं धांवत गेला ॥ ६३ ॥ सीता राक्षसींच्या समुदायामध्यें बसली होती. रावण क्रोधाच्या आवेशांत हातामध्यें खड्ग घेऊन इकडे येत आहे, असें पाहून ती भ्याली व शोकाकुल झाली ! ॥ ६४ ॥ ह्या प्रसंगीं रावणाचा सुपार्श्व नामक मंत्री तेथें होता. तो मनाचा निर्मळ, मोठा बुद्धिमान् व विचारी असे. त्यानें रावणाला सांगितलें :- ॥ ६५ ॥ ' दशवदना ! हें काय ! तूं प्रत्यक्ष कुबेराचा कनिष्ठ बंधु, वेदविद्येंत नि-

स पुत्रवधसंतप्तः शूरः क्रोधवशं गतः ॥ संवीक्ष्य रावणो बुद्ध्या हन्तुं सीतां प्रदुद्रुवे ॥६२॥ खड्गपाणिमथायान्तं क्रुद्धं दृष्ट्वा दशाननम् ॥ राक्षसीमध्यगा सीता भयशोकाकुला ऽभवत् ॥६४॥ एतस्मिन्नन्तरे तस्य सचिवो बुद्धिमान् शुचिः ॥ सुपार्श्वो नाम मेधावी रावणं वाक्यमब्रवीत् ॥ ६५ ॥ ननु नाम दशग्रीव साक्षाद्वैश्रवणानुजः ॥ वेदविद्याव्रतस्नातः स्वकर्मपरिनिष्ठितः ॥ ६६ ॥

( मू. ) संवीक्ष्य सीतां हन्तुं प्रदुद्रुवे. ॥ ६३ ॥ अथ राक्षसीमध्यगा सीता ( पू. ) दृष्ट्वा ( मू. ). ॥ ६४ ॥ ( मू. ) तस्य सचिवः रावणं, वाक्यं अब्रवीत् - ॥ ६५ ॥ ६६ ॥

१ बुद्धिमान् ( आठवणीचा धड ). २ कुबेराचा धाकटा भाऊ. ३ वेदविद्या व व्रतें ह्यांत निपुण. ४ स्वकर्माचरणांत दक्ष.





CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ष्णात, व्रतांमध्यें निपुण, स्वकर्माचरणांत तत्पर, असा ॥ ६६ ॥ अनेक गुणांनीं संपन्न आहेस, असें असून स्त्रीचा वध करूं इच्छितोस, तेव्हां तुला काय ह्मणावें ! ! आह्मांला बरोबर घेऊन रणांगणांत चल, तेथें रामाचा व लक्ष्मणाचा वध कर; ह्मणजे लागलीच सीता तुला प्राप्त होईल. - तिला व्यर्थ मारितोस कां ? - ' त्यानें असें सांगितलें असतां रावण माघारा फिरला. ॥ ६७ ॥ रावणाचें मन दुष्ट होतें खरें; पण ह्या प्रसंगीं त्या हितचिंतकानें सांगितलेलें धार्मिक वचन त्याला मान्य करावेंसें वाटलें. शोकामुळें त्याची बुद्धि मूढ झाली होती. तो घरीं गेला व इष्टमित्रांना बरोबर घेऊन लागलाच पुन्हां सभेंत आला. ॥ ६८ ॥

॥ इति श्रीमदध्यात्मरामायणार्थबोधे युद्धकाण्डे नवमः सर्गः ॥ ९ ॥

अनेकगुणसंपन्नः कथं स्त्रीवधमिच्छसि ॥ अस्माभिः सहितो युद्धे हत्वा रामं च लक्ष्मणम् ॥ प्राप्स्यसे जानकीं शीघ्रमित्युक्तः स न्यवर्तत ॥ ६७ ॥ ततो दुरात्मा सुहृदा निवेदितं वचः सुधर्म्यं प्रतिगृह्य रावणः॥ गृहं जगामाशु शुचा विमूढधीः पुनः सभां च प्रययौ सुहृद्वृतः ॥ ६८ ॥ इति श्रीम० युद्धकांडे नवमः सर्गः ॥ ९ ॥

( पू. ) [त्वं] स्त्रीवधं कथं इच्छसि ? ॥ अस्माभिः सहितः [ सन् ] (द्वि.) च हत्वा, ॥ जानकीं शीघ्रं प्राप्स्यसे. ' ( मू. ). ॥ ६७ ॥ ततः दुरात्मा रावणः ( पू. ) वचः प्रतिगृह्य ॥ शुचा विमूढधीः [सन्] गृहं आशु ( मू. ) [ सन् ] सभां प्रययौ. ॥ ६८ ॥ इति युद्धकाण्डे नवमः सर्गः ॥ ९ ॥

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रावण शुक्रा-
कडे गेला.

तो सभेमध्यें राक्षसमंत्र्यांबरोबर विचार करून उरलेल्या राक्षसांसहवर्तमान रामावर चालून गेला. ॥ १ ॥ हें त्याचें जाणें ह्मणजे पतंगानें पतंगांना बरोबर घेऊन, भडकलेल्या अग्नीवर चाल करण्यासारखेंच होतें! पुढें रामानें युद्धांत त्या सर्व राक्षसांचा वध केला. ॥ २ ॥ रावणाला, स्वतां रामाच्या हातून, वक्षःस्थलावर तीक्ष्ण बाणाचा प्रहार लागला; ह्मणून तो विव्हल होऊन लागलाच लंकेंत शिरला. ॥ ३ ॥ रामचंद्राचा व मारुतीचा अमानुष पराक्रम पुष्कळ वेळां दिसून आला, तेव्हां रावण सत्वर शुक्राचार्यांकडे गेला. ॥ ४ ॥ दशाननानें शुक्राचार्यांना नमस्कार करून व हात जोडून विनंति केली :– ‘गुरुवर्य! रामचंद्रानें राक्षससेना-

स विचार्य सभामध्ये राक्षसैः सह मन्त्रिभिः॥ निर्ययौ येऽवशिष्टास्तै राक्षसैः सह राघवम् ॥ १ ॥ शलभः[2] शलभैर्युक्तः प्रज्वलन्तमिवानलम्[3] ॥ ततो रामेण निहताः सर्वे ते राक्षसा युधि ॥ २ ॥ स्वयं रामेण निहतस्तीक्ष्णबाणेन वक्षसि ॥ व्यथित-स्त्वरितं लंकां प्रविवेश दशाननः ॥ ३ ॥ दृष्ट्वा रामस्य बहुशः पौरुषं चाप्यमा-नुषम् ॥ रावणो मारुतेश्चैव शीघ्रं शुक्रान्तिकं ययौ ॥४ ॥ नमस्कृत्य दशग्रीवः शुक्रं प्राञ्जलिरब्रवीत् ॥ भगवन् राघवेणैवं लंका राक्षसयूथपैः ॥ ५ ॥

( १ पू. ) सह विचार्य ॥ ( १ मू. ) शलभैः युक्तः (२ पू.) इव निर्ययौ. ॥ ( मू. ) निहताः. ॥१॥ ॥ २ ॥ ( पू. ) निहतः ॥ व्यथितः दशाननः ( मू. ). ॥३॥ रावणः रामस्य, मारुतेः च एव ( पू. ) पौरुषं दृष्ट्वा, ॥ (मू. ). ॥४॥ दशग्रीवः शुक्रं (पू.) [सन] अब्रवीत् – ॥ ‘ ( मू. ) सह लङ्का ॥ ५ ॥

१ उरलेले. २ पतंग. ३ पेटलेल्या. ४ अग्नीस.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पतींसह लंकेचा अशा प्रकारें ॥ ५ ॥ नाश चालविला आहे! त्यानें माझे मोठमोठे दैत्य, पुत्र, व बंधुजन मारिले! आपल्यासारख्या उत्तम गुरूंचा आश्रय असतांना मजवर दुःखसमूह कोसळावा कसा?' ॥ ६ ॥ ही विज्ञापना ऐकल्यावर दैत्यांचे गुरु शुक्राचार्य दशाननाला ह्मणाले :– 'रावणा, तूं कांहींतरी प्रयत्नानें एकांतीं होम कर. ॥ ७ ॥ जर अनुष्ठानांत कांहीं विघ्न आलें नाहीं, तर होमाग्नीपासून उत्पन्न झालेला ॥८॥ एक प्रचंड रथ, घोडे, धनुष्य, बाणांनीं भरलेला भाता, इतकें साहित्य तयार होईल. ही सामग्री तुला मिळाली कीं, तूं अजिंक्य होशील. ॥ ९ ॥ मी देतों हे मंत्र घे (शीक), जा; आणि लवकर होम कर.' गुरुजींनीं

विनाशिता महादैत्या निहताः पुत्रबान्धवाः ॥ कथं मे दुःखसंदोहस्त्वयि तिष्ठति सद्गुरौ ॥ ६ ॥ इति विज्ञापितो दैत्यगुरुः प्राह दशाननम् ॥ होमं कुरु प्रयत्नेन रहसि त्वं दशानन ॥ ७ ॥ यदि विघ्नो न चेद्धोमे तर्हि होमानलोत्थितः ॥ ८ ॥ महान् रथश्च वाहाश्च चापतूणीरसायकाः ॥ संभविष्यन्ति तैर्युक्तस्त्वमजेयो भविष्यसि ॥९॥ गच्छ गृहाण मन्त्रान्मद्दत्तान् होमं कुरु द्रुतम् ॥ इत्युक्तस्त्वरितं गत्वा रावणो राक्षसाधिपः॥ १० ॥

(पू.) [च] निहताः. ॥ त्वयि सद्गुरौ तिष्ठति [सति], (मू.) कथं?' ॥ ६ ॥ (पू.) प्राह – ॥ 'दशानन, त्वं रहसि प्रयत्नेन (मू.). ॥ ७ ॥ यदि होमे (मू.) ॥ ८ ॥ (पू.) च ॥ (मू.). ॥ ९ ॥ मद्दत्तान मन्त्रान् (पू.) कुरु. ॥ (मू.) रावणः त्वरितं गत्वा, ॥ १० ॥

---

१ दुःखसमूह.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

असें सांगितलें असतां राक्षसाधिपति रावण त्वरित निघाला. ॥ १० ॥ त्यानें आपल्या मंदिरांत पातालसारखी एक गुहा तयार करविली, लंकेचीं द्वारें कवाडें इत्यादि चोहोंकडून भक्कम बंद करून घेतलीं, ॥ ११ ॥ जारणमारणाच्या कामीं उपयुक्त ह्मणून सांगितलेली होमसामग्री संपादन केली आणि गुहेंत शिरून एकांतीं होम आरंभिला. त्यानें मौनव्रत धरिलें होतें. ॥ १२ ॥ धुराचा मोठा लोट निघूं लागला. तो दृष्टीस पडल्याबरोबर रावणाचा कनिष्ठ बंधु ( विभीषण ) भयभीत झाला. त्यानें रामाला तो होमाचा धूर दाखविला, - व ह्मटलें :- ॥ १३ ॥ ' रामा ! पहा रावणानें होम करण्यास प्रारंभ केला आहे ! जर होम समाप्त झाला

गुहां पातालसदृशीं मन्दिरे स्वे चकार ह॥लंकाद्वारकपाटादि बध्वा सर्वत्र यत्नतः ॥ ११ ॥ होमद्रव्याणि संपाद्य यान्युक्तान्याभिचारिके ॥ गुहां प्रविश्य चैकान्ते मौनी होमं प्रचक्रमे ॥ १२ ॥ उत्थितं धूममालोक्य महान्तं रावणानुजः ॥ रामाय दर्शयामास होमधूमं भयाकुलः ॥ १३ ॥ पश्य राम दशग्रीवो होमं कर्तुं समारभत् ॥ यदि होमः समाप्तः स्यात्तदाऽजेयो भविष्यति ॥ १४ ॥

स्वे मन्दिरे ( पू. ) गुहां चकार ह. ॥ सर्वत्र यत्नतः ( मू. ), ॥ ११ ॥ अभिचारिके यानि उक्तानि, [ तानि ] ( मू. ) [ सन् ] होमं प्रचक्रमे. ॥ १२ ॥ रावणानुजः उत्थितं महान्तं (पू.), ॥ भयाकुलः [ सन् ] ( मू. ) दर्शयामास, [ उवाच च – ] ॥ १३ ॥ ' राम, (मू). ॥ १४ ॥



१ दुसऱ्याच्या घातासाठीं जें अनुष्ठान त्यामध्यें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तर रावण अजिंक्य होईल! ॥ १४ ॥ म्हणून, होमांत विघ्न करण्यासाठीं लवकर मोठमोठ्या वानरांना पाठवून दे.' रामानें 'बरें' म्हणून सुग्रीवाचें मत घेतलें, आणि अंगदवानराला ॥ १५ ॥ व मारुति आदिकरून महाबलाढ्य वीरांना - तिकडे जाण्याविषयीं - आज्ञा दिली. ते कोट वलांडून रावणाच्या मंदिराजवळ गेले. ॥ १६ ॥ एकंदर दहाकोटि वानर निघाले होते. त्यांनीं तेथें पोंचल्यावर मंदिराच्या पाहरेकऱ्यांचीं हाडें नरम केलीं व क्षणमात्रांत घोडे आणि हत्ती मारून टाकिले. ॥ १७ ॥ पुढें, पांहांटच्या वेळीं सरमेनें हाताची खूण करून वानरांना होमस्थल कोठें आहे तें कळविलें. ही सरमा

अतो विघ्नाय होमस्य प्रेषयाशु हरीश्वरान् ॥तथेति रामः सुग्रीवसंमतेनांगदं कपिम् ॥ १५ ॥ हनूमत्प्रमुखान्वीरानादिदेश महाबलान् ॥ प्राकारं लंघयित्वा ते गत्वा रावणमन्दिरम् ॥ १६ ॥ दशकोट्यः प्लवंगानां गत्वा मन्दिररक्षकान् ॥ चूर्णयामासुरश्वांश्च गजांश्च न्यहनन् क्षणात् ॥ १७॥ ततश्च सरमा नाम प्रभाते हस्तसंज्ञया ॥ विभीषणस्य भार्या सा होमस्थानमसूचयत् ॥ १८ ॥

अतः होमस्य ( पू. ) प्रेषय.'॥ रामः 'तथा' इति [ उक्त्वा], ( मू. ), ॥१५॥ महाबलान् ( पू. ) ॥ [ च ] आदिदेश. ॥ ते (मू.) गत्वा [ युयुधिरे ]. ॥ १६ ॥ प्लवङ्गानां ( मू. ) न्यहनन्. ॥ १७ ॥ ततः सरमा नाम सा विभीषणस्य भार्या ( मू. ). ॥ १८ ॥

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

होमाचा वि-
ध्वंस.

विभीषणाची भार्या होय. ॥ १८ ॥ गुहेच्या तोंडावर आच्छादनासाठीं मोठी शिळा ठेविली होती. महापराक्रमी अंगदानें लाथा मारून तो दगड फोडिला आणि त्या महामुहेंत प्रवेश केला. ॥ १९ ॥ त्या ठिकाणीं रावण डोळे मिटून व निश्चल आसन घालून बसला होता. तो दृष्टीस पडल्याबरोबर, अंगदाची आज्ञा घेऊन, सगळे वानर भराभर आंत शिरले ॥ २० ॥ व तेथें गडबड करूं लागले. त्यांनीं सेवकांना यथेच्छ बडविलें व चोहोंकडून सगळें साहित्य त्या होमकुंडांत टाकिलें. ॥ २१ ॥ मारुतीनें तर संतापून रावणाच्या हातांतील स्रुची बलात्कारें हिसकून घेतली; व तो वानरसेनापति तिच्या योगेंच रावणाला बडवूं लागला. ॥ २२ ॥

गुहापिधानपाषाणमंगदः पादघट्टनैः[1] ॥ चूर्णयित्वा महासत्त्वः प्रविवेश महागुहाम् ॥ १९ ॥ दृष्ट्वा दशाननं तत्र मीलिताक्षं[3] दृढासनम् ॥ ततोऽगदाज्ञया सर्वे वानरा विविशुर्द्रुतम् ॥ २० ॥ तत्र कोलाहलं चक्रुस्ताडयन्तश्च सेवकान् ॥ संभारांश्चिक्षिपुस्तत्र होमकुण्डे समन्ततः ॥ २१ ॥ स्रुवमाच्छिद्य हस्ताच्च रावणस्य बलाद्रुषा ॥ तेनैव संजघानाशु हनूमान् प्लवगाग्रणीः ॥ २२ ॥

महासत्वः अङ्गदः ( मू. ) प्रविवेश. ॥ १९ ॥ तत्र ( पू. ) दशाननं दृष्ट्वा [ स्थितः ]. ॥ ( मू. ) विविशुः, ॥ २० ॥ तत्र सेवकान् ताडयन्तः [ सन्तः ] ( मू. ) सम्भारान् चिक्षिपुः. ॥ २१ ॥ प्लवगाग्रणीः हनूमान् रुषा रावणस्य हस्तात्, बलात् ( मू. ) संजघान. ॥ २२ ॥

१ गुहेच्या आच्छादनाच्या दगडाला. २ पादप्रहारांनीं. ३ मिटले डोळे ज्यानें, अशा. ४ फेंकिते झाले. ५ वानरांचा पुढारी. ६ हिसकून घेऊन.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

इकडून तिकडून सगळे वानर त्याला चावत व लांकडांनीं बडवीत. इतके प्रहार लागत होते तरी रावणानें आपलें ध्यान सोडिलें नाहीं; कारण, त्याच्या मनांत - अग्नीपासून रथादि सामग्री मिळवून शत्रूंना - जिंकण्याची इच्छा होती. ॥ २३ ॥ पुढें अंगद त्वरेनें रावणाच्या मंदिराकडे पळत जाऊन अंतःपुरांत शिरला व सुंदर मंदोदरीचा बुचडा धरून तिला घेऊन आला. ॥ २४ ॥ अंगदानें तिला रावणाच्या अगदीं समोर उभें केलें, व ती दीनासारखा आक्रोश करीत असतां, तिची रत्नांनीं सुशोभित केलेली कंचुकी फाडिली. ॥२५॥ चोळीवरील मोत्यें रत्नसमूहासह तुटून भराभर खालीं गळून पडलीं. - वानरांनीं केलेल्या हिसकाहिसकींत, -

घ्नन्ति दन्तैश्च काष्ठैश्च वानरास्तमितस्ततः ॥ न जहौ रावणो ध्यानं हतो ऽपि विजिगीषया ॥ २३ ॥ प्रविश्यान्तःपुरे वेश्मन्यंगदो वेगवत्तरः ॥ समानयत्केशबन्धे धृत्वा मन्दोदरीं शुभाम् ॥ २४ ॥ रावणस्यैव पुरतो विलपन्तीमनाथवत् ॥ विददारांगदस्तस्याः कञ्चुकं रत्नभूषितम् ॥ २५ ॥ मुक्ता विमुक्ताः पतिताः समंताद्रत्नसंचयैः ॥

( पू. ) दन्तैः, काष्ठैः च घ्नन्ति [ स्म ]. ॥ हतः अपि ( मू. ) ध्यानं न जहौ. ॥ २३ ॥ वेगवत्तरः अङ्गदः ( २४ पू. ) प्रविश्य, ॥ अनाथवत् विलपन्तीं शुभां मन्दोदरीं (२४ उ. २५ पू.) समानयत्. ( मू. ) कंचुकं विददार. ॥ २४ ॥ २५ ॥ मुक्ताः विमुक्ताः [सद्यः ] (पू.) [सह भुवि] पतिताः. ॥

---

१ मारतात. २ जिंकण्याच्या इच्छेनें. ३ सोडिता झाला. ४ फार वेगवान्. ५ वेणीच्या ठिकाणीं. ६ फाडिता झाला. ७ मोत्यें. ८ रत्नसमूहांनीं.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तिचें कटिसूत्र तुटून भूमीवर पडलें ! त्यावर चित्रविचित्र रत्नें बसविलीं होतीं. ॥२६॥ तिची निरी कटिप्रदेशा-पासून सुटली ! व सगळे अलंकार जिकडेतिकडे पडले ! हा सर्व प्रकार रावणाच्या डोळ्यांसमोरच चालला होता ! ॥ २७ ॥ वानर मोठ्या आनंदभरांत आले होते; ते देवांच्या आणि गंधर्वांच्या कन्यांना घेऊन आले. रावणाच्या अग्रभागीं मंदोदरी अतिशय शोक करूं लागली : – ॥ २८ ॥ ती बिचारी करुणस्वरानें विलाप करीत रावणाला ह्मणाली :– ‘ अरे ! तूं पक्का निर्लज्ज आहेस ! शत्रु प्रत्यक्ष तुझ्या समोर बायकोला केश-पाश धरून असे फरफरां ओढतात, आणि तूं खुशाल होम करीत बसला आहेस ! तुला लाज वाटत

श्रोणिसूत्रं[1] निपतितं त्रुटितं[2] रत्नचित्रितम् ॥२६॥ कटिप्रदेशाद्विस्रस्ता नीवी त
स्यैव पश्यतः ॥ भूषणानि च सर्वाणि पतितानि समंततः ॥ २७ ॥ देवगन्धर्व-
कन्याश्च नीता हृष्टैः प्लवंगमैः ॥ मन्दोदरी रुरोदाथ रावणस्याग्रतो भृशम्॥२८॥
क्रोशन्ती करुणं दीना जगाद[4] दशकन्धरम् ॥ निर्लज्जोऽसि परैरेवं केशपाशे
विकृष्यते ॥ २९ ॥ भार्या तवैव पुरतः किं जुहोषि[5] न लज्जसे ॥

रत्नचित्रितं ( मू ) [ सत् ] निपतितं. ॥ २६ ॥ तस्य पश्यतः [ सतः ] एव, नीवी[3] ( पू. ). ॥
सर्वाणि ( मू. ) पतितानि. ॥ २७ ॥ हृष्टैः प्लवङ्गमैः ( पू. ) [ होमस्थानं ] नीताः. ॥ अथ ( मू. )
रुरोद. ॥ २८ ॥ दीना [ सा ] करुणं क्रोशन्ती [ सती ] दशकन्धरं जगाद – ॥ ‘ त्वं निर्लज्जः
असि [ यत् तव ] भार्या तव एव पुरतः ( २९ उ. ३० पू. )? ॥

१ कमरपट्टा. २ तुटलेलें. ३ निरी. ४ बोलली. ५ होम करीत आहेस.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

नाहीं काय? दुष्ट शत्रु डोळ्यांदेखत ज्याच्या बायकोला मारतात, ॥ २९ ॥ ३० ॥ त्यानें तत्क्षणीं त्याच जागीं जीव द्यावा! अशा स्थितींत जगण्यापेक्षां मरणें फार चांगलें!! मेघनादा! हाय हाय! वानर तुझ्या मातेचा छळ करीत आहेत रे! ॥ ३१ ॥ तूं जिवंत असतांस, तर मजवर असा दुःखाचा प्रसंग आला असता काय? माझ्या पतीनें केवळ स्वतांच्या जीविताची आशा धरिली आणि बायको व लाज अगदीं सोडिली!' ॥ ३२ ॥ तो मंदोदरीचा विलाप ऐकून, राजा दशानन लागलाच उठला. त्यानें खड्ग उचलून 'देवीला (राणीला, मंदोदरीला) सोड!' असें ह्मणत, ॥ ३३ ॥ अंगदाच्या कटिप्रदेशीं

हन्यते पश्यतो यस्य भार्या पापैश्च शत्रुभिः ॥ ३० ॥ मर्तव्यं तेन तत्रैव जीविता-न्मरणं वरम् ॥ हा मेघनाद ते माता क्लिश्यते बत वानरैः ॥ ३१ ॥ त्वयि जीवति मे दुःखमीदृशं च कथं भवेत् ॥ भार्या लज्जा च संत्यक्ता भर्त्रा मे जीविताशया ॥ ३२ ॥ श्रुत्वा तद्देवितं राजा मन्दोदर्या दशाननः ॥ उत्तस्थौ खड्गमादाय त्यज देवीमिति ब्रुवन् ॥ ३३ ॥ जघानांगदमव्यग्रः कटिदेशे दशाननः ॥

यस्य पश्यतः[1] [सतः] (मू.) हन्यते[2], ॥ २९ ॥ ३० ॥ तेन तत्र एव (मू.) क्लिश्यते बत! ॥ ३१ ॥ त्वयि जीवति [सति], मे ईदृशं (पू.)? ॥ मे भर्त्रा जीविताशया (मू.).' ॥ ३२ ॥ राजा दशाननः (पू.) देवितं[3] श्रुत्वा, ॥ (मू.) 'देवीं त्यज' इति ब्रुवन् [सन्] उत्तस्थौ. ॥ ३३ ॥ अव्यग्रः दशाननः (पू.) जघान. ॥

१ पाहणारा अशा. २ मारिली जाते. ३ विलापास.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

प्रहार केला. रावण अगदीं घाबरला नव्हता. हवनकर्मापासून रावणाला मोठेंच फळ मिळावयाचें होतें. त्या अनुष्ठानाच्या विध्वंस केल्यावर वानर तें स्थल सोडून निघून गेले, ॥ ३४ ॥ व सर्वजण आनंदित होत्साते रामाच्या सन्निध जाऊन उभे राहिले. इकडे रावणानें पुढील उपदेश करून पत्नीचें सांत्वन केलें :– ॥३५॥ " सुंदरि ! सर्व गोष्टी दैवाच्या स्वाधीन आहेत. जीवंत राहणाऱ्या प्राण्याला अमुक प्रसंग भोगावा लागणार नाहीं असा कांहीं नियम आहे काय ? ( जो प्रसंग येईल, तो भोगला पाहिजे ). हे विशालनयने ! अशा निश्चित ज्ञानाचा आश्रय करून शोक सोडून दे. ॥ ३६ ॥शोक अज्ञानामुळें उद्भवतो; शोक ज्ञानाचा नाश करितो; शरीरादि जड पदार्थांवर ' अहं (मी) ' अशी बुद्धि होण्याला कारण अज्ञान होय; ॥ ३७ ॥ पुत्र स्त्रिया इत्यादिकांचा संबंध घडण्याचें मूळ कारण तरी अज्ञानच; कर्मबंधन, हर्ष, शोक, भय, क्रोध,

ततोत्सृज्य[1] ययुः सर्वे विध्वंस्य हवनं महत् ॥ ३४ ॥ रामपार्श्वमुपागम्य तस्थुः सर्वे प्रहर्षिताः ॥ रावणस्तु ततो भार्यामुवाच परिसांत्वयन् ॥ ३५ ॥ दैवाधीनमिदं भद्रे जीवता[2] किन्न दृश्यते ॥ त्यज शोकं विशालाक्षि ज्ञानमालम्ब्य निश्चितम् ॥ ३६ ॥ अज्ञानप्रभवः शोकः शोको ज्ञानविनाशकृत् ॥ अज्ञानप्रभवाऽहंधीः शरीरादिष्वनात्मसु[3] ॥ ३७ ॥ तन्मूलः पुत्रदारादिसंबन्धः संसृतिस्ततः ॥

( मू. ) हवनं विध्वंस्य, उत्सृज्य [ च ] ययुः. ॥३४॥ सर्वे ( पू. ) तस्थुः. ॥ ततः ( मू. ) [ सन् ] उवाच – ॥ ३५ ॥ ' भद्रे, जीवता ( मू. ) ज्ञानं आलम्ब्य, शोकं त्यज. ॥ ३६ ॥ ( पू. ). ॥ अनात्मसु शरीरादिषु अहंधीः ( मू. ) [ अस्ति ]. ॥ ३७ ॥ ( पू. ) संसृतिः. ॥

१ ततः ( नंतर ) + उत्सृज्य ( सोडून ). २ जगणारानें. ३ जड.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

लोभ, मोह, काम इत्यादि सर्व विकार अज्ञानमूलक होत. ॥ ३८ ॥ जन्म, मृत्यु, जरा हे भाव तरी अज्ञानामुळें उद्भवतात. आत्मा तर एक, शुद्ध ( निर्गुण ), मायाकार्याहून वेगळा, अलिप्त, ॥ ३९ ॥ आनंदरूपी व ज्ञानमय आहे; त्याला सुखदुःखादि कोणतेही भाव नाहींत; त्या अबाधितस्वरूपी आत्म्याचा कोणाशींही संयोग किंवा वियोग होत नाहीं. ॥ ४० ॥ साध्वि ! आजपर्यंत तुझ्या वर्तनाला कोणी दोष दिलेला नाहीं. तूं स्वकीय आत्म्याचें रूप असें जाणून शोक सोडून दे. मी आतांच जातों, व लक्ष्मणासह रामाचा वध करून ॥ ४१ ॥ येतों. नाहीं तर श्रीराम वज्रतुल्य बाणांच्या योगें माझें शरीर छिन्नभिन्न करील. व

हर्षशोकभयक्रोधलोभमोहस्पृहादयः ॥ ३८ ॥ अज्ञानप्रभवा ह्येते जन्ममृत्युजरादयः ॥ आत्मा तु केवलः शुद्धो व्यतिरिक्तो ह्यलेपकः ॥ ३९ ॥ आनन्दरूपो ज्ञानात्मा सर्वभावविवर्जितः ॥ न संयोगो वियोगो वा विद्यते केनचित्सतः ॥ ४० ॥ एवं ज्ञात्वा स्वमात्मानं त्यज शोकमनिन्दिते ॥ इदानीमेव गच्छामि हत्वा रामं सलक्ष्मणम् ॥ ४१ ॥ आगमिष्यामि नो चेन्मां दारयिष्यति सायकैः ॥

[ एवं ] ( मू. ), ॥ ३८ ॥ ( पू. ) च अज्ञानप्रभवाः. ॥ ( मू. ) ॥ ३९ ॥ ( पू. ). ॥ सतः केनचित् ( मू. ) न विद्यते. ॥ ४० ॥ अनिन्दिते, ( पू. ) ज्ञात्वा शोकं सज. ॥ ( मू. ) रामं हत्वा, ॥ ४१ ॥ ( मू. ) वज्रकल्पैः[1] सायकैः[2] मां दारयिष्यति[3]. ॥

---

१ वज्रतुल्य. २ बाणांच्या योगें. ३ विदारण करील.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रावणाची
इच्छा.

त्याच्या हातून मरण आलें ह्मणजे मी त्याच्या पदास प्राप्त होईन. ॥४२॥ प्रिये! तसा प्रसंग ओढवला तर, तूं माझें एक काम करावेंस, अशी मी तुला आज्ञा देतों :- तूं प्रथम सीतेला मार व मग माझ्याबरोबर अग्नींत प्रवेश कर." ॥४३॥ हें रावणाचें भाषण ऐकून मंदोदरीला पराकाष्ठेचें दुःख झालें : ती त्याला ह्मणाली :- 'नाथा ! खरोखर, मी काय सांगत्यें, तें ऐकावें, आणि त्याप्रमाणें वागावें. ॥४४॥ महाराज ! आपल्याला काय, आणि दुसरे किती वीर आले तरी त्यांना काय, रामाचा पराभव करतां येणें कधींही शक्य नाहीं. राम साक्षात् देवाधिदेव व प्रकृतीचा आणि जीवांचा नियामक होय. ॥४५॥ ह्याच भक्तवत्सल प्रभु राघवानें पूर्वी एका क-

श्रीरामो वज्रकल्पैश्च ततो गच्छामि तत्पदम् ॥ ४२ ॥ तदा त्वया मे कर्तव्या क्रिया मच्छासनात्प्रिये ॥ सीतां हत्वा मया सार्धं त्वं प्रवेक्ष्यसि पावकम् ॥ ४३ ॥ एवं श्रुत्वा वचस्तस्य रावणस्यातिदुःखिता ॥ उवाच नाथ मे वाक्यं शृणु सत्यं तथा कुरु ॥४४॥ शक्यो न राघवो जेतुं त्वया चान्यैः कदाचन ॥ रामो देववरः साक्षात्प्रधानपुरुषेश्वरः ॥ ४५ ॥ मत्स्यो भूत्वा पुरा कल्पे मनुं वैवस्वतं प्रभुः ॥

ततः तत्पदं गच्छामि. ॥ ४२ ॥ प्रिये, ( पू. ) कर्तव्या. ॥ त्वं ( मू. ) प्रवेक्ष्यसि.[1] ॥ ४३ ॥ ( पू. ) वचः श्रुत्वा अतिदुःखिता [ मन्दोदरी ] ॥ उवाच - नाथ, मे सत्यं ( मू. ). ॥ ४४ ॥ ( पू. ) च कदाचन जेतुं[3] न शक्यः. ॥ ( मू. ). ॥ ४५ ॥ प्रभुः भक्तवत्सलः राघवः पुरा कल्पे ( मू. ) मनुं

१ अग्नीस. २ प्रवेश करिशील. ३ जिंकिण्यास.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

त्यांत मत्स्यावतार घेऊन वैवस्वत मनूला सकल संकटांतून सोडविलें. ॥४६॥ राम पूर्वीं कांसव झाला होता; ह्या कांसवाचें शरीर एक लक्ष योजनें विस्तीर्ण होतें; त्यानें समुद्रमंथनाचे वेळीं आपल्या पाठीवर सुवर्णपर्वत (मंदर) उचलून धरिला.॥४७॥ ह्याच महासमर्थानें एके प्रसंगीं वराहासारखें शरीर धारण करून पृथ्वीला - रसातलांतून - वर आणिलें आणि अतिशय मदोन्मत्त झालेल्या हिरण्याक्षाचा वध केला. ॥४८॥ पूर्वीं हिरण्यकशिपु नांवाचा एक दैत्य त्रैलोक्याला कांट्याप्रमाणें छळीत असे; रघुनंदनानें नारसिंह रूप घेऊन त्याचा वध केला. ॥ ४९ ॥ ह्या रघुवीरानें पूर्वीं बलीला - बांधून घेतलें व तीनच पावलांनीं त्रैलोक्य आक्रमण करून देवेंद्राला दिलें; इंद्र

**ररक्ष सकलापद्भ्यो राघवो भक्तवत्सलः॥ ४६ ॥ रामः कूर्मोऽभवत्पूर्वं लक्षयोजनविस्तृतः॥ समुद्रमथने पृष्ठे दधार कनकाचलम्॥ ४७ ॥ हिरण्याक्षोऽतिदुर्वृत्तो हतोऽनेन महात्मना॥ क्रोडरूपेण वपुषा क्षोणिमुद्धरता क्वचित्॥ ४८ ॥ त्रिलोककण्टकं दैत्यं हिरण्यकशिपुं पुरा॥ हतवान्नारसिंहेन वपुषा रघुनन्दनः ॥ ४९ ॥ विक्रमैस्त्रिभिरेवासौ बलिं बद्ध्वा जगत्त्रयम्॥**

ररक्ष. ॥ ४६ ॥ (पू.) कूर्मः अभवत्, ॥ (मू.) दधार. ॥ ४७ ॥ क्वचित् (उ.) अनेन महात्मना अतिदुर्वृत्तः (पू.). ॥ ४८ ॥ पुरा रघुनन्दनः (पू.) दैत्यं (मू.) हतवान्. ॥ ४९ ॥ असौ रघुसत्तमः बलिं बध्वा, त्रिभिः एव (मू.)

१ सकल संकटांपासून. २ सुवर्णपर्वताला (मंदराला). ३ धरिता झाला. ४ वराहरूपी. ५ शरीरानें. ६ पृथ्वीला. ७ उचलणाऱ्या. ८ अतिदुराचारी. ९ पावलांनीं.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ह्याचा सेवक होय. ॥ ५० ॥ एके काळीं, जिकडेतिकडे क्षत्रियस्वरूपी राक्षस उत्पन्न होऊन पृथ्वीला अतिशय भार झाला होता; त्यावेळीं ह्या रामानें - परशुराम अवतार - धरिला, व क्षत्रियांचा अनेक ( एकवीस ) वेळां संहार करून पृथ्वी जिंकिली आणि मुनीला ( कश्यपाला ) देऊन टाकिली. ॥ ५१ ॥ तोच परात्पर परमात्मा सांप्रत रघुवंशामध्यें अवतरला आहे. तुझा वध करण्यासाठीं त्याला मनुष्यरूप घ्यावें लागलें : तो हा राम ! ॥ ५२ ॥ तूं त्याची भार्या सीता वनांतून बलात्कारें चोरून आणिलीस कशाला बरें ? माझ्या पुत्राचा नाश व्हावा व स्वतांलाही मृत्यु यावा एवढ्यासाठींच कीं नाहीं ? ॥ ५३ ॥ आतां तरी जानकीला

आक्रम्यादात्सुरेन्द्राय भृत्याय रघुसत्तमः ॥ ५० ॥ राक्षसाः क्षत्रियाकारा जाता भूमेर्भरावहाः ॥ तान्हत्वा बहुशो रामो भुवं जित्वा ह्यदान्मुनेः ॥ ५१ ॥ स एव सांप्रतं जातो रघुवंशे परात्परः ॥ भवदर्थे रघुश्रेष्ठो मानुषत्वमुपागतः ॥ ५२ ॥ तस्य भार्या किमर्थं वा हृता सीता वनाद्बलात् ॥ मम पुत्रविनाशार्थं स्वस्यापि निधनाय च ॥ ५३ ॥ इतः परं वा वैदेहीं प्रेषयस्व रघूत्तमे ॥

( मू. ) सुरेन्द्राय अदात्. ॥ ५० ॥ ( पू. ) जाताः; ॥ रामः तान् बहुशः ( मू. ) अदात्. ॥ ५१ ॥ सः एव परात्परः ( पू. ) जातः. ॥ रघुश्रेष्ठः ( मू. ). ॥५२॥ ( मू. ) बलात्, वनात् किमर्थं हृता ? ॥ ५३ ॥ ( पू. ) प्रेषयस्व. ॥

१ पायांखालीं घालून. २ सेवकाला. ३ जिंकून. ४ देता झाला. ५ मरण्यासाठीं. ६ पाठव.





CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रघुवीराकडे पाठवून दे, राज्य विभीषणाच्या स्वाधीन कर व मग आपण वनांत जाऊं.[1] ' ॥ ५४ ॥ मंदोदरीचें भाषण ऐकिल्यावर रावण बोलूं लागला :– ' सुंदरि ! मी रामाकडून युद्धांत पुत्रांचा, भावांचा व राक्षससमूहाचा घात करविला, तेव्हां आतां वनांत जाऊन जिवंत राहूं कसा ? मला लोकांना तोंड तरी कसें दाखवितां येईल ? ॥ ५५ ॥ म्हणून, मी रामाबरोबर युद्ध करितों.[2] रामाचे बाण अतिशय भराभर चालत असतात; ते लागून माझें शरीर छिन्नभिन्न होईल, - मग मी मृत्यु पावेन व - त्या विष्णूच्या परमपदास प्राप्त होईन. ॥ ५६ ॥ रामचंद्र विष्णु होय, हें मी जाणतों; जानकी लक्ष्मीचा अवतार, हेंही मला ठाऊक आहे. जाणूनबुजूनच मी जनककन्येला–सीतेला–वनांतून बलात्कारें घेऊन आलों. उद्देश इतकाच कीं,

विभीषणाय राज्यं तु दत्त्वा गच्छामहे वनम् ॥ मन्दोदरीवचः श्रुत्वा रावणो वाक्यमब्रवीत् ॥ ५४ ॥ कथं भद्रे रणे पुत्रान् भ्रातॄन् राक्षसमण्डलम् ॥ घातयित्वा राघवेण जीवामि वनगोचरः ॥ ५५ ॥ रामेण सह योत्स्यामि रामबाणैः सुशीघ्रगैः[3] ॥ विदार्यमाणो यास्यामि तद्विष्णोः परमं पदम् ॥ ५६ ॥ जानामि राघवं विष्णुं लक्ष्मीं जानामि जानकीम् ॥ ज्ञात्वैव जानकी सीता मया ऽऽनीता वनाद्बलात् ॥ रामेण निधनं प्राप्य यास्यामीति परं पदम् ॥ ५७ ॥

( द्वि. ) गच्छामहे. रावणः ( मू. ) – ॥ ५४ ॥ ' ( पू. ) [ च ] ॥ राघवेण ( मू. ) इव कथं जीवामि ? ॥ ५५ ॥ ( पू. ) रामबाणैः ॥ विदार्यमाणः [ सन् ] ( पू. ) यास्यामि. ॥ ५६ ॥ राघवं विष्णुं ( पू. ) लक्ष्मीं जानामि. ॥ मया, ( तृ. ) यास्यामि इति ॥ ( द्वि. ) आनीता. ॥ ५७ ॥

१ जाऊं. २ युद्ध करीन. ३ फार वेगानें जाणाऱ्या.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रामाच्या हातून मरण पावून सद्गतीस जावें. ॥ १७ ॥ प्रिये! मी तुला सोडून व संसाराचा त्याग करून मृतबंधूंबरोबर गमन करणार. रामानें युद्धांत माझा वध केला ह्मणजे मी, मुमुक्षु लोक ज्या परमानंदमय पवित्र पदाला पावतात, ॥१८॥ त्या गतीस जाईन. - अंतकाळीं रामदर्शन झालें ह्मणजे, - ह्या राक्षसदेहांत माझ्या हातून घडलेलीं सर्व पापें धुपून जातील. मग, मुक्ति जरी दुर्लभ आहे, तरी मला निश्चयानें मिळेल. ॥१९॥ प्रिये ! हा संसार ह्मणजे एक समुद्रच होय. ह्या समुद्रामध्यें पांच क्लेश ( १ अविद्या, २ अस्मिता, ३ राग, ४ द्वेष, ५ अभिनिवेश ), व त्या पांचांपासून उद्भवणाऱ्या स्थूलवृत्ति ह्या लाटा उसळत असतात; एकामागून एक येणारीं सुखें व दुःखें हे भोंवरे भरून राहिले आहेत; स्त्री, पुत्र, आप्त, द्रव्य बंधु इत्यादि जलजंतु

"विमुच्य त्वां तु संसाराद्गमिष्यामि सह प्रिये ॥ परानन्दमयी शुद्धा सेव्यते या मुमुक्षुभिः ॥ ५८ ॥ तां गतिं तु गमिष्यामि हतो रामेण संयुगे ॥ प्रक्षाल्य कल्मषाणीह मुक्तिं यास्यामि दुर्लभाम् ॥ ५९ ॥ क्लेशादिपञ्चकतरंगयुगं भ्रमाढ्यं दारात्मजाप्तधनबन्धुझषाभियुक्तम् ॥"

प्रिये, त्वां ( पू. ) [मृतबन्धुभिः सह] गमिष्यामि. ॥ मुमुक्षुभिः ( मू. ) सेव्यते, ॥५८॥ [ अहं ] संयुगे रामेण हतः [ सन् ] ( पू. ), इह कल्मषाणि ( मू. ) मुक्तिं यास्यामि. ॥ ५९ ॥

१ युद्धांत. २ पापें. ३ धुवून. ४ अविद्या ( अनित्य अपवित्र व दुःखरूप अशा जड पदार्थांना नित्य पवित्र व सुखरूप आत्मा ह्मणणें ), अस्मिता ( अहंपणा – शरीराविगळा आत्मा नाहीं असें समजणें ), राग, द्वेष, अभिमान असे पांच क्लेश ह्या लाटा ज्यांत अशा प्रवृत्तिरूप भ्रमानें संपन्न. ५ स्त्री, पुत्र, इष्ट, द्रव्य, बंधु ह्या मगरांनीं युक्त.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

फिरत असतातच; वडवाग्नीसारखा प्रखर तेजस्वी स्वकीय क्रोध राहतो; आणि मदनरूपी जाळें पसरून ठेविलेलें आहे. मी हा संसारसमुद्र तरून हरिपदीं जातों. ॥ ६० ॥ इति दशमः सर्गः ॥ १० ॥ रावणानें मंदोदरीराणीला प्रेमपूर्वक असें गुह्य सांगून, रामाबरोबर युद्ध करण्यासाठीं रणांगणांत जावयाची तयारी चालविली. ॥ १ ॥ तो, भयंकर राक्षसांना बरोबर घेऊन, रथांत बसला. त्याचा रथ अतिशय बळकट होता; त्याला सोळा चाकें असून संरक्षणासाठीं वरूथ (छपरी) होतें व - मोठा - दांडा होता. ॥२॥ त्याला जे गर्दभ जोडिले होते, त्यांचीं तोंडें पिशाचासारखीं भयंकर होतीं; ह्मणून तो ( रथ ) दृष्टीस पडला कीं भय

और्वानलाभनिजरोषमनंगजालं संसारसागरमतीत्य हरिं व्रजामि ॥ ६० ॥ इति श्रीम० युद्धकाण्डे दशमः सर्गः ॥ १० ॥ इत्युक्त्वा वचनं प्रेम्णा राज्ञीं मन्दोदरीं तदा ॥ रावणः प्रययौ योद्धुं रामेण सह संयुगे ॥ १ ॥ दृढं स्यन्दनमास्थाय वृतो घोरैर्निशाचरैः ॥ चक्रैः षोडशभिर्युक्तं सवरूथं सकूबरम् ॥ २ ॥ पिशाचवदनैर्घोरैः खरैर्युक्तं भयावहम् ॥ सर्वास्त्रशस्त्रसहितं सर्वोपस्करसंयुतम् ॥ ३ ॥

( मू. )'. ॥ ६० ॥ इति दशमः सर्गः ॥ १० ॥ रावणः तदा ( १ पू. ) इति वचनं उक्त्वा ( १ मू. ) योद्धुं षोडशभिः ( २ उ. ३ मू. ) दृढं स्यन्दनं आस्थाय ( २ पू. ) वृतः [ सन् ] प्रययौ. ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥

---

१ वडवानल ह्या नांवाचा स्वकीय क्रोध ज्यांत आहे अशा. २ मदन हें जाळें ज्यांत, अशा ३ उल्लंघून. ४ जातों. ५ रथास. ६ बसून. ७ छपरीसह. ८ जोकडासह. ९ पिशाचासारखीं मुखें ज्यांचीं, अशा. १० गर्दभांनीं. ११ सर्व साहित्यांनीं युक्त.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

वाटे. आंत सर्व शस्त्रें व अस्त्रें ठेविलीं असून सकल साहित्य भरलें होतें. ॥ ३ ॥ रावणाची आकृति फार भयंकर असे. तो अशा थाटानें एकदम बाहेर पडला. रावण दिसण्यांत उग्र होता. व तो रणांत फार निर्दय-पणाचें कृत्य करी. ह्मणून त्याला येतांना पाहिल्याबरोबर वानरसेना, राम तिचें रक्षण करीत होता तरी, घाबरून गेली. ॥ ४ ॥ मारुति उडी मारून रावणाशीं युद्ध करण्यास सरसावला. मारुतीच्या पराक्रमाला उपमाच देतां येत नसे. त्यानें जवळ येऊन राक्षसाच्या वक्षःस्थलावर, ॥ ५ ॥ घट्ट मूठ आंवळून, वेगानें प्रहार केला. त्या मुष्टिप्रहाराबरोबर रावण मूर्छा येऊन गुडघे टेंकून रथांत पडला, पण कांहीं वेळानें पुन्हां सावध झाला व मारुतीला ह्मणाला :– 'तूं शूर आहेस हें मी कबूल करितों.' ॥ ६ ॥ ७ ॥

निश्चक्रामाथ सहसा रावणो भीषणाकृतिः[1] ॥ आयान्तं रावणं दृष्ट्वा भीषणं रणकर्कशम् ॥ संत्रस्ताऽभूत्तदा सेना वानरी रामपालिता ॥ ४ ॥ हनूमानथ चोत्प्लुत्य रावणं योद्धुमाययौ ॥ आगत्य हनुमान् रक्षोवक्षस्यतुलविक्रमः ॥ ५ ॥ मुष्टिबन्धं दृढं बद्ध्वा ताडयामास वेगतः ॥ तेन मुष्टिप्रहारेण जानुभ्यां[3]मपतद्रथे ॥ ६ ॥ मूर्च्छितोऽथ मुहूर्तेन रावणः पुनरुत्थितः ॥ उवाच च हनूमन्तं शूरोऽसि मम संमतः ॥ ७ ॥

( पू. ) रावणः सहसा निश्चक्राम. ॥ तदा रामपालिता वानरी सेना ( द्वि. ) रावणं आयान्तं दृष्ट्वा ( मू. ). ॥ ४ ॥ अथ ( पू. ). ॥ अतुलविक्रमः हनुमान् ( मू. ) ॥ ५ ॥ ( पू. ) ताडयामास. ॥ [ रावणः ] ( मू. ) अपतत्. ॥ ६ ॥ ( पू. ) हनुमन्तं उवाच – ॥ '( मू. ) असि.' ॥ ७ ॥



१ भयंकर स्वरूपाचा. २ बाहेर पडला. ३ गुडघ्यांनीं. ४ पडला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मारुति त्याला ह्मणाला :– ' छिः ! रावणा ! तूं जिवंत राहिलास त्या अर्थी धिक्कार असो मला ! ! बरें पण, रावणा ! तूं अगोदर माझ्या छातीवर एक गुद्दा मारून घे; ॥८॥ कारण, नंतर मी तुला मारणार आहें, त्या प्रहाराबरोबर तूं प्राण सोडशील, ह्याबद्दल संशयच नलगे, - मग, तुझ्या मनांत मला मारायाची इच्छा असेल, ती तशीच राहून जाईल ! ! - ' रावणानेंही ' ठीक आहे ' ह्मणून वक्षःस्थलावर मुष्टिप्रहार केला, ॥९॥ त्याबरोबर मारुतीच्या डोळ्यांपुढें काजवे चमकले आणि त्याला किंचित् मूर्छा आली. वानरेश्वर शुद्धीवर येतांच रावणाला मारण्यास धांवला.॥१०॥तेंव्हां राक्षसाधिपति रावण भिऊन दुसरेकडे गेला. हनुमान्, अंगद, नल तसाच नील ॥११॥ हे चौघे सारखे एकाशीं एक उभे होते. त्यांना समोर अग्निवर्ण, सर्परोमा, खड्गरोमा

हनूमानाह तं धिङ् मां यस्त्वं जीवसि रावण ॥ त्वं तावन्मुष्टिना वक्षो मम ताडय रावण ॥८॥ पश्चान्मया हतः प्राणान्मोक्ष्यसे नात्र संशयः ॥ तथेति मुष्टिना वक्षो रावणेनापि ताडितः ॥ ९ ॥ विघूर्णमाननयनः[1] किंचित्कश्मलमाययौ[2] ॥ संज्ञामवाप्य[3] [4] कपिराट् रावणं हन्तुमुद्यतः ॥ १० ॥ ततो ऽन्यत्र गतो भीत्या रावणो राक्षसाधिपः ॥ हनूमानंगदश्चैव नलो नीलस्तथैव च ॥ ११ ॥

हनुमान् तं आह – ' रावण, मां ( पू. ). ॥ रावण, ( मू. ) वक्षः ताडय. ॥ ८ ॥ ( पू. ) न. ' ॥ रावणेन अपि ' तथा ' इति [ उक्त्वा ], ( मू. ) ॥ ९ ॥ ( पू. ). ॥ कपिराट् ( मू. ). ॥ १० ॥ राक्षसाधिपः रावणः भीत्या ( मू. ) नलः, नीलः च ॥ ११ ॥

१ गरगर फिरतात ( पांढरे झाले ) डोळे ज्याचे असा. २ मूर्च्छेस. ३ शुद्धीस. ४ पावून.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

चार वानरांचें चौघां राक्षसांशीं युद्ध.

आणि वृश्चिकरोमा॥१२॥हे चौघे मोठे राक्षस दिसले. तेव्हां चौघां वानरांनीं क्रमानें चार दैत्यांशीं युद्ध चालविलें. शेवटीं ते त्या चौघांही पराक्रमी राक्षसांना मारून ॥ १३ ॥ वेगवेगळे भुःभुःकार करीत रामाजवळ गेले. इतक्यांत रावण संतापून दांत ओंठ चावीत ॥ १४ ॥ डोळे वटारून रामाच्या आंगावर धांवला. रावण रथांत बसला होता; व राम - भूमीवरच उभा होता. - पण त्या क्रूर राक्षसानें ती रामाची स्थिति मनांत न आणितां त्याच्यावर वज्रतुल्य महाभयंकर बाणांचे ॥ १५ ॥

चत्वारः [१]समवेता ऽग्रे दृष्ट्वा राक्षसपुंगवान् ॥ [२]अग्निवर्णं तथा सर्प[३]रोमाणं खड्ग[४]रोमकम् ॥ १२ ॥ तथा वृश्चि[५]करोमाणं निर्जघ्नुः क्रमशो ऽसुरान् ॥ [६]चत्वारश्[७]चतुरो[८] हत्वा राक्षसान् भीमविक्रमान् ॥ १३ ॥ सिंहनादं पृथक्कृत्वा रामपार्श्वमुपागताः ॥ ततः क्रुद्धो दशग्रीवः संदश्य [९]दशनच्छदम् ॥ १४ ॥ वि[१०][११]वृत्य नयने क्रूरो राम[१२]मेवान्वधावत ॥ दशग्रीवो रथस्थस्तु रामं वज्रोपमैः शरैः ॥ १५ ॥

( पू. ) दृष्ट्वा, ॥ ( मू. ), ॥ १२ ॥ (पू.) क्रमशः निर्जघ्नुः. ( मू. ) राक्षसान् हत्वा, ॥ १३ ॥ पृथक् ( मू. ) संन्दश्य, ॥ १४ ॥ क्रूरः [ सन् ] नयने (१५पू.) रथस्थः (१५मू.) महाघोरैः शरैः तोयदैः[१३]

१ मिळालेले. २ अग्नीच्या रंगाचा, अशा. ३ सर्पासारखे आंगावरील केंस ज्याचे, अशा. ४ तरवारींसारखे केंस ज्याचे, अशा. ५ विंचवासारखे केंस ज्याचे, अशा. ६ मारिते झाले. ७ चार. ८ चौघांना. ९ दांतांच्या आच्छादनास ( ओंठास ). १० चावून. ११ टवकारून. १२ रोंखानें धांवला. १३ मेघ.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

प्रहार चालविले. मेघ उदकाच्या धारा सोडतो त्याप्रमाणें रावण बाण सोडीत होता. त्यानें रामाच्या समक्ष सर्व वानरांनाही जर्जर करून सोडिलें. ॥१६॥ युद्धांत राम मुळींच डगमगला नाहीं तर अग्नीसारख्या चकचकीत व सुवर्णानें मढविलेल्या बाणांचा रावणावर वर्षाव करीत होता. ॥ १७ ॥ रावण रथांत बसला आहे व राम भूमीवर उभा आहे, असें पाहून इंद्रानें मातलीला हांक मारिली व सांगितलें कीं, ॥ १८ ॥ माझा रथ घे व भूमीवर राम उभा आहे त्याजकडे लवकर जा; हे पुण्यवंता! भूतलावर सत्वर जाऊन एवढें माझें कार्य कर. ॥ १९ ॥ इंद्रानें अशी आज्ञा दिली असतां तो देवसारथि मातलि त्याला वंदन करून व लागलेच त्या उत्तम

आजघान महाघोरैर्धाराभिरिव तोयदः ॥ रामस्य पुरतः सर्वान्वानरानपि विव्यथे ॥ १६ ॥ ततः पावकसंकाशैः शरैः काञ्चनभूषणैः ॥ अभ्यवर्षद्रणे रामो दशग्रीवं समाहितः ॥ १७ ॥ रथस्थं रावणं दृष्ट्वा भूमिष्ठं रघुनन्दनम् ॥ आहूय मातलिं शक्रो वचनं चेदमब्रवीत् ॥१८॥ रथेन मम भूमिष्ठं शीघ्रं याहि रघूत्तमम् ॥ त्वरितं भूतलं गत्वा कुरु कार्यं ममानघ॥१९॥एवमुक्तो ऽथ तं नत्वा मातलिर्देवसारथिः॥

( १६ पू. ) आजघान. ॥ ( मू. ). ॥ १५ ॥ १६ ॥ ततः रामः समाहितः [ सन् ] ( पू. ) शरैः ( मू. ) अभ्यवर्षत्. ॥ १७ ॥ शक्रः ( पू. ) [ च ] दृष्ट्वा मातलिं ( मू. ) वचनं अब्रवीत्– ॥ १८ ॥ ‘ अनघ, मम रथेन शीघ्रं ( पू. ) याहि. ॥ ( मू. ) कार्यं कुरु. ’ ॥ १९ ॥ अथ ( पू. ) ॥

१ त्रास देऊं लागला. २ अग्नीसारख्या. ३ इंद्र. ४ भूमीवर उभा असणाऱ्या. ५ बोलावून.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रथाला हिरवे घोडे जोडून - घेऊन - ॥ २० ॥ रामाचा विजय व्हावा एवढ्यासाठीं रामाजवळ आला. इंद्राचा रथ इतर सगळ्याच प्राण्यांना दिसत नसे. पुढें, त्या रथांत बसलला मातलि हात जोडून रामाला म्हणाला :– ' रघुवीरा ! मला देवेंद्रानें पाठविलें आहे. ॥ २१ ॥ प्रभो ! हा देवराजाचा रथ, त्यानें तुझा विजय होण्यासाठीं, धाडिला आहे. महाराज ! हें सुशोभित इंद्रधनुष्य, हें कधींही न फुटणारें कवच, हा खड्ग, तसेच हे दोन दिव्य भाते–इतकें उपकरण मी आणिलें आहे. - ॥ २२ ॥ रामा ! ह्या रथावर आरोहण कर;

ततो हयैश्च संयोज्य हरितैः स्यन्दनोत्तमम् ॥ २० ॥ स्वर्गाज्जयार्थं रामस्य ह्युपचक्राम मातलिः ॥ अब्रवीच्च ततो राममप्रतर्क्यरथे स्थितः ॥ प्राञ्जलिर्देवराजेन प्रेषितोऽस्मि रघूत्तम ॥ २१ ॥ रथोऽयं देवराजस्य विजयाय तव प्रभो ॥ प्रेषितश्च महाराज धनुरैन्द्रं च भूषितम् ॥ अभेद्यं कवचं खड्गं दिव्यतूणीयुगं तथा ॥ २२ ॥ आरुह्य च रथं राम रावणं जहि राक्षसम् ॥

तं नत्वा ततः हरितैः ( मू. ) संयोज्य [ जगाम ]. ॥ २० ॥ अप्रतर्क्यरथे स्थितः मातलिः स्वर्गात् रामस्य (पू.), ॥ ततः प्रांजलिः [सन्] रामं (द्वि.) च – 'रघूत्तम, [अहं] (मू.). ॥ २१ ॥ प्रभो, (पू) रथः तव विजयाय ॥ (द्वि.) ऐन्द्रं धनुः, ॥ तथा (मू.) च [प्रेषितं]. ॥ २२ ॥ राम, रथं ( पू. ) ॥

१ हिरव्या. २ उत्तम रथास. ३ जवळ आला. ४ लोकांना न दिसणाऱ्या रथांत. ५ इंद्रानें. ६ न फुटणारें. ७ चिलखत. ८ उत्तम भात्यांची जोडी.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मी तुझें सारथ्य करितों. आणि, देवा, तूं, जसा देवेंद्रानें वृत्रासुर मारिला त्याप्रमाणें, त्या राक्षसाचा–रावणाचा–वध कर.' ॥ २३ ॥ मातलीनें असें सांगितलें असतां, राम त्या उत्तम रथाला प्रदक्षिणा घालून व वंदन करून रथावर चढला. ह्या वेळीं, - 'आतां रावणाचा वध लवकरच होणार' असें वाटून - लोकांच्या मुखांवर टवटवी आली. ॥२४॥ नंतर त्या महासमर्थ रामचंद्राचें व त्या कुशल रावणाचें महायुद्ध चालू झालें. तो भयंकर देखावा पाहून प्रेक्षक जनांच्या आंगावर कांटा उभा राहिला ! ॥२५॥ रामचंद्र अस्त्रविद्येंत परिपूर्ण होता; राक्षसाधिपति जें अस्त्र सोडी, त्याचा, राम त्याच अस्त्राच्या योगें प्रतीकार करीत असे–आग्नेय अस्त्रावर आग्नेय अस्त्र सोडी व इंद्रास्त्रावर इंद्रास्त्र सोडी आणि रावणाचें अस्त्र हतवीर्य करीत असे. ॥२६॥

मया सारथिना देव वृत्रं देवपतिर्यथा ॥ २३ ॥ इत्युक्तस्तं परिक्रम्य नमस्कृत्य रथोत्तमम् ॥ आरुरोह रथं रामो लोकाँल्लक्ष्म्या नियोजयन्[1] ॥ २४ ॥ ततोऽभवन्महायुद्धं भैरवं रोमहर्षणम्[2] ॥ महात्मनो राघवस्य रावणस्य च धीमतः ॥ २५ ॥ आग्नेयेन च आग्नेयं दैवं दैवेन राघवः ॥ अस्त्रं राक्षसराजस्य जघान परमास्त्रवित् ॥ २६ ॥

( मू. ) देवपतिः वृत्रं, [ तथा ] जहि. ' ॥ २३ ॥ इति उक्तः रामः तं रथोत्तमं ( पू. ) [ च ] ( मू. ) [ सन ] रथं आरुरोह. ॥ २४ ॥ ( उ. ) रावणस्य च ( पू. ) महायुद्धं अभवत्. ॥ २५ ॥ परमास्त्रवित् राघवः ( पू. ) दैवं च ॥ राक्षसराजस्य ( मू. ). ॥ २६ ॥

१ जोडणारा. २ रोमांच थरारविणारें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रावणालाही अस्त्रांची चांगली माहिती होती; पुढें त्यानें अत्यंत क्रुद्ध होऊन रामावर एक भयंकर राक्षसी अस्त्र सोडिलें. ॥ २७ ॥ रावणाच्या बाणांचे पृष्ठभाग सुवर्णानें मढविलेले होते; ते बाण धनुष्यापासून सुटले कीं, अत्युग्र विषवान् सर्प होऊन चोहोंकडून रामावर पडत. ॥ २८ ॥त्या सर्पमुखी बाणांच्या मुखांतून अग्नि बाहेर पडे; अशा बाणांच्या योगें, मुख्य व अवांतर मिळून एकंदर सर्व दिशा भरून गेल्या. ॥२९॥ नंतर रामानें, जिकडे तिकडे सर्प पसरले आहेत असें पाहून, त्या अस्त्राला भिवविणारें गरुडास्त्र युद्धांत

ततस्तु ससृजे घोरं राक्षसं चास्त्रमस्त्रवित् ॥ क्रोधेन महता ऽऽविष्टो रामस्योपरि रावणः ॥२७॥ रावणस्य धनुर्मुक्ताः सर्पा भूत्वा महाविषाः ॥ शराः कांचनपुंखाभा राघवं परितो ऽपतन् ॥२८॥ तैः शरैः सर्पवदनैर्वमद्भिरनलं मुखैः ॥ दिशश्च विदिशश्चैव व्याप्तास्तत्र तदा ऽभवन् ॥ २९ ॥ रामः सर्पांस्ततो दृष्ट्वा समंतात्परिपूरितान् ॥ सौपर्णमस्त्रं तद्धोरं पुरः प्रावर्तयद्रणे ॥ ३० ॥

ततः अस्त्रवित् महता (उ.) रामस्य उपरि (पू.) ससृजे. ॥ २७ ॥ (पू.) कांचनपुंखाभाः शराः महाविषाः सर्पाः भूत्वा (मू.). ॥ २८ ॥ तदा तत्र दिशः, विदिशः च एव (पू.) अनलं वमद्भिः शरैः (मू.). ॥२९॥ ततः (पू.) सर्पान् दृष्ट्वा, ॥ (मू.) अस्त्रं रणे पुरः प्रावर्तयत्. ॥ ३० ॥

१ अग्नीला. २ ओकणाऱ्या. ३ अवांतर दिशा. ४ झाल्या. ५ गरुडाच्या. ६ पाठविता झाला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रावणाच्या अग्रभागीं सोडिलें. ॥ ३० ॥ रामानें सोडिलेले बाण गरुडरूपी बनले. गरुड सर्पांचे मारक शत्रु. ह्मणून त्या गरुडरूपी बाणांनीं जिकडे तिकडे पसरलेल्या सर्पबाणांचे तुकडे उडविले. ॥ ३१ ॥ युद्धांत रामानें आपल्या अस्त्राचा प्रतीकार केला असें पाहून दशानन त्यावर भयंकर शरसमूहाची वृष्टि करीत सुटला. ॥ ३२ ॥ राम आपलें कार्य चलाखीनें, श्रम न होतां, करीत असे (त्यानें रावणाचे बाण सहज तोडिले). तेव्हां रावणानें पुन्हां शरसमूह सोडून रामाला त्रासविलें व एक भयंकर बाण मातलीला मारिला. ॥ ३३ ॥ रामाच्या रथाचा ध्वज सुवर्णाचा होता; रावणानें अत्यंत क्रोधाविष्ट होऊन तो ध्वज रथाच्या पाठीमागें

रामेण मुक्तास्ते बाणा भूत्वा गरुडरूपिणः ॥ चिच्छिदुः सर्पबाणांस्तान्समन्तात्सर्पशत्रवः ॥ ३१॥ अस्त्रे प्रतिहते युद्धे रामेण दशकन्धरः ॥ अभ्यवर्षत्ततो रामं घोराभिः शरवृष्टिभिः ॥ ३२ ॥ ततः पुनः शरानीकै[1] राममक्लिष्टकारिणम्[2] ॥ अर्दयित्वा[3] तु घोरेण मातलिं प्रत्यविध्यत[4] ॥ ३३ ॥ पातयित्वा रथोपस्थे[5] रथकेतुं[7] च काञ्चनम्[6] ॥ ऐन्द्रानश्वानभ्यहनद्रावणः क्रोधमूर्च्छितः ॥ ३४ ॥

( पू. ) सर्पशत्रवः भूत्वा, तान् ( मू. ) चिच्छिदुः. ॥ ३१ ॥ ततः रामेण युद्धे ( पू. ) [ सति ], दशकन्धरः ॥ (मू.) अभ्यवर्षत. ॥ ३२ ॥ ( पू. ) रामं ॥ अर्दयित्वा तु घोरेण [ बाणेन ] ( मू. ). ॥ ३३ ॥ क्रोधमूर्च्छितः रावणः ( पू. ) रथकेतुं च पातयित्वा ( मू. ). ॥ ३४ ॥

१ बाणसमूहांनीं. २ क्लेशावांचून काम करणाऱ्या. ३ जर्जर करून. ४ मारिता झाला. ५ रथाच्या पिछाडीस. ६ सुवर्णाच्या. ७ रथाच्या ध्वजाला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पाडिला (बाण मारून लव्हाळ्यासारखा लववेला) आणि इंद्राच्या घोड्यांना जर्जर केलें. ॥ ३४ ॥ रामचंद्राचें शरीर विव्हल झालें, असें पाहून देव, गंधर्व, चारण तसेच पितर ह्या सर्वांना खेद वाटला व महर्षि चिंतातुर झाले; ॥ ३५ ॥ विभीषणासह सकल वानरसेनापतींना तर अतिशय चिंता पडली. दहा तोंडें, वीस हात, हातांत धनुष्यें, असा ॥ ३६ ॥ तो रावण त्या रणांगणीं मैनाक पर्वतासारखा प्रचंड दिसूं लागला! रामाचे डोळे क्रोधानें लाल झाले. त्यानें भुंवया चढविल्या, ॥ ३७ ॥ आणि - स्वतांच्या पराक्रमाला - अनुरूप अशी ईर्षा धरिली. ह्या वेळीं, तो रावणाला जाळणार कीं काय, असा भास पडे! त्यानें, वर्षाऋतूंत आकाशामध्यें जें इंद्रधनुष्य दिसतें, तेवढें विस्तीर्ण असें अद्भुत धनुष्य उचलिलें, ॥ ३८॥

विषेदुर्देवगन्धर्वाश्चारणाः पितरस्तथा ॥ आर्ताकारं हरिं दृष्ट्वा व्यथिताश्च महर्षयः ॥ ३५ ॥ व्यथिता वानरेन्द्राश्च बभूवुः सविभीषणाः ॥ दशास्यो विंशतिभुजः प्रगृहीतशरासनः ॥ ३६ ॥ ददृशे रावणस्तत्र मैनाक इव पर्वतः ॥ रामस्तु भ्रुकुटिं बद्ध्वा क्रोधसंरक्तलोचनः ॥ ३७ ॥ कोपं चकार सदृशं निर्दहन्निव राक्षसम् ॥ धनुरादाय देवेन्द्रधनुराकारमद्भुतम् ॥ ३८ ॥

(पू.) पितरः हरिं (मू.) विषेदुः; महर्षयः च व्यथिताः. ॥ ३५ ॥ सविभीषणाः वानरेन्द्राः च (मू.) ॥ ३६ ॥ (पू.) इव ददृशे. ॥ (मू.) [सन] ॥३७॥ राक्षसं निर्दहन इव सदृशं (पू.), ॥ (मू.) धनुः आदाय, ॥ ३८ ॥

१ खिन्न झाले. २ खिन्न शरीर ज्याचें, असा. ३ इंद्रधनुष्याच्या आकाराचें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

प्रलयकालच्या अग्नीसारखा लखलखीत बाण हातीं घेतला, व अग्रभागीं उभा असलेल्या शत्रूवर अग्नीसारखी धगधगीत दृष्टि फेंकिली. ॥ ३९ ॥ त्याचें शरीर तेजामुळें प्रदीप्त दिसत होतें. त्या कालरूपी रामचंद्रानें सर्व लोकांच्या समक्ष आपला पराक्रम दाखविण्यास प्रारंभ केला :– ॥ ४० ॥ रामानें धनुष्य कर्णापर्यंत ओढिलें, रावणाला बाण मारिला, व वानरसेनेला आनंद दिला. ह्या वेळीं राममूर्ति कालमृत्यूप्रमाणें उग्र परंतु रमणीय दिसत होती. ॥ ४१ ॥ राम शत्रूवर धांवला त्यावेळीं त्याचें मुख इतकें कोपयुक्त दिसत होतें कीं, तें पाहून सर्व प्राण्यांना भीति वाटली व पृथ्वी थरथर कांपूं लागली. ॥ ४२ ॥

गृहीत्वा पाणिना बाणं कालानलसमप्रभम् ॥ निर्दहन्निव चक्षुर्भ्यां ददृशे रिपुमन्तिके ॥ ३९ ॥ पराक्रमं दर्शयितुं तेजसा प्रज्वलन्निव ॥ प्रचक्रमे कालरूपी सर्वलोकस्य पश्यतः ॥ ४० ॥ विकृष्य चापं रामस्तु रावणं प्रतिविध्य च ॥ हर्षयन्वानरानीकं कालान्तक इवाबभौ ॥ ४१ ॥ क्रुद्धं रामस्य वदनं दृष्ट्वा शत्रुं प्रधावतः ॥ तत्रसुः सर्वभूतानि चचाल च वसुन्धरा ॥ ४२ ॥

( पू. ) बाणं गृहीत्वा, ॥ चक्षुर्भ्यां ( मू. ) ददृशे. ॥ ३९ ॥ ( मू. ) [ रामः ] सर्वलोकस्य पश्यतः [ सतः रावणवधार्थं ] प्रचक्रमे. ॥ ४० ॥ रामः तु चापं ( पू. ) ॥ वानरानीकं ( मू. ). ॥ ४१ ॥ सर्वभूतानि शत्रुं प्रधावतः रामस्य ( मू. ) च चचाल. ॥ ४२ ॥

१ पृथ्वी. २ कांपली.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

राम रावणाचीं मस्तकें तोडितो

रामाचें महाभयंकर रूप दिसलें व जिकडे तिकडे अत्यंत दारुण उत्पात दिसूं लागले, तेव्हां सर्व भूतांना त्रास झाला व रावणाला भय पडलें. ॥ ४३ ॥ देवगण, सिद्ध, गंधर्व व किन्नर विमानांत बसून आकाशमार्गी आले होते ते, ॥ ४४ ॥ खालीं चाललेलें जगाच्या प्रलयासारखें हें अत्यंत तुमुल युद्ध पाहत, स्तब्ध उभे राहिले. रामानें इंद्रास्त्र घेऊन रावणाचें मस्तक तोडिलें. ॥ ४५ ॥ जशीं ताडाच्या झाडाचीं फळें भूमीवर पडतात, तशीं - रामानें तोडिलेलीं - रावणाचीं अनेक मस्तकें आकाशांतून बदाबद खालीं पडूं लागलीं. तीं रक्तानें

रामं दृष्ट्वा महारौद्रमुत्पातांश्च सुदारुणान् ॥ त्रस्तानि सर्वभूतानि रावणं चाविशद्भयम् ॥ ४३ ॥ विमानस्थाः सुरगणाः सिद्धगन्धर्वकिन्नराः ॥ ४४ ॥ ददृशुः सुमहायुद्धं लोकसंवर्तकोपमम् ॥ ऐन्द्रमस्त्रं समादाय रावणस्य शिरोऽच्छिनत् ॥ ४५ ॥ मूर्धानो रावणस्याथ बहवो रुधिरोक्षिताः ॥ गगनात्प्रपतन्ति स्म तालादिव फलानि हि ॥ ४६ ॥

सर्वभूतानि ( पू. ) उत्पातान् च दृष्ट्वा ( मू. ) अविशत्. ॥ ४३ ॥ ( मू. ) [ च ] ॥ ४४ ॥ ( पू. ) सुमहायुद्धं ददृशुः. ॥ [ रामः ] ( मू. ). ॥ ४५ ॥ ( पू. ) रावणस्य मूर्धानः ॥ ( मू. ) इव गगनात् प्रपतन्ति स्म. ॥ ४६ ॥

१ महाभयंकर. २ शिरलें. ३ लोकांच्या प्रलयासारखें. ४ रक्तानें भिजलेले.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

भिजलेलीं असत. ॥ ४६ ॥ हें युद्ध चाललें असतां दिवस वाटेना, रात्र दिसेना, संध्याकाळ भासेना व दिशाही दिसल्या नाहींत (अनेक दिवस पर्यंत एकसारखें युद्ध चाललें होतें)! - रामानें रावणाचीं मस्तकें अनेक वेळां तोडिलीं - तरी त्याच्या मूळ स्वरूपांत (दहा मस्तकांत) कांहीं कमीपणा दिसून आला नाहीं! ॥ ४७ ॥ तेव्हां रामाचें अंतःकरण आश्चर्यचकित होऊन गेलें. - तो आपल्याशींच ह्मणे : - 'मी रावणाचीं एकासारखीं[1] एक तेजःपुंज अशीं एकशें एक मस्तकें तोडिलीं, ॥४८॥ तरी अद्याप रावणाचें आयुष्य संपत नाहीं व तो थंड होत (मरत) नाहीं! - हें आहे तरी काय!' - तो कौसल्येच्या आनंदसमुद्राला भरती आणणारा चंद्र

न दिनं न च वै रात्रिर्न सन्ध्या न दिशो ऽपि वा ॥ प्रकाशन्ते न तद्रूपं दृश्यते तत्र संगरे ॥४७॥ ततो रामो बभूवाथ विस्मयाविष्टमानसः ॥ शतमेकोत्तरं छिन्नं शिरसां चैकवर्चसाम् ॥ ४८ ॥ नचैव रावणः शान्तो दृश्यते जीवितक्षयात् ॥ ततः सर्वास्त्रविद्वीरः कौसल्यानन्दवर्धनः ॥ ४९ ॥ अस्त्रैश्च बहुभिर्युक्तश्चिन्तयामास राघवः ॥ यैर्यैर्बाणैर्हता दैत्या महासत्त्वपराक्रमाः ॥ ५० ॥

तत्र सङ्गरे दिनं न [ प्रकाशते ], रात्रिः न [ प्रकाशते ], सन्ध्या न [प्रकाशते], ( पू. ) न ॥ ( मू.) न दृश्यते. ॥ ४७ ॥ ( पू. ) बभूव. ॥ अथ [ रामेण ] एकवर्चसां शिरसां एकोत्तरं ( मू. ). ॥४८॥ ( पू. ) शान्तः च न एव दृश्यते. ॥ ( मू. ) ॥ ४९ ॥ बहुभिः ( पू. ) चिन्तयामास – ॥ '( मू. ) दैत्याः हताः, ॥ ५० ॥

---

१ सारखें तेज ज्यांचें, अशा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

'ह्याच्या बेंबीं-तील अमृत सुकव.'

(राम) महापराक्रमी होता. त्याला सर्व अस्त्रें अवगत होतीं इतकेंच नव्हे, तर तीं सगळीं त्याच्या जवळ तयार होतीं. इतकें असूनही रामचंद्राला चिंता उत्पन्न झाली कीं, आजपर्यंत ज्या ज्या बाणांनीं मी महाबलाढ्य व पराक्रमी दैत्य मारिले, ॥ ४९ ॥ ५० ॥ ते ते बाण रावणाला मारण्याच्या कामीं निष्फल होऊन गेले ! - आतां करावें काय ? - अशा प्रकारें राम चिंताग्रस्त होऊन बसला होता. इतक्यांत जवळच उभा असलेला विभीषण ॥ ५१ ॥ रामाला सांगूं लागला :- " रघुवीरा ! ह्याला ब्रह्मदेवानें वर दिला आहे ! ' ह्याचे बाहु तुटले व शिरें तोडिलीं तरी, ॥ ५२ ॥ ते पुन्हां उगवावे व तीं पुन्हां उत्पन्न व्हावीं ' असें ब्रह्मदेवानें सांगून ठेविलें आहे. ह्याच्या नाभिस्थानीं कुंडलाच्या आकारासारखें अमृत ठेविलें आहे, ॥ ५३ ॥ रामा ! तें अग्न्यस्त्राच्या योगें सुकवून टाक. तसें केलेंस कीं हा मृत्यु पावेल. " रामचंद्र पराक्रमाचें कृत्य सत्वर पार

त एते निष्फलं याता रावणस्य निपातने ॥ इति चिन्ताकुले रामे समीपस्थो विभीषणः ॥ ५१ ॥ उवाच राघवं वाक्यं ब्रह्मदत्तवरो ह्यसौ ॥ विच्छिन्ना बाहवो ऽप्यस्य विच्छिन्नानि शिरांसि च ॥ ५२ ॥ उत्पत्स्यन्ति पुनः शीघ्रमित्याह भगवानजः ॥ नाभिदेशे ऽमृतं तस्य कुण्डलाकारसंस्थितम् ॥५३॥ तच्छोषयानलास्त्रेण तस्य मृत्युस्ततो भवेत्॥विभीषणवचः श्रुत्वा रामः शीघ्रपराक्रमः॥५४॥

( पू ) निष्फलं याताः ! '॥ रामे इति चिन्ताकुले [ सति ], ( मू. ) ॥ ५१ ॥ ( पू. ) उवाच - " असौ ब्रह्मदत्तवरः [ अस्ति ]. ॥ 'अस्य ( मू. ) ॥ ५२ ॥ पुनः शीघ्रं [1]उत्पत्स्यन्ति' (पू) आह. तस्य ( मू. ); ॥ ५३ ॥ तत् [2]अनलास्त्रेण शो[3]षय. ततः (पू.)." ॥ शीघ्रपराक्रमः रामः (मू.) ॥५४॥

१ उद्भवतील. २ अग्न्यस्त्रानें. ३ सुकव.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पाडीत असे. त्यानें विभीषणाचें वचन ऐकिल्याबरोबर ॥ ५४ ॥ अग्न्यस्त्राची योजना करून राक्षसाच्या नाभीचा भेद केला, नंतर त्याचीं मस्तकें तोडिलीं, व बाहुही तोडून टाकिले. ह्या वेळीं तो महापराक्रमी रघुवीर फारच खवळला होता. पुढें रावणानें एक भयंकर महाशक्ति उचलली व ॥ ५५ ॥ ५६ ॥ विभीषणाला मारण्यासाठीं त्याच्यावर सोडिली. विभीषणाबद्दल रावणाला फारच क्रोध आला होता. रामानें सुवर्णालंकृत तीक्ष्ण बाणांच्या योगें त्या शक्तीचे तुकडे केले. ॥ ५७ ॥ नऊ मस्तकें तुटलीं तेव्हां रावणाचें तेज उतरलें व रूप म्लान होऊन गेलें. तीं भयंकर शिरें छिन्न झालीं असतां तो विरूप दिसूं लागला. ॥५८॥

पावकास्त्रेण संयोज्य नाभिं विव्याध रक्षसः ॥ अनन्तरं च चिच्छेद शिरांसि च महाबलः ॥ ५५ ॥ बाहूनपि च संरब्धो रावणस्य रघूत्तमः ॥ ततो घोरां महाशक्तिमादाय दशकन्धरः ॥ ५६ ॥ विभीषणवधार्थाय चिक्षेप क्रोधविह्वलः ॥ चिच्छेद राघवो बाणैस्तां शितैर्हेमभूषितैः ॥ ५७ ॥ दशग्रीवशिरश्छेदात्तदा तेजो विनिर्गतम् ॥ म्लानरूपो बभूवाथ छिन्नैः शीर्षैर्भयंकरैः ॥ ५८ ॥

( ५५ पू. ) नाभिं विव्याध. ॥ ( ५५ उ. ५६ पू. ) रावणस्य शिरांसि, बाहून् अपि च चिच्छेद. ॥ ततः दशकन्धरः ( मू. ) ॥ ५५ ॥ ५६ ॥ क्रोधविव्हलः [सन्] (मू.) बाणैः तां चिच्छेद. ॥ ५७ ॥ तदा ( पू. ). ॥ अथ [ रावणः ] छिन्नैः भयंकरैः शीर्षैः ( मू. ) ॥ ५८ ॥

१ मस्तकांनीं.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आतां त्याचें एक मुख्य मस्तक व दोन बाहु अवशिष्ट राहिले. तरी पण तो - वीर रणभूमीवर - शोभतच होता. त्यानें पुन्हां क्रुद्ध होऊन अनेक प्रकारच्या शस्त्रास्त्रसमूहाची ॥ ५९ ॥ रामावर वृष्टि चालविली. रामही त्याच्यावर बाणांचा वर्षाव करूं लागला. त्या वेळीं मोठें भयंकर तुमुल युद्ध झालें. पाहणारांच्या आंगांवर रोमांच थरारले. ॥ ६० ॥ पुढें मातलीनें रामाला स्मरण करून दिलें कीं, रघुवीरा! ह्याच्या वधासाठीं लवकर ब्रह्मास्त्र सोड; ॥ ६१ ॥ देवांनीं ह्याचा नाश होण्याची ठरविलेली वेळ सध्यां चालली आहे; राघवा! तूं ह्याचें मस्तक तोडूं नकोस; ॥ ६२ ॥

एकेन मुख्यशिरसा बाहुभ्यां रावणो बभौ ॥ रावणस्तु पुनः क्रुद्धो नानाशस्त्रास्त्र-वृष्टिभिः ॥ ५९॥ ववर्ष रामं तं रामस्तथा बाणैर्ववर्ष च ॥ ततो युद्धमभूद्घोरं तुमुलं लो[1]महर्षणम् ॥ ६० ॥ अथ संस्मार[2]यामास मातली राघवं तदा ॥ विसृ[3]जास्त्रं वधायास्य ब्राह्मं शीघ्रं रघूत्तम ॥ ६१ ॥ विनाशकालः प्रथि[4]तो यः सुरैः सोऽद्य वर्तते ॥ उ[5]त्तमांगं न चैतस्य च्छेत्त[6]व्यं राघव त्वया ॥ ६२ ॥

रावणः ( पू. ) च बभौ. ॥ रावणः तु पुनः क्रुद्धः [ सन् ] ( मू. ) ॥ ५९ ॥ तं रामं ( मू. ) युद्धं अभूत्. ॥ ६० ॥ अथ तदा मातलिः राघवं ( पू. ) – ॥ ‘ रघूत्तम, अस्य ( मू. ) अस्त्रं, शीघ्रं विसृज’. ॥ ६१ ॥ राघव, सुरैः यः ( पू. ). ॥ त्वया एतस्य ( मू. ). ॥ ६२ ॥

---

१ रोमांच थरारविणारें. २ आठवून देता झाला. ३ सोड. ४ सांगितलेला. ५ मस्तकास. ६ तोडावें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

प्रभो ! मस्तकावर कितीही प्रहार केलेस तरी हा मरणार नाहीं, वक्षस्थलरूप मर्मप्रदेशीं मारशील तर मात्र मरेल. मातलीच्या ह्या भाषणानें रामाला स्मरण करून दिलें; तेव्हां ॥६३॥ त्यानें सर्पाप्रमाणें फौंफावणारा एक प्रदीप्त बाण हातीं घेतला; ह्या बाणाच्या पार्श्वभागीं वायूची स्थापना केली होती, फळावर ( शल्यावर ) सूर्य आणि अग्नि स्थापिले होते; ॥ ६४ ॥ शरीर आकाशमय ( आकाशासारखें विस्तीर्ण ) असून, त्याच्या ( बाणाच्या ) जडपणाला मेरु–मंदरपर्वतांची उपमा साजण्याजोगी होती, व पेरांवर महासमर्थ लोकपाल बसविले होते; ॥ ६५ ॥ त्याचें ( बाणाचें ) शरीर देदीप्यमान असून तेज सूर्यासारखें होतें. रामानें लोकां-

नैव शीर्ष्णि प्रभो वध्यो वध्य एव हि मर्मणि ॥ ततः संस्मारितो रामस्तेन वाक्येन मातलेः ॥ ६३ ॥ जग्राह स शरं दीप्तं निःश्वसन्तमिवोरगम् ॥ यस्य पार्श्वे तु पवनः फले भास्करपावकौ ॥६४॥शरीरमाकाशमयं गौरवे मेरुमन्दरौ ॥ पर्वस्वपि च विन्यस्ता लोकपाला महौजसः ॥ ६५ ॥ जाज्वल्यमानं वपुषा भातं भास्करवर्चसा ॥ तमुग्रमस्त्रं लोकानां भयनाशनमद्भुतम् ॥ ६६ ॥

प्रभो, [ अयं ] शीर्ष्णि ( पू. ) एव वध्यः. ' ॥( मू. ) वाक्येन रामः संस्मारितः. ॥६३॥ ( पू. ) इव निश्वसन्तं शरं जग्राह; ॥( मू. ) ॥ ६४ ॥ ( मू. ) लोकपालाः विन्यस्ताः. ॥ ६५ ॥ वपुषा ( पू. ) भातं ॥ ( मू. ) अस्त्रं [ जग्राह ]. ॥ ६६ ॥

---

१ मस्तकावर. २ मारण्यास योग्य. ३ काळजावर. ४ सों सों वाजणाऱ्या. ५ घेता झाला. ६ बाजूस. ७ वायु. ८ अग्रावर. ९ सूर्य व अग्नि. १० आकाशरूप ( विस्तीर्ण ). ११ जडपणांत. १२ पेरांवर. १३ महासमर्थ. १४स्थापिलेले. १५शोभत असलेल्या.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

निर्वाणीचा
बाण.

ची भीति दूर करणारें विलक्षण उग्र अस्त्र त्या प्रचंड बाणावर वेदोक्त विधीच्या योगें अभिमंत्रित करून तो बाण धनुष्यास जोडिला. रामाचे भुज पुष्ट व शक्तिसंपन्न होते. ॥ ६६ ॥ ६७ ॥ रामचंद्रानें तो उत्तम बाण धनुष्याला जोडिला, त्या वेळीं सर्व भूतें भयभीत झालीं व पृथ्वी कांपूं लागली. ॥ ६८ ॥ राम रावणावर अतिशय संतापला होता. त्यानें पूर्णपणें तयारी करून धनुष्याची दोरी कर्णापर्यंत ओढिली आणि तो मर्मभेदी बाण शत्रूवर सोडिला! ॥ ६९ ॥ त्या बाणाचें मुख काळाच्या जबड्यासारखें भयंकर होतें! वज्रपाणीच्या ( इंद्राच्या ) हातून सुटलेल्या वज्राप्रमाणें असह्य असा तो बाण रावणाच्या वक्षःस्थलावर

अभिमन्त्र्य ततो रामस्तं महेषुं[1] महाभुजः ॥ वेदप्रोक्तेन विधिना संदधे कार्मुके बली ॥ ६७ ॥ तस्मिन्संधीयमाने तु राघवेण शरोत्तमे ॥ सर्वभूतानि वित्रेसुश्च- चाल च वसुन्धरा ॥ ६८ ॥ स रावणाय संक्रुद्धो भृशमानम्य[6] कार्मुकम् ॥ चिक्षेप परमायत्तस्तमस्त्रं मर्मघातिनम् ॥ ६९ ॥ स वज्र इव दुधर्षो वज्रपाणिविसर्जि- तः ॥ कृतान्त इव घोरास्यो न्यपतद्रावणोरसि ॥ ७० ॥

ततः महाभुजः बली ( मू. ) अभिमन्त्र्य कार्मुके[2] सन्दधे[3]. ॥ ६७ ॥ राघवेण ( पू. ) सन्धीयमाने[4] [ सति ], ॥ ( मू. ) च चचाल. ॥ ६८ ॥ परमायत्तः[5] रावणाय संक्रुद्धः ( पू. ) आनम्य[7] ॥ ( मू. ) अस्त्रं चिक्षेप[8]. ॥ ६९ ॥ ( पू. ) वज्रः इव दुर्धर्षः ॥ ( मू. ) सः रावणोरसि न्यपतत्[10]. ॥ ७० ॥

---

१ महाबाणास. २ धनुष्यावर. ३ जोडिता झाला. ४ जोडिला जाणारा. ५ फार तत्पर. ६ अत्यंत. ७ लववून. ८ फेंकिता झाला. ९ भयंकर मुख ज्याचें, असा. १० पडला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पडला, ॥ ७० ॥ व त्यांत खोल शिरला. शरीराचा नाश करणाऱ्या त्या अतिभयंकर उत्तम बाणानें, रावण महासमर्थ होता तरी, त्याचें वक्षःस्थल तत्काल आरपार भेदून टाकिलें, ॥ ७१ ॥ व रावणाचे प्राण घेऊन पृथ्वीतलांत प्रवेश केला! रावणाचा वध केल्यावर तो बाण पुन्हां रामाच्या भात्यांत शिरून बसला. ॥७२॥ लागलेंच रावणाच्या हातांतील बाणासह प्रचंड धनुष्य खालीं पडलें; व तो राक्षसाधिपति बाणानें उत्पन्न केलेल्या भ्रमणवेगामुळें गतप्राण होऊन भूमीवर पडला! ॥ ७३ ॥ * * * * * * * * * युद्धांत पुष्कळच राक्षस मेले; पण त्यांतून जे उरले होते, ते रावण पडला असें पाहून भयभीत होत्साते

स निमग्नो[1] महाघोरः शरीरान्तकरः[2] परः ॥ बिभेद[3] हृदयं तूर्णं रावणस्य महात्मनः ॥ ७१ ॥ रावणस्याहरत्प्राणान्विवेश धरणीतले ॥ स शरो रावणं हत्वा रामतूणीरमाविशत् ॥ ७२ ॥ तस्य हस्तात्पपाताशु सशरं कार्मुकं महत् ॥ गतासुर्भ्रमिवेगेन राक्षसेन्द्रोऽपतद्भुवि ॥७३॥ तं दृष्ट्वा पतितं भूमौ हतशेषाश्च राक्षसाः ॥ हतनाथा भयत्रस्ता दुद्रुवुः सर्वतोदिशम् ॥ ७४ ॥

( पू. ) सः ॥ महात्मनः रावणस्य ( मू. ) बिभेद. ॥७१॥ सः शरः ( पू. ) अहरत्, धरणीतले विवेश, ॥( मू. ). ॥ ७२ ॥ ( पू. ) कार्मुकं तस्य हस्तात् आशु पपात. ॥ राक्षसेन्द्रः ( मू. ) गतासुः[4] [ सन् ] भुवि अपतत्. ॥७३॥ (पू.) तं भूमौ पतितं दृष्ट्वा ॥ (मू.) [सन्तः] सर्वतोदिशं दुद्रुवुः.॥७४॥

१ बुडालेला. २ शरीराचा नाश करणारा. ३ फोडिता झाला. ४ गतप्राण.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रावणवध.
आनंदीआनंद.

दश दिशांकडे पळत सुटले : धनी मेला कीं आश्रितांची दुर्दशा अशीच व्हावयाची. ॥७४॥ दशाननाचा वध झाला व रामचंद्राला जय मिळाला, तेव्हां विजयशाली वानर आनंदित होत्साते गर्जना करूं लागले — ॥७५॥ कोणी 'रामाचा जय झाला' असें ह्मणत; कित्येक 'रावण मृत्यु पावला' असें ह्मणून भुभुःकार करीत. नंतर, आकाशामध्यें गंभीर असा देवदुंदुभीचा ध्वनि निघूं लागला; ॥ ७६ ॥ रामचंद्रावर चोहोंकडून पुष्पवृष्टि झाली. मुनि, सिद्ध, चारण आणि देव स्तुति करूं लागले. ॥ ७७ ॥ अप्सरांनीं आनंदभरांत आकाशामार्गामध्यें जिकडेतिकडे नृत्य करण्यास प्रारंभ केला. रावणाच्या शरीरांतून सूर्यासारखा देदीप्यमान असा

दशग्रीवस्य निधनं विजयं राघवस्य च ॥ ततो विनेदुः संहृष्टा वानरा जितकाशिनः ॥ ७५ ॥ वदन्तो रामविजयं रावणस्य च तद्वधम् ॥ अथान्तरिक्षे व्यनदत्सौम्यस्त्रिदशदुन्दुभिः ॥ ७६ ॥ पपात पुष्पवृष्टिश्च समंताद्राघवोपरि ॥ तुष्टुवुर्मुनयः सिद्धाश्चारणाश्च दिवौकसः ॥ ७७ ॥ अथान्तरिक्षे ननृतुः सर्वतो ऽप्सरसो मुदा ॥ रावणस्य च देहोत्थं ज्योतिरादित्यवत्स्फुरत् ॥ ७८ ॥

ततः ( ७५ पू. ) विजयं च [दृष्ट्वा] ॥ ( ७५ उ. ) वानराः ॥ ( ७६ पू. ) च वदन्तः [ सन्तः ] ॥ विनेदुः. ॥ ( मू. ) [३]व्यनदत्. ॥ ७५ ॥ ७६ ॥ ( पू. ) पपात. ॥ ( मू. ) च तुष्टुवुः. ॥ ७७ ॥ (पू.) ननृतुः. ॥ ( मू. ) ज्योतिः ॥ ७८ ॥

१ आकाशांत. २ देवांचा नगारा. ३ वाजला. ४ चमकणारें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

एक तेजाचा लोळ निघून ॥ ७८ ॥ देवांच्या समक्ष रामरूपीं मिळाला. तत्क्षणीं देवांनीं उद्गार काढिले कीं, ‘ अहो रावणाचें भाग्य फार थोर ! एकंदरींत, तो महात्मा होता, ह्यांत संशय नाहीं ! ॥ ७९ ॥ आह्मी सत्वगुणमय देव; विष्णूची आह्मांवर कृपा आहे. परंतु आह्मांला देखील सुखदुःखादिकांनीं व्याप्त होऊन संसारांत भ्रमण करीत राहावें लागतें. ॥ ८० ॥ आणि हा रावण ह्मटला तर जातीचा राक्षस, क्रूर, ब्रह्महत्या करणारा, अत्यंत तामसी, परस्त्रियांशीं रत, विष्णूचा शत्रु, व तपस्व्यांना मारणारा ! ! ॥८१॥ आंगीं इतके दुर्गुण असूनही, हा सर्व प्राण्यांच्या समक्ष रामरूपींच प्रविष्ट झाला ! - धन्य आहे ह्याची ! ! -’ देवांचे हे उद्गार ऐकून नारदमुनींना हांसूं आलें. ते ह्मणाले :– ॥ ८२ ॥

प्रविवेश रघुश्रेष्ठं देवानां पश्यतां सताम् ॥ देवा ऊचुरहो भाग्यं रावणस्य महात्मनः ॥ ७९ ॥ वयं तु सात्विका देवा विष्णोः कारुण्यभाजनाः ॥ भयदुःखादिभिर्व्याप्ताः संसारे परिवर्तिनः ॥८०॥ अयं तु राक्षसः क्रूरो ब्रह्महा ऽतीवतामसः ॥ परदाररतो विष्णुद्वेषी तापसहिंसकः ॥ ८१ ॥ पश्यत्सु सर्वभूतेषु राममेव प्रविष्टवान् ॥ एवं ब्रुवत्सु देवेषु नारदः प्राह सुस्मितः ॥ ८२ ॥

(पू.), रघुश्रेष्ठं प्रविवेश. ॥ देवाः ऊचु :– ‘(मू.) रावणस्य भाग्यं! ॥७९॥ (मू.). ॥८०॥८१॥ [अयं] सर्वभूतेषु पश्यत्सु [ सत्सु ], ( पू. ) ! ’ ॥ देवेषु एवं ब्रुवत्सु [सत्सु], (मू.) [सन्] प्राह – ॥८२॥

१ दयेचें पात्र. २ दुसऱ्याच्या स्त्रीवर आसक्त. ३ बोलणारे.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

" देवहो! तुह्मी धर्माचें[1] तत्त्व पूर्णपणें जाणतां. सांप्रत घडलेल्या गोष्टीचें कारण मी तुह्मांला सांगतों : ऐका. रावणाचा रामाशीं वैरभाव पडला होता ह्मणून द्वेषामुळें तो, आपल्या सेवकांसह, रामाचें चरित्र ऐकून त्याचें सदासर्वकाळ चिंतन करीत असे. 'रामाच्या हातून आपल्याला मृत्यु यावयाचा,' हें कानीं आल्यापासून तर त्याला सतत जिकडे तिकडे ॥ ८३ ॥ ८४ ॥ रामच दिसत होता; स्वप्नांत देखील त्याला रामच दिसे. त्याच्या मनांत रामाविषयीं क्रोध होता, तरी तो( क्रोध )ही गुरूपदेशापेक्षां अधिक योग्यतेचा झाला. ॥ ८५ ॥ शेवटीं, रामाच्या हातून मृत्यु आला, तेव्हां त्याचीं समस्त पापें दूर झालीं, व बंधनें सुटलीं. ह्मणूनच त्याला रामरूपीं सायुज्यमुक्ति प्राप्त झाली. " ॥ ८६ ॥

शृणुतात्र सुरा यूयं धर्मतत्त्वविचक्षणाः॥रावणो राघवद्वेषादनिशं हृदि भावयन्॥८३॥ भृत्यैः सह सदा रामचरित्रं द्वेषसंयुतः ॥ श्रुत्वा रामात्स्वनिधनं भयात्सर्वत्र राघवम् ॥ ८४ ॥ पश्यन्ननुदिनं स्वप्ने राममेवानुपश्यति ॥ क्रोधो ऽपि रावणस्याशु गुरुबोधाधिको ऽभवत् ॥ ८५ ॥ रामेण निहतश्चान्ते निर्धूताशेषकल्मषः ॥ रामसायुज्यमेवाप रावणो मुक्तबन्धनः ॥ ८६ ॥

( ८३ पू. ), यूयं अत्र शृणुत.॥ द्वेषसंयुतः [ अपि ] रावणः राघवद्वेषात् ( ८४ पू. ) [ सन् ] ॥ ( ८३ उ. ) रामात् स्वनिधनं श्रुत्वा ( मू. ) ॥ ८३ ॥ ८४ ॥ ( पू. ). ॥ रावणस्य ( मू. ). ॥ ८५ ॥ ( मू. ) [ सन् ] रामसायुज्यं एव आप. ॥ ८६ ॥



---

१ धर्माचें तत्त्व जाणणारे.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

प्राणी जरी अत्यंत पापी, अतिदुष्ट मनाचा, किंवा परद्रव्यावर व परस्त्रीवर आसक्त असला, तरी जर तो स्नेहानें अथवा भीतीमुळें रघुकुलतिलकाचें नित्य चिंतन करीत असेल, तर त्याचें अंतःकरण शुद्ध होतें, त्याचे शेंकडों जन्मांत उद्भवलेले अनेक दोष दूर होतात, आणि त्याला मरणोत्तरक्षणीं रामरूपी विष्णूचें निवासस्थान वैकुंठ-नामक आदिपद प्राप्त होतें. मोठमोठे देव ह्या स्थानाची प्रशंसा करीत असतात. ॥८७॥ रावण त्रैलोक्याला त्रास देत असे. त्याचा वध केल्यावर, राम डाव्या हातानें धनुष्य भूमीवर टेंकून धरून दुसऱ्या हातांत घेतलेला एक

पापिष्ठो वा दुरात्मा परधनपरदारेषु सक्तो यदि स्यान्नित्यं स्नेहाद्भयाद्वा रघुकुलतिलकं भावयन्संपरेतः ॥ भूत्वा शुद्धान्तरंगो भवशतजनितानेकदोषैर्विमुक्तः सद्यो रामस्य विष्णोः सुरवरविनुतं याति वैकुण्ठमाद्यम् ॥ ८७ ॥ हत्वा युद्धे दशास्यं त्रिभुवनविषमं वामहस्तेन चापं ॥ भूमौ विष्टभ्य तिष्ठन्नितरकरधृतं भ्रामयन्बाणमेकम् ॥

( पू. ) स्यात्, ॥ [ तर्हि ] शुद्धान्तरङ्गः भूत्वा भवशतजनितानेकदोषैः विमुक्तः [सन्] ( मू. ) वैकुंठं याति. ॥ ८७ ॥ युद्धे त्रिभुवनविषमं दशास्यं हत्वा, चापं ( पू. ) बाणं भ्रामयन् ॥

१ शुद्ध मन ज्याचें, असा. २ शेंकडों जन्मांत उत्पन्न झालेल्या अनेक दोषांनीं. ३ त्रैलोक्याला दुःख देणाऱ्या. ४ रावणाला. ५ धनुष्यास. ६ दाबून धरून. ७ उभा राहणारा. ८ दुसऱ्या हातांत धरिलेल्या. ९ फिरविणारा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

बाण गरगर फिरवीत उभा होता. त्याचे नेत्र किंचित् रक्तवर्ण असून शरीर बाणांनीं विदीर्ण झालें होतें. त्याची अंगकांति कोटिसूर्यांप्रमाणें तेजःपुंज दिसत होती. त्याचें योग्य प्रमाणानें (*) निम्नोन्नत असलेलें शरीर वीरश्रीनें वेढिलें होतें. देव त्याची स्तुति करीत होते. असा तो वीर राम माझें रक्षण करो."॥८८॥इति एकादशः सर्गः॥ ११॥

विभीषण, हनुमान्, अंगद, लक्ष्मण, वानरराजा ( सुग्रीव ), जांबवान् आणि तसेच दुसरे वीर ह्या मंडळीकडे पाहून रामचंद्राच्या ॥ १ ॥ अंतःकरणाला संतोष वाटला. त्यानें त्या सर्वांनाच उद्देशून पुढील भाषण केलें :– 'वीरहो ! तुमच्या बाहुबलाच्या आधारावर मी रावणाचा वध केला. ॥२॥ जगांत, जोंपर्यंत चंद्र सूर्य आहेत, तोंपर्यंत तुमची पवित्र कीर्ति राहील. लोक तुमचें चरित्र वर्णन करितील; व त्या कथा त्रैलो-

आरक्तोपान्तनेत्रः शरदलितवपुः सूर्यकोटिप्रकाशो ॥ वीरश्रीबंधुरांगस्त्रिदशपतिनुतः पातु मां वीररामः ॥ ८८ ॥ इति युद्धकाण्डे रावणवधो नाम एकादशः सर्गः ॥ ११ ॥ रामो विभीषणं दृष्ट्वा हनूमन्तं तथांगदम् ॥ लक्ष्मणं कपिराजं च जाम्बवन्तं तथाऽपरान् ॥१॥ परितुष्टेन मनसा सर्वानेवाब्रवीद्वचः ॥ भवतां बाहुवीर्येण निहतो रावणो मया ॥२॥ कीर्तिः स्थास्यति वः पुण्या यावच्चन्द्रदिवाकरौ ॥

( मू. ) मां पातु. ' ॥ ८८ ॥ इति युद्धकाण्डे एकादशः सर्गः ॥ ११ ॥ ( मू. ) च दृष्ट्वा, ॥ १ ॥ ( पू. ) अब्रवीद् – ॥' मया रावणः ( मू. ). ॥ २ ॥ पुण्या वः ( ३ पू. ) [ तावत् ] स्थास्यति. ॥

१ तांबूस प्रांतभाग नेत्रांचे ज्याच्या, असा. २ बाणांनीं विदारित आहे शरीर ज्याचें, असा. ३ कोटि सूर्यांप्रमाणें तेजःपुंज. ४ ज्याच्या यथायोग्य प्रमाणानें ( * ) उंचसखल असलेल्या शरीरावर वीरश्री दिसते, असा. ५ देवेंद्रानें स्तविलेला. ६ रक्षण करो.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

क्याला पवित्र करूं शकतील. ॥३॥ तुमच्या कीर्तीचें वर्णन - करणारे लोक - कलिदोषांपासून मुक्त होत्सातें अत्युत्तम गतीस जातील (मोक्ष पावतील). ' - रामाचें असें भाषण चाललें होतें; इतक्यांत, - मंदोदरीप्रभृति रावणाच्या सर्व आश्रित स्त्रिया शोक करीत तेथें आल्या व, रावण भूमीवर पडला आहे असें पाहून, त्याच्या अग्रभागीं विलाप करूं लागल्या. ॥ ४ ॥ ५ ॥ विभीषणालाही फार दुःख झालें. तो विह्वल होऊन शोक करूं लागला. त्यानें रावणाच्या पुढें लोळण घेतली व अनेक प्रकारें विलाप चालविला. ॥ ६ ॥ - तें पाहून - रामानें लक्ष्मणाला सांगितलें:- 'बा ! - योग्य पुरुषाला उचित - मान देणें हा तुझा स्वभावधर्मच

कीर्तयिष्यन्ति भवतां कथां त्रैलोक्यपावनीम् ॥ ३ ॥ ययोपेतां कलिहरां यास्यन्ति परमां गतिम् ॥ एतस्मिन्नन्तरे दृष्ट्वा रावणं पतितं भुवि ॥ ४ ॥ मन्दोदरीमुखाः सर्वाः स्त्रियो रावणपालिताः ॥ पतिता रावणस्याग्रे शोचन्त्यः पर्यदेवयन् ॥ ५ ॥ विभीषणः शुशोचार्तः शोकेन महता वृतः ॥ पतितो रावणस्याग्रे बहुधा पर्यदेवयत् ॥ ६ ॥ रामस्तु लक्ष्मणं प्राह बोधयस्व विभीषणम् ॥

[ ये ] यया उपेतां कलिहरां[1] त्रैलोक्यपावनीं ( ३ मू. ) कीर्तयिष्यन्ति, [ ते ] ( ४ पू. ) यास्यन्ति. ' ॥ ( मू. ) पतितं दृष्ट्वा, ॥ ३ ॥ ४ ॥ रावणस्य अग्रे पतिताः रावणपालिताः ( मू. ) [सत्यः] पर्यदेवयन्[2]. ॥ ५ ॥ ( पू. ) शोकेन आवृतः [ सन् ] शुशोच, ॥ रावणस्य अग्रे ( मू. ). ॥ ६ ॥ ( पू. ) – ' मानद[3], विभीषणं बोधयस्व. ॥

---

१ कलीचे दोष दूर करणारी. २ विलाप करूं लागल्या. ३ मान देणाऱ्या.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आहे. विभीषणाला चार गोष्टी सांग. त्याच्या हातून भावाचें उत्तरकार्य झालें पाहिजे. विलंब काय उपयोगी! ॥ ७ ॥ मंदोदरी आदिकरून रावणाच्या प्रिय स्त्रिया भूमीवर लोळण घेऊन विलाप करीत आहेत. विभीषणाला ह्मणावें, त्या सर्व राक्षसींचें निवारण (सांत्वन) कर.' ॥ ८ ॥ रामानें असें सांगितलें असतां, लक्ष्मण विभीषणाजवळ गेला, व त्याला उपदेशाच्या गोष्टी सांगूं लागला. विभीषण रावणाच्या शवापाशीं प्रेततुल्य होऊन पडला होता. ॥ ९ ॥ तो शोकामुळें अतिशय विव्हल झाला आहे, - असें पाहून - लक्ष्मणानें त्याला सांगितलें :- ' विभीषणा! तूं दुःखी होऊन ज्याच्याबद्दल शोक करीत आहेस, तो तुझा कोण बरें? ॥१०॥ तसाच तूं तरी त्याचा कोण? सृष्टीच्या पूर्वी, सांप्रत, किंवा पुढेंही त्याचा तुझा संबंध कोणता होता, आहे,

करोतु भ्रातृसंस्कारं किं विलम्बेन मानद ॥ ७ ॥ स्त्रियो मन्दोदरीमुख्याः पतिता विलपन्ति च ॥ निवारयतु ताः सर्वा राक्षसी रावणप्रियाः ॥ ८ ॥ एवमुक्तो ऽथ रामेण लक्ष्मणो ऽगाद्विभीषणम् ॥ उवाच मृतकोपान्ते[1] पतितं मृतकोपमम्[2] ॥९॥ शोकेन महता ऽऽविष्टं सौमित्रिरिदमब्रवीत् ॥ यं शोचसि त्वं दुःखेन को ऽयं तव विभीषण ॥ १० ॥ त्वं वा ऽस्य कतमः सृष्टेः पुरेदानीमतः परम् ॥

भ्रातृसंस्कारं ( मू. ) किं? ॥ ७ ॥ मन्दोदरीमुख्याः ( मू. ) निवारयतु. ' ॥ ८ ॥ रामेण ( मू. ) विभीषणं अगात्[3], उवाच. ॥ ९ ॥ सौमित्रिः महता ( पू. ) [ तं ] इदं अब्रवीत् - ' विभीषण, त्वं दुःखेन ( मू. ) कः? ॥ १० ॥ ( पू. ) [ वा ] त्वं वा अस्य कतमः? ॥

१ प्रेताजवळ. २ प्रेततुल्य. ३ गेला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

अथवा असेल ? ( विचाराअंतीं तुला असें कळून येईल कीं, आत्मा नित्यशुद्धमुक्तस्वरूपी आहे, त्याचा कोणाशीं संबंध नाहीं ). ज्याप्रमाणें उदकाच्या प्रवाहांत पडलेली वाळू त्या ओघाच्या अधीन होऊन त्याच्या गतीप्रमाणें वाहत जात असते, ॥ ११ ॥ कांहीं वेळ तिचे कण एकत्र मिळतात व कांहीं वेळानें पुन्हां वियुक्त होतात, त्याप्रमाणेंच कालगतीनें ह्या प्राण्यांचे एकमेकाशीं समागम व वियोग घडतात. - दुसरें उदाहरण पहा :- धान्य भाजायाच्या भट्टीवरील भांड्यांत धान्य ( जव, सातू ) टाकलें व खालीं आंच लावली ह्मणजे - त्यांतील दाणे कांहीं वेळ एके ठिकाणीं असतात व कांहीं वेळानें उडून वर खालीं होतात : ॥ १२ ॥ तसेंच प्राणी, कालरूपी ईश्वराच्या मायेकडून प्रेरणा मिळाली असतां, प्राण्यांशीं ऐक्य व वियोग पावत असतात. तूं, हे आह्मी, व दुसरेही लोक असे सर्वजण सारखेच आहों; सगळ्यांना कालगतीस्तव जन्म घ्यावे लागले आहेत. ॥ १३ ॥ जन्म आणि मृत्यु ज्या वेळीं ज्यापासून व्हावयाचे असतील, त्या वेळीं त्यापासून व्हावयाचेच. ईश्वराला

यद्वत्तोयौघपतिताः सिकता यान्ति तद्वशाः ॥ ११ ॥ संयुज्यन्ते वियुज्यन्ते तथा कालेन देहिनः ॥ यथा धानासु वै धाना भवन्ति न भवन्ति च ॥ १२ ॥ एवं भूतेषु भूतानि प्रेरितानीशमायया ॥ त्वं चेमे वयमन्ये च तुल्याः कालवशोद्भवाः ॥ १३ ॥ जन्ममृत्यू यदा यस्मात्तदा तस्माद्भविष्यतः ॥

( मू. ) सिकताः यान्ति, ॥ ११ ॥ तथा देहिनः कालेन ( मू. ), ॥ १२ ॥ ( पू. ) प्रेरितानि. ॥ ( मू. ). ॥ १३ ॥ [ भगवता ] ( १४ पू. ) [ कल्पितौ, ] तदा तस्मात् भविष्यतः. ॥

१ पाण्याच्या प्रवाहांत पडलेल्या. २ वाळू. ३ एकत्र जमतात. ४ वियोग पावतात. ५ भाजलेल्या जवांमध्यें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

जन्म नाहीं; त्यानें प्रथम स्वतां प्राणी उत्पन्न केले; पुढें तो त्या प्राण्यांकडून स्त्रीपुरुषसंयोगद्वारा नवी सृष्टि करितो; संहार करणारा तरी तोच. ॥ १४ ॥ जसें लहान मूल खेळांत पहिल्यानें स्वतांच मातीचीं दोन बाहुलीं तयार करितें, तो स्त्रीपुरुषांचा जोडा आहे असें ठरवितें, आणि नंतर तिसरें एक बाहुलें रचून, तें पहिल्या जोडप्याचें मूल, असें ह्मणतें; ह्या क्रीडेपासून त्याला कांहीं मिळविण्याची इच्छा असते, असें नाहीं : त्याचप्रमाणें ईश्वर निरिच्छपणें सृष्टिप्रलयरूप लीला करीत असतो. देहाच्या संबंधामुळें जीव देहवान् झाले आहेत ( जीव कांहीं देहरूपी नव्हत ). जसें बीजापासून बीज उद्भवतें, तसा देहापासून दुसरा देह उत्पन्न होतो. जीव देहाहून वेगळ्यासारखा ( वेगळाच ) व नित्य आहे. देही ( जीव) आणि देह हा विभाग[1] मुळीं प्रथम अविवेकामुळें[2] कल्पिलेला (मिथ्या) आहे ( अंतःकरणानें देहाविषयीं अहंता–ममता धरिली ह्मणून देहाचा संबंध जडला; तो संबंध वास्तविक नाहीं. देहाला देखील जर ‘ माझा ’ म्हणणें वास्तविक नाहीं,

ईश्वरः सर्वभूतानि भूतैः सृजति हन्त्यजः ॥१४॥ आत्मसृष्टैरस्वतन्त्रैरनपेक्षो ऽपि बालवत् ॥ देहेन देहिनो जीवा देहाद्देहो ऽभिजायते ॥ १५ ॥ बीजादेव यथा बीजं देहान्य इव शाश्वतः ॥ देहिदेहविभागो ऽयमविवेककृतः पुरा ॥ १६ ॥

अनपेक्षः अपि अजः ईश्वरः बालवत् ( १९ पू. ) भूतैः ( १४ उ. ) [ च]. ॥ जीवाः देहेन देहिनः [ भवन्ति ]. यथा बीजात् एव बीजं, [ तथा ] ( १९ उ. १६ पू. ) इव. ॥ अयं ( पू. ) अ-विवेककृतः. ॥ १४ ॥ १५ ॥ १६ ॥

१ प्राणी आणि शरीर हा भेद. २ अविचारानें केलेला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तर भावांना तसे ह्मणतां येईल कोठून ? ) ॥१५॥१६॥ जसे काष्ठावरील लांबी, जाडी हे धर्म अग्नीवर दिसतात, त्याप्रमाणें मिथ्याभूत देहावरील नानात्व, जन्म, नाश, ऱ्हास, वृद्धि, कर्मांचीं सुखदुःखरूप फळें, हे धर्म त्या देहाच्या द्रष्ट्यावर ( जीवावर ) भासतात. ॥ १७ ॥ देहाच्या व अंतःकरणाच्या समागमामुळें जीवाला अहंता–ममतारूपी अवास्तव ग्रह उत्पन्न होतो; ह्मणून देहाचे नानात्वादि धर्म जीवावर दिसून येतात. - माळीण ह्मणून एक बारीक भ्रमराची एक जात आहे; ती एखादा किडा धरून आपल्या घरांत नेऊन ठेविते, व जातां येतां त्याला टोंचीत असते : त्या बिचाऱ्या किड्याच्या मनांत भीतीमुळें एकसारखी माळीण घोळत राहते; शेवटीं त्या ध्यासामुळें त्याला माळणीचें रूप प्राप्त होतें ! त्याप्रमाणें - सत्य, मिथ्या किंवा ह्याहून कांहीं वेगळ्या ज्या ह्मणून वस्तूंचें जीव सतत ध्यान करितो, त्या त्या वस्तूचे सत्यत्व मिथ्यात्व वगैरे धर्म त्याच्यावर दिसून येतात. ॥ १८ ॥ गाढ झोंप लागते त्यावेळीं अहंकार नसतो ह्मणून

नानात्वं जन्म नाशश्च क्षयो वृद्धिः क्रियाफलम् ॥ द्रष्टुराभान्त्यतद्धर्मा यथा ऽग्नेर्दारुविक्रियाः ॥ १७ ॥ त इमे देहसंयोगादात्मनो भान्त्यसद्ग्रहात् ॥ यथा यथा तथा चान्यद्ध्यायतो ऽसत्सदाग्रहात् ॥ १८॥ प्रसुप्तस्यानहंभावात्तदा भाति न संसृतिः ॥ जीवतो ऽपि यथा तद्वद्विमुक्तस्यानहंकृतेः ॥ १९ ॥

( पू. ) च [ एते ] ॥ ( मू. ), [ तथा ] द्रष्टुः आभान्ति. ॥ १७ ॥ ( पू. ) आत्मनः भान्ति. ॥ यथा असत्, सत् [ वा ] अन्यत् आग्रहात् ध्यायतः तथा यथा [भवति]. ॥१८॥ (पू.) न भाति, ॥ तद्वत् ( मू. ) मुक्तस्य [ संसृतिः न भाति ]. ॥ १९ ॥

---

१ काष्ठांचे विकार. २ पाहणाराला. ३ भासतात. ४ भलत्या ग्रहामुळें. ५ प्रसिद्धि.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

जीवाला संसारपसारा भासत नाहीं. त्याप्रमाणें जीवंतपणींही जो प्राणी अहंकार सोडून राहतो, तो मुक्तच असतो, त्याला संसार भोगावा लागत नाहीं. ॥१९॥ ह्मणून, विभीषणा! अहंता व ममता हा भ्रम मूळचा मायेचा धर्म असून मनावर आला असतो, त्याचा त्याग कर, व सर्वशक्तिमान्, षड्गुणैश्वर्यसंपन्न, परमात्मा जो रामचंद्र त्याच्यावर मन ठेव. ॥ २० ॥ राम सर्व भूतांचा अंतर्यामी होय. त्या परिपूर्णरूपी ईश्वरानें मायेच्या योगें मनुष्यरूप धरिलें आहे. तूं आपल्या मनाला बाह्यविषयांच्या संबंधापासून हळूहळू सोडव, ॥ २१ ॥ त्या विषयांत दोष भरले आहेत अशी दृष्टि ठेव, व मन आनंदरूपी रामचंद्रावर लाव. भाऊ, पिता, माता, मित्र, प्रिय हे सर्व, देहाकडे लक्ष्य दिलें तर, आहेत. ॥ २२ ॥ आत्मा देहाहून वेगळा आहे, असें आत्मज्ञान झालें कीं मग बंधु कोण, भाऊ कोणाचा, अथवा आई बाप व मित्र तरी कोठले? ॥ २३ ॥

तस्मान्मायामनोधर्मं जह्यहंममताभ्रमम् ॥ रामभद्रे भगवति मनो धेह्यात्मनीश्वरे ॥२०॥ सर्वभूतात्मनि परे मायामानुषरूपिणि ॥ बाह्येन्द्रियार्थसंबन्धात्त्याजयित्वा मनः शनैः ॥ २१ ॥ तत्र दोषान्दर्शयित्वा रामानन्दे नियोजय ॥ देहबुद्ध्या भवेद्भ्राता पिता माता सुहृत्प्रियः ॥ २२ ॥ विलक्षणं यदा देहाज्जानात्यात्मानमात्मना ॥ तदा कः कस्य वा बन्धुर्भ्राता माता पिता सुहृत् ॥ २३ ॥

( २० पू. ) जहि. ॥ ( २० उ. २१ पू. ) रामभद्रे मनः धेहि. ॥ ( मू. ) त्याजयित्वा, ॥२०॥२१॥ ( मू. ) [ च ] भवेत्; ॥ २२ ॥ यदा आत्मना आत्मानं देहात् ( मू. ) वा? ॥ २३ ॥

१ मायेचा परिणामरूपी मनाचा धर्म, अज्ञा. २ ठेव. ३ बाह्य इंद्रियांच्या विषयांच्या संबंधापासून. ४ सोडवून. ५ जोड.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

स्त्री, घर इत्यादि पदार्थ, शब्दादि विषय व अनेक प्रकारच्या संपत्ति हा सर्व पसारा मिथ्याज्ञानामुळें उद्भवलेला आहे. ॥ २४ ॥ सैन्य, द्रव्यभांडार, सेवकसमूह, राज्य, भूमि, पुत्र इत्यादि सगळ्या वस्तु अज्ञानापासून उत्पन्न झाल्या. - अज्ञानकार्याचा असा स्वभावच आहे कीं, नेहमीं रूपांतर पावत असावयाचें :- अर्थात त्या सर्व वस्तु क्षणमात्र समागम झाल्याबरोबर नाश पावतात, हें सिद्ध होय. ॥ २५ ॥ ह्मणून, बा! आतां ऊठ. हृदयांत रामाचें ध्यान करीत जा. तो प्रभु भक्तीच्या योगें आकळिला जातो. प्रारब्ध कर्म भोगूनच क्षीण केलें पाहिजे, एवढ्यासाठीं, बिभीषणा! तूं राज्यादिकाचा उपभोग घे आणि नित्य प्रजांचें पालन करण्यांत दक्ष राहा. ॥ २६ ॥ मागें काय झालें, पुढें कसें होणार, सध्यां काय चालू आहे,

मिथ्याज्ञानवशाज्जाता[1] दारागारादय[2]ः सदा ॥ शब्दादयश्च विषया विविधाश्चैव सम्पदः ॥ २४ ॥ बलं कोशो[3] भृत्यवर्गो[4] राज्यं भूमिः सुतादयः ॥ अज्ञानजत्वात्सर्वे ते क्षणसंगमभंगुराः ॥ २५ ॥ अथोत्तिष्ठ हृदा रामं भावयन् भक्तिभावितम् ॥ अनुवर्तस्व राज्यादि भुंजन्[7]प्रारब्धमन्वहम् ॥ २६ ॥ भूतं भविष्यदभंजन्वर्तमानमथाचरन् ॥ विहरस्व[12] यथान्यायं भवदोषैर्न लिप्यसे ॥ २७ ॥

मिथ्याज्ञानवशात् सदा (मू.), ॥ २४ ॥ ( पू. ) [च] ॥ सर्वे ते ( मू. ). ॥२५॥ (पू.) अन्वहं[5] प्रारब्धं[6] (मू.) [सन्] भक्तिभावितं [तं] अनुवर्तस्व. ॥ २६ ॥ अथ (पू.) [सन्]॥ यथान्यायं (मू.) ? ॥ २७ ॥

१ मिथ्याज्ञानाच्या अनुरोधानें. २ स्त्री गृह इत्यादि. ३ भांडार. ४ सेवकसमूह. ५ प्रतिदिनीं. ६ प्रारंभिलेलें. ७ भोगणारा. ८ सेवा कर. ९ पुढें होणारें. १० न विचार करणारा. ११ न आचरणारा. १२ खुशाल राहा. १३ सांसारिक दोषांनीं.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ह्याबद्दल विचार अगदीं करूं नको; तर आसक्त न होतां नीतिशास्त्राला अनुसरून व्यवहार चालव. म्हणजे तुला सांसारिक दोष लागणार नाहींत. ॥ २७ ॥ रामाची तुला आज्ञा आहे कीं, भावाचें जें कांहीं उत्तर कृत्य करणें योग्य असेल, तें यथाशास्त्र कर; स्त्रिया विलाप करीत आहेत, त्यांच्या ॥ २८ ॥ समजुती घाल, व त्यांना लवकर लंकेंत जाऊं दे. तूं मोठा सुज्ञ आहेस; - कशी काय व्यवस्था करावयाची, तें तुला सांगायला नको. - ' विभीषणानें लक्ष्मणाचें भाषण समग्र ऐकून घेतलें. ॥ २९ ॥ त्याला धर्माचें सम्यक् ज्ञान होतें. लक्ष्मणाच्या भाषणांत धर्म व अर्थ दोन्ही पुरुषार्थांची व्यवस्था सुंदर रीतीनें प्रतिपादिली होती. हें भाषण ऐकून अंमळ विचार केल्याबरोबर - विभीषणाची समजूत पटली व - त्याचा शोक आणि मोह दूर झाला. लागलाच तो रामाजवळ आला. ॥ ३० ॥

आज्ञापयति रामस्त्वां यद्भ्रातुः सांपरायिकम्[1] ॥ तत्कुरुष्व यथाशास्त्रं रुदतीश्चापि[2] योषितः[3] ॥ २८ ॥ निर्वारय[4] महाबुद्धे लंकां गच्छन्तु मा चिरम् ॥ श्रुत्वा यथावद्वचनं लक्ष्मणस्य विभीषणः ॥ २९ ॥ त्यक्त्वा शोकं च मोहं च रामपार्श्वमुपागमत् ॥ विमृश्य बुद्ध्या धर्मज्ञो धर्मार्थसहितं वचः ॥ ३० ॥

रामः त्वां ( पू. ), ॥ तत् यथाशास्त्रं ( मू. ) च अपि ॥ २८॥ ( २९ पू. ), [ ताः ] मा चिरं लङ्कां गच्छन्तु. ' ॥ धर्मज्ञः विभीषणः लक्ष्मणस्य ( २९ मू. ), शोकं, मोहं च ( पू. ) विमृश्य, रामपार्श्वं उपागमत्. ॥ २९ ॥ ३० ॥

१ उत्तरकार्य. २ रडणाऱ्या. ३ स्त्रियांना. ४ निवारण कर.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रामाचीच सेवा करावयाची व तो सांगेल तसें वागायाचें असा विभीषणाचा दृढ निश्चय होता; त्यानें रामाला झटलें :- ' प्रभो ! रावण तर घातकी, असत्य बोलणारा, व क्रूर होता; ज्यानें धर्माचरण व नियम सोडून देऊन ॥ ३१ ॥ परस्त्रीला दूषित करण्याचा यत्न केला त्या पुरुषाचें उत्तर कार्य करावें, हें कांहीं मला योग्य दिसत नाहीं ! ' हें भाषण ऐकिल्यावर - विभीषणाचा सरळ भाव पाहून - रामाच्या मनाला संतोष वाटला. त्यानें विभीषणाला झटलें :- ॥ ३२ ॥ ' विभीषणा ! वैर धरावयाचें कोठपर्यंत ? मरणापर्यंत. आतां आपला कार्यभाग आटोपला. तूं ह्याचे संस्कार कर. हा ( रावण ) जसा तुला तसाच मलाही आहे ( जिवंतपणीं दोघांचाही शत्रु होता : आतां तें कांहीं राहिलें नाहीं ). ॥ ३३ ॥ रामाची आज्ञा शिरसा मान्य

रामस्यैवानुवृत्त्यर्थमुत्तरं पर्यभाषत ॥ नृशंसमनृतं क्रूरं त्यक्तधर्मव्रतं प्रभो ॥ ३१ ॥
नार्हो ऽस्मि देव संस्कर्तुं परदाराभिमर्शिनम् ॥ श्रुत्वा तद्वचनं प्रीतो रामो वचनमब्रवीत् ॥ ३२ ॥ मरणान्तानि वैराणि निर्वृत्तं नः प्रयोजनम् ॥ क्रियतामस्य संस्कारो ममाप्येष यथा तव ॥ ३३ ॥ रामाज्ञां शिरसा धृत्वा शीघ्रमेव विभीषणः ॥
सांत्ववाक्यैर्महाबुद्धिं राज्ञीं मन्दोदरीं तदा ॥ ३४ ॥

( ३१ पू. ) - ॥ ' देव, प्रभो, (३१ उ. ३२ पू.) [रावणं] संस्कर्तुं अर्हः न अस्मि. ' ॥ तत् वचनं ( मू. ) - ॥ ३१ ॥ ३२ ॥ ' वैराणि ( पू. ) निर्वृत्तं. ॥ अस्य संस्कारः ( मू.) [तथा] मम अपि.' ॥ ३३ ॥ तदा विभीषणः ( मू. ) ॥ ३४ ॥

१ सेवेसाठीं. २ घातकी. ३ परस्त्रीला दूषित करणारा, अशा. ४ संस्कार करण्यास. ५ योग्य. ६ संपलें. ७ सांत्वन करण्याच्या भाषणांनीं.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

करून बिभीषण लागलाच मंदोदरीजवळ गेला. ती राणी मोठी विचारी होती. बिभीषणानें सांत्वनाच्या गोष्टी सांगून ॥ ३४ ॥ तिचें समाधान केलें. बिभीषण धर्मात्मा होता. त्याच्या बुद्धीची नित्य धर्माकडे प्रवृत्ति असे; व त्याला धर्माचें पूर्ण ज्ञान होतें. त्यानें भावाचें उत्तर कार्य करण्यासाठीं आपल्या बंधुजनांना त्वरा केली. ॥३५॥ बिभीषणानें रावणाचें शव चितेवर चढविलें व पितृमेधाच्या (?) विधीस अनुसरून शास्त्रोक्त पद्धतीनें, अग्निहोत्र्याचें और्ध्वदेहिक जसें करतात ॥३६॥ त्याप्रमाणें, बंधुजन व मंत्रिमंडळ ह्यासहवर्तमान, त्याचें उत्तर कार्य केलें. बिभीषणानें त्याला यथाविधि अग्नि दिला, ॥ ३७ ॥ स्नान करून ओलेत्यानें दर्भयुक्त तिलोदक

सान्त्वयामास धर्मात्मा धर्मबुद्धिर्विभीषणः ॥ त्वरयामास धर्मज्ञः संस्कारार्थं स्वबान्धवान् ॥ ३५ ॥ चित्यां[1] निवेश्य[2] विधिवत्पितृमेध[3]विधानतः ॥ आहिताग्नेर्[4]यथा कार्यं रावणस्य विभीषणः ॥ ३६ ॥ तथैव सर्वमकरोद्बन्धुभिः सह मन्त्रिभिः ॥ ददौ च पावकं तस्य विधियुक्तं विभीषणः ॥ ३७ ॥ स्नात्वा चैवार्द्र[5]वस्त्रेण तिलान्दर्भाभिमिश्रितान् ॥ उदकेन च संमिश्रान्प्रदाय[6] विधिपूर्वकम् ॥ ३८ ॥

( पू. ) धर्मज्ञः विभीषणः ॥( मू. ) त्वरयामास. ॥३५॥ विभीषणः ( पू. ) निवेश्य, ॥ यथा ( मू. ) ॥ ३६ ॥ ( पू. ) च सह अकरोत्. ॥विभीषणः ( मू. ) पावकं ददौ. ॥ ३७॥ स्नात्वा, आर्द्रवस्त्रेण ( मू. ) तिलान् विधिपूर्वकं प्रदाय, ॥ ३८ ॥

१ चितेवर. २ ठेवून. ३ पितृमेधाच्या (?) विधानानें. ४ ठेविला आहे ज्यानें, त्याचें ( अग्निहोत्र्याचें ). ५ ओलेत्यानें. ६ देऊन.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

विधिपूर्वक अर्पण केलें, ॥ ३८ ॥ त्याला जलांजलि दिली आणि शिरसा प्रणाम केला. पुढें त्यानें पुन्हां पुन्हां सांत्वनपर गोष्टी सांगून स्त्रियांचा शोक दूर केला ॥ ३९ ॥ व त्यांना परत जावयास सांगितलें. त्या वेळीं सर्व स्त्रिया नगरांत शिरल्या. सगळ्या राक्षसी लंकेंत गेल्या असतां, बिभीषण ॥ ४० ॥ रामाजवळ येऊन नम्रपणें उभा राहिला. ज्याप्रमाणें पूर्वी वृत्रासुर मारिल्यावर इंद्राला हर्ष झाला, त्याप्रमाणें सांप्रत शत्रूंचा वध झाला असतां राम, त्याचें सैन्य, सुग्रीव व लक्ष्मण ह्या सर्वांना आनंद वाटला.

प्रदाय चोदकं तस्मै मूर्ध्ना चैनं प्रणम्य च ॥ ताः स्त्रियो ऽनुनयामास सान्त्वमुक्त्वा पुनः पुनः ॥ ३९ ॥ गम्यतामिति ताः सर्वा विविशुर्नगरं तदा ॥ प्रविष्टासु च सर्वासु राक्षसीषु विभीषणः ॥ ४० ॥ रामपार्श्वमुपागत्य तदा ऽतिष्ठद्विनीतवत् ॥ रामो ऽपि सह सैन्येन ससुग्रीवः सलक्ष्मणः ॥ ४१ ॥ हर्षं लेभे रिपून्हत्वा यथा वृत्रं शतक्रतुः ॥ मातलिश्च तदा रामं परिक्रम्याभिवन्द्य च ॥ ४२ ॥

उदकं तस्मै ( मू. ) उक्त्वा अनुनयामास. ॥ ३९ ॥ तदा [ विभीषणेन ] 'गम्यतां' इति [उक्ताः] ( पू. ) विविशुः. ॥ विभीषणः ( मू. ) प्रविष्टासु [ सतीषु ], ॥ ४० ॥ ( पू. ) अतिष्ठत्. ॥ ( मू. ) रामः अपि सैन्येन सह ॥ ४१ ॥ ( पू. ) वृत्रं, [ तथा ] रिपून् हत्वा, हर्षं लेभे. ॥ ( मू. ) ॥४२॥

---

१ सांत्वन करिता झाला. २ जावें. ३ शिरल्या. ४ नम्रासारखा. ५ राहिला. ६ इंद्र. ७ शत्रूंना. ८ मारून. ९ पावला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

त्या वेळीं मातलिही रामाला प्रदक्षिणा घालून व नमस्कार करून, ॥ ४१ ॥ ४२ ॥ त्यानें अनुमोदन दिलें असतां, आकाशमार्गें स्वर्गास गेला. नंतर राम आनंदित अंतःकरणानें लक्ष्मणाला ह्मणाला :– ॥ ४३ ॥ ' लक्ष्मणा ! मी विभीषणाला लंकेचें राज्य पूर्वींच दिलें आहे; पण तूं आतांही जाऊन लंकेंत विभीषणाला ॥ ४४ ॥ ब्राह्मणांकडून विधिपूर्वक मंत्र ह्मणवून अभिषेक करव. ' रामानें अशी आज्ञा दिली असतां लक्ष्मण वानरांना बरोबर घेऊन लागलाच निघाला, ॥ ४५ ॥ तो लंकेंत पोंचला. तेथें त्यानें सुवर्णाच्या कलशांत समुद्रोदक भरून आणून त्याच्यायोगें, बुद्धिमान् राक्षसेंद्राला ( विभीषणाला ) मोठ्या समारंभानें अभि-

अनुज्ञातश्च रामेण ययौ स्वर्गं विहायसा ॥ ततो हृष्टमना रामो लक्ष्मणं चेदमब्रवीत् ॥ ४३ ॥ विभीषणाय मे लंकाराज्यं दत्तं पुरैव हि ॥ इदानीमपि गत्वा त्वं लंकामध्ये विभीषणम् ॥ ४४ ॥ अभिषेचय विप्रैश्च मन्त्रवद्विधिपूर्वकम् ॥ इत्युक्तो लक्ष्मणस्तूर्णं जगाम सह वानरैः ॥ ४५ ॥ लंकां सुवर्णकलशैः समुद्रजलसंयुतैः ॥ अभिषेकं शुभं चक्रे राक्षसेन्द्रस्य धीमतः ॥ ४६ ॥

रामेण अनुज्ञातः [ सन् ] ( पू. ) ययौ. ॥ ( मू. ) – ॥ ४३ ॥ ' मे पुरा एव ( पू. ). ॥ त्वं (मू.) गत्वा विभीषणं ॥ ४४ ॥ ( ४५ पू. ) अभिषेचय. ' ॥ ( ४५ मू. ) सह लङ्कां जगाम, ( ४६ पू. ) सुवर्णकलशैः धीमतः राक्षसेन्द्रस्य शुभं ( मू. ). ॥ ४५ ॥ ४६ ॥

१ अनुमोदन दिलेला. २ आकाशमार्गानें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

षेक केला. ॥४६॥ पुढें लक्ष्मणासह विभीषण उपायनें पुढें करून रामाकडे येण्यास निघाला. त्याच्या बरोबर नागरिक जनही, भेटीसाठीं अनेक प्रकारच्या वस्तु हातीं घेऊन, निघाले. ॥४७॥ - सर्व मंडळी रामाजवळ येऊन पोंचली. - राम स्वतांचा कार्यभाग अनायासें पार पाडीत असे; विभीषणानें त्याच्यापुढें लोटांगण घातलें. विभीषणाच्या शरीरावर राजचिन्हें दृष्टीस पडलीं, तेव्हां रामाला आनंद झाला, ॥४८॥ व तो स्वतांला कृतकृत्य लेखूं लागला. लक्ष्मणालाही तशीच धन्यता वाटली. नंतर राम सुग्रीवाला आलिंगन देऊन ह्मणाला :– ॥ ४९ ॥ 'वीरा ! पुण्यपुरुषा ! महाप्रतापी रावणाचा पराभव व विभीषणाला लंकेंत राज्याभिषेक, हीं दोन्ही कार्यें माझ्या हातून पार पडलीं ह्याचें कारण, केवळ मला तुझें साह्य मिळालें, हें होय. ॥ ५० ॥

ततः पौरजनैः सार्धं नानोपायनपाणिभिः ॥ विभीषणः ससौमित्रिरुपायनपुरस्कृतः ॥ ४७ ॥ दण्डप्रणाममकरोद्रामस्याक्लिष्टकर्मणः ॥ रामो विभीषणं दृष्ट्वा प्राप्तराज्यं मुदा ऽन्वितः ॥४८॥ कृतकृत्यमिवात्मानममन्यत सहानुजः ॥ सुग्रीवं च समालिंग्य रामो वाक्यमथाब्रवीत् ॥ ४९ ॥ सहायेन त्वया वीर जितो मे रावणो महान् ॥ विभीषणो ऽपि लंकायामभिषिक्तो मया ऽनघ ॥ ५० ॥

ततः ( उ. ) विभीषणः ॥ ( पू. ) पौरजनैः सार्धं ॥ ४७ ॥ अक्लिष्टकर्मणः रामस्य ( मू. ) दृष्ट्वा मुदा अन्वितः [ बभूव ]. ॥ ४८ ॥ सहानुजः रामः आत्मानं ( पू. ). ॥ अथ ( मू. ) – ॥ ४९ ॥ 'वीर, मे ( पू. ) रावणः जितः. ॥ अनघ, मया ( मू. ).' ॥ ५० ॥

१ अनेक प्रकारचीं उपायनें ( भेटी ) हातांत ज्यांच्या, अशा. २ नागरिक जनांशीं. ३ सह. ४ दंडवत् वंदन. ५ मानिता झाला

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ह्या वेळीं, मारुति जवळच बाजूला नम्रपणें उभा होता. राम त्याच्याकडे वळून ह्मणाला :- 'हनुमंता! बिभीषणाची आज्ञा घेऊन ( कारण, तो आतां लंकेचा राजा झाला. ) तूं लवकर रावणाच्या मंदिरांत जा, ॥ ५१ ॥ रावणाचा वध झाला इत्यादि सर्व वृत्तांत जानकीला कळव, व जानकी जें कांहीं प्रत्युत्तर देईल तें तत्काल इकडे येऊन मला निवेदन कर.' ॥ ५२ ॥ रामानें अशी आज्ञा दिली असतां, महाबुद्धिमान् मारुति लंकानगरींत शिरला. आतां राक्षस त्याचा सत्कार करूं लागले! - यथा राजा तथा प्रजाः!! - ॥ ५३ ॥ रावणाच्या मंदिरांत शिरल्यावर, तेथें शिसव्याच्या मुळापाशीं बसलेली साध्वी जानकी त्याच्या दृष्टीस पडली. तिचें शरीर कृश व दीन दिसत होतें. ॥ ५४ ॥

ततः प्राह हनूमन्तं पार्श्वस्थं[1] विनयान्वितम् ॥ विभीषणस्यानुमते[2] गच्छ त्वं रावणालयम्[3] ॥ ५१ ॥ जानक्यै सर्वमाख्याहि रावणस्य वधादिकम् ॥ जानक्याः प्रतिवाक्यं मे शीघ्रमेव निवेदय ॥ ५२ ॥ एवमाज्ञापितो धीमान्रामेण पवनात्मजः ॥ प्रविवेश पुरीं लंकां पूज्यमानो निशाचरैः ॥ ५३ ॥ प्रविश्य रावणगृहं शिंशपामूलमाश्रिताम् ॥ ददर्श जानकीं तत्र कृशां दीनामनिन्दिताम् ॥५४॥

( पू. ) हनूमन्तं प्राह – ॥ 'त्वं (मू.) गच्छ. ॥५१॥ ( पू. ) आख्याहि[4]. ॥ मे प्रतिवाक्यं[5] ( मू. ).' ॥ ५२ ॥ रामेण ( पू. ) ॥ निशाचरैः[6] पूज्यमानः[7] [ सन् ] लङ्कां पुरीं प्रविवेश. ॥ ५३ ॥ रावणगृहं प्रविश्य तत्र ( मू. ) जानकीं ददर्श. ॥ ५४ ॥

---

१ बाजूला उभा असलेल्या. २ मताला अनुसरून. ३ रावणाच्या मंदिरांत. ४ सांग. ५ प्रत्युत्तर. ६ राक्षसांनीं. ७ पूजिलेला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तिच्या भोंवतीं राक्षसींचा वेढा असून, ती रामाचेंच ध्यान करीत होती. मारुतीनें तिला लवून नमस्कार केला. ॥ ५५ ॥ पुढें, तो वानरेश्वर नम्रपणें भक्तिपुरःसर हात जोडून तिच्या अग्रभागीं उभा राहिला. त्याला पाहून जानकी क्षणमात्र स्तब्ध बसली, इतक्यांत तिला पूर्वीचें स्मरण झालें. ॥ ५६ ॥ हा रामाचा दूत ( मारुति ) आहे, अशी ओळख पटल्यावर तर आनंदामुळें तिचें मुख प्रसन्न झालें. तिचें सुंदर व गंभीर मुख पाहून, मारुतीनें तिला रामाचा सर्व निरोप सांगण्यास प्रारंभ केला'– ॥ ५७ ॥ ' देवि ! सुग्रीव, साह्यकर्ता बिभीषण, वानरसैन्यें आणि लक्ष्मण ह्यांसहवर्तमान राम खुशाल आहे. त्यानें ॥ ५८ ॥

राक्षसीभिः परि¹वृतां ध्यायन्तीं राममेव हि ॥ विनयावनतो भूत्वा प्रणम्य पवना- त्मजः ॥ ५५ ॥ कृताञ्जलिपुटो भूत्वा प्र²ह्वो भक्त्या ऽग्रतः स्थितः ॥ तं दृष्ट्वा जानकी तूष्णीं स्थित्वा पूर्वस्मृतिं ययौ ॥ ५६ ॥ ज्ञात्वा तं रामदूतं सा हर्षात्सौ- ³म्यमुखी भवत् ॥ स तां सौम्यमुखीं दृष्ट्वा तस्यै पवननन्दनः ॥ रामस्य भाषितं सर्वमाख्यातुमुपच⁵क्रमे ॥ ५७ ॥ देवि रामः ससुग्रीवो विभीषणसहायवान् ॥ कुशली वानराणां च सैन्यैश्च सह लक्ष्मणः ॥ ५८ ॥

पवनात्मजः ( पू. ) ध्यायन्तीं [जानकीं] ( मू. ), ॥ ५५ ॥ ( पू ) [सन्] भक्त्या अग्रतः स्थितः. ॥ जानकी ( मू. ). ॥ ५६ ॥ सा तं रामदूतं ( पू. ). ॥ सः ⁴पवननन्दनः ( द्वि. ) सर्वं ॥ ( मू. ) – ॥ ५७ ॥ ' ( पू. ) रामः, ( मू. ) लक्ष्मणः च कुशली [ वर्तते ]. ॥ ५८ ॥

---

१ वेष्टिलेल्या. २ नम्र. ३ प्रसन्न व शांत मुख जिचें, अशी. ४ मारुति. ५ प्रारंभ करिता झाला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

'दुसरी देणगी नलगे.'

पुत्र, सैन्य व मंत्रिमंडळ ह्यांसह रावणाचा वध केला, राज्यावर विभीषणाची स्थापना केली, व कुशलवर्तमान कळविण्यासाठीं, तुजकडे मला पाठविलें आहे.' ॥५९॥ पतीचा प्रेमळ निरोप ऐकून सीतेला अतिशय आनंद झाला. तिनें सद्गदित वाणीनें मारुतीला ह्मटलें :– 'बा! ह्या वेळीं तुझ्या संतोषासाठीं मीं काय करावें बरें? -तुला कांहीं देणगी द्यावी ह्मटलें तर - त्रैलोक्यामध्यें ॥ ६० ॥ जीं अनेक रत्नें व भूषणें आहेत, त्यांपैकीं एक देखील ह्या प्रिय वचनाची बरोबरी करण्यासारखें नाहीं ( कोणतेंही रत्न किंवा भूषण दिलें तरी, तूं मला हा निरोप सांगून जो आनंद दिलास, त्याची फेड होणार नाहीं ), जानकीनें असें सांगितलें असतां वानरानें प्रत्युत्तर दिलें :– ॥ ६१॥ 'देवि! विविध रत्नांच्या समूहापेक्षां, फार तर काय, देवांच्या राज्याहूनही मला

रावणं ससुतं हत्वा सबलं सह मन्त्रिभिः ॥ त्वामाह कुशलं रामो राज्ये कृत्वा विभीषणम् ॥५९॥ श्रुत्वा भर्तुः प्रियं वाक्यं हर्षगद्गदया गिरा ॥ किं ते प्रियं करोम्यद्य न पश्यामि जगत्त्रये ॥ ६० ॥ समं ते प्रियवाक्यस्य रत्नान्याभरणानि च ॥ एवमुक्तस्तु वैदेह्या प्रत्युवाच प्लवंगमः ॥ ६१ ॥ रत्नौघाद्[1] विविधाद्वा ऽपि देवराज्याद्विशिष्यते[2] ॥ हतशत्रुं[3] विजयिनं रामं पश्यामि सुस्थिरम् ॥ ६२ ॥

रामः ( पू. ) रावणं मन्त्रिभिः सह हत्वा, विभीषणं ( मू. ) [ च ] त्वां कुशलं आह.' ॥ ५९ ॥ [ जानकी ] भर्तुः प्रियं वाक्यं ( ६० पू. ) [ आह – ] ॥ 'अद्य ते ( ६० उ. ६१ पू. ) समं न पश्यामि.' ॥ वैदेह्या ( मू. ) प्रत्युवाच – ॥ ६० ॥ ६१ ॥ '[ रामः ] ( मू ) पश्यामि.' ॥ ६२ ॥

१ रत्नसमूहाहून. २ अधिक आहे. ३ मारिला शत्रु ज्यानें, अशा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रामदर्शनाची योग्यता अधिक वाटते. तो प्रभु सांप्रत शत्रूला मारून व जय मिळवून पूर्णपणें स्थिर झाला आहे. मी त्याचें दर्शन घेईन ( ह्यांतच मला सर्व देणग्या पोंचल्या ). ' ॥ ६२ ॥ मारुतीचें तें भाषण ऐकिल्यावर जानकी त्याला ह्मणाली :– ' हनुमंता ! तुझें दर्शन मला चंद्रासारखें शीतल व सुखकर वाटतें. जगांत जे ह्मणून सुखदायक गुण आहेत ते सगळे तुझ्या ठिकाणींच पूर्णपणें वसत असतात. ॥ ६३ ॥ आतां मला, रामाचें दर्शन घ्यावें, अशी इच्छा आहे; रामानें मला लवकर - भेटायास येण्याची - आज्ञा द्यावी ( तूं रामाकडे जाऊन मला तिकडे नेण्याची व्यवस्था करव ).' मारुति ' बरें आहे ' ह्मणून व तिला वंदन करून रघुवीराच्या दर्शनासाठीं निघाला. ॥ ६४ ॥ त्यानें जानकीचें सर्व भाषण रामाच्या अग्रभागीं निवेदन केलें आणि ह्मटलें :– ' रामा ! जिच्यासाठीं आपण एवढा खटाटोप आरंभिला, व जी युद्धादि कर्माचें फल होय, ॥ ६५ ॥ त्या देवी जानकीला तूं एकदां अवलोकन करावेंस. ती शोकामुळें फार संतप्त होऊन गेली

तस्य तद्वचनं श्रुत्वा मैथिली प्राह मारुतिम् ॥ सर्वे सौम्यगुणाः सौम्य त्वय्येव परिनिष्ठिताः ॥ ६३ ॥ रामं द्रक्ष्यामि शीघ्रं मामाज्ञापयतु राघवः ॥ तथेति तां नमस्कृत्य ययौ द्रष्टुं रघूत्तमम् ॥ ६४ ॥ जानक्या भाषितं सर्वं रामस्याग्रे न्यवेदयत् ॥ यन्निमित्तो ऽयमारम्भः कर्मणां च फलोदयः ॥ ६५ ॥ तां देवीं शोकसंतप्तां द्रष्टुमर्हसि मैथिलीम् ॥

मैथिली ( पू. ) प्राह – ॥ ' सौम्य, ( मू. ). ॥६३॥ शीघ्रं ( पू. ) मां आज्ञापयतु.' ॥ [ माहतिः ] ' तथा ' इति [उक्त्वा], (मू.) द्रष्टुं ययौ ॥६४॥ ( पू. ) – ॥ '(मू.) च ॥६५॥ (पू.) द्रष्टुं अर्हसि.'

१ जानकी. २ सर्वथा राहिलेले. ३ पाहीन. ४ अनुमोदन देवो. ५ कळविता झाला. ६ फलप्राप्ति.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

'सीतेला घेऊन या.'

आहे.' हनुमंतानें ज्ञानवान् पुरुषांत श्रेष्ठ अशा रामचंद्राची मार्गे सांगितल्याप्रमाणें प्रार्थना केली ॥ ६६ ॥ तऱ्हां रामानें आपल्या मनांत, मायावी सीतेचा त्याग करावा आणि अग्नींत ठेविलेली जानकी काढून घ्यावी, असा निश्चय ठरवून विभीषणाला सांगितलें :– ॥६७॥ 'राजा ! जा. जानकीला लवकर मजजवळ घेऊन ये. तिला स्नान घालव, निर्मल वस्त्रें नेसूं दे व सर्व अलंकार लेवव.' ॥ ६८ ॥ विभीषणही ती आज्ञा ऐकून मारुतीसह तिकडे गेला. त्यानें वृद्ध वृद्ध राक्षसींकडून जानकीला मंगलस्नान घालविलें, ॥६९॥ सर्व अलंकार लेवविले व उत्तम पालखींत बसविलें. पुष्कळ वेत्रधर पुरुष त्या सुंदरीचें रक्षण करीत होते. त्यांच्या आंगांत

एवमुक्तो हनुमता रामो ज्ञानवतां वरः ॥ ६६ ॥ मायासीतां परित्यक्तुं जानकीमनले स्थिताम् ॥ आदातुं मनसा ध्यात्वा रामः प्राह विभीषणम् ॥६७॥ गच्छ राजन् जनकजामानयाशु ममान्तिकम् ॥ स्नातां विरजवस्त्राढ्यां सर्वाभरणभूषिताम् ॥ ६८ ॥ विभीषणोऽपि तच्छ्रुत्वा जगाम सहमारुतिः ॥ राक्षसीभिः सुवृद्धाभिः स्नापयित्वा तु मैथिलीम् ॥६९॥ सर्वाभरणसंपन्नामारोप्य शिबिकोत्तमे ॥

( मू. ) रामः एवं उक्तः. ॥ ६६ ॥ रामः ( पू. ) जानकीं ( मू. ) प्राह – ॥ ६७ ॥ 'राजन, गच्छ, ( उ. ) ( पू. ) आनय.' ॥ ६८ ॥ सहमारुतिः ( पू. ), ॥ सुवृद्धाभिः ( मू. ) स्नापयित्वा, ॥ ६९ ॥ ( पू ) आरोप्य ॥

१ मायेनें रचिलेल्या सीतेस. २ सोडण्यासाठीं. ३ अग्नींत. ४ स्वीकारण्यास. ५ आण. ६ निर्मळ वस्त्रांनीं युक्त. ७ नाहूं घालून ८ उत्तम पालखींत. ९ बसवून.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

कंचुक व डोक्यांवर पागोटीं होतीं. - अशा थाटानें सीता रामाकडे यावयास निघाली. - ॥७०॥ सगळे वानर जानकीला पहावयास पुढें पुढें येऊं लागले. वेत्रधर पुरुष चोहोंकडून त्यांना अटकाव करीत. ॥७१॥ - 'पैस ! दूर व्हा !' असें - ओरडून सांगत सर्वजण रामाच्या जवळ येऊन पोंचले. ती ( सीता ) पालखींत बसली आहे असें पाहून दुरूनच रामचंद्र ह्मणाला :- ॥ ७२ ॥ 'विभीषणा ! ते काठीवाले लोक वानरांना प्रतिबंध काय ह्मणून करितात ? सर्व वानरांनीं सीतेनें मातप्रमाणें दर्शन द्यावें ( त्यांना सीतेचें दर्शन घेण्यास मोकळीक द्या ). ॥ ७३ ॥ सीतेनें पायीं चालत मजजवळ यावें ( पालखींत कशाला बसलें पाहिजे ? )'

याष्टीकैर्[1]बहुभिर्गुप्तां कञ्चुकोष्णीषिभिः[2] शुभाम् ॥ ७० ॥ तां द्रष्टुमागताः सर्वे वानरा जनकात्मजाम् ॥ तान्वारयन्तो[4] बहवः सर्वतो वेत्रपाणयः[5] ॥ ७१ ॥ कोलाहलं[6] प्रकुर्वन्तो रामपार्श्वमुपाययुः ॥ दृष्ट्वा तां शिबिकारूढां[7] दूरादथ रघूत्तमः ॥ ७२ ॥ विभीषण किमर्थं ते वानरान्वारयन्ति हि ॥ पश्यन्तु वानराः सर्वे मैथिलीं मातरं यथा ॥ ७३ ॥ पादचारेण[8] सा ऽऽयातु जानकी मम सन्निधिम् ॥

( मू. ) गुप्तां[3] शुभां [ तां अनयत् ]. ॥ ७० ॥ सर्वे वानराः ( पू. ) द्रष्टुं आगताः. सर्वतः ॥ ( मू. ) ॥ ७१ ॥ ( पू. ) ॥ अथ रघूत्तमः ( मू. ) दृष्ट्वा [ उवाच - ] ॥ ७२ ॥ '( पू. ) किमर्थं वारयन्ति ? ॥ सर्वे ( मू. ) मातरं, [ तथा ] पश्यन्तु. ॥ ७३ ॥ सा जानकी ( पू. ) आयात्.' ॥

---

१ काठीवाल्यांनीं ( भालदारांनीं ). २ ज्यांच्या आंगांत कंचुक ( पायघोळ आंगरखे ) व मस्तकावर पागोटीं आहेत, अशा. ३ रक्षिलेल्या. ४ एकीकडे सारणारे. ५ वेताच्या काठ्या हातांत ज्यांच्या, असे. ६ गडबड. ७ पालखींत बसलेल्या. ८ पायीं चालत.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

हें रामाचें वचन कानीं पडल्याबरोबर सीता पालखींतून खालीं उतरली व ॥ ७४ ॥ पायीं चालत हळूहळू रामाजवळ आली. रामाला ठाऊक होतें कीं, ही सीता - खरी नव्हे तर - कांहीं कार्यासाठीं मायेनें नवीच एक निर्मिलेली आहे. तरी पण ती दृष्टीस पडली तेव्हां ॥ ७५ ॥ राम तिला - ' तूं परपुरुषाच्या घरीं राहिलीस, तुला धिक्कार असो ! ' इत्यादि - अनेक दुर्भाषणें बोलला. रामानें उच्चारिलेले शब्द सीतेला सहन झाले नाहींत. ती ॥ ७६ ॥ लक्ष्मणाला ह्मणाली :- ' भावोजी ! लवकर अग्नि पेटवा ! रामचंद्राचा विश्वास बसावा व लोकांनाही खरें वाटावें, व एवढ्यासाठीं - मला कांहीं दिव्य केलें पाहिजे. ' - ॥ ७७ ॥ रामाच्याही मनांत ती गोष्ट करवावी असें आहे, हें लक्ष्मणानें ओळखिलें व लागलीच एक काष्ठांची मोठी

श्रुत्वा तद्रामवचनं शिबिकादवरुह्य सा ॥ ७४ ॥ पादचारेण शनकैरागता राम-सन्निधिम् ॥ रामो ऽपि दृष्ट्वा तां मायासीतां कार्यार्थनिर्मिताम् ॥ ७५ ॥ अवा-च्यवादान्बहुशः प्राह तां रघुनन्दनः ॥ अमृष्यमाणा सा सीता वचनं राघवोदि-तम् ॥७६॥ लक्ष्मणं प्राह मे शीघ्रं प्रज्वालय हुताशनम् ॥ विश्वासार्थं हि राम-स्य लोकानां प्रत्ययाय च ॥ ७७ ॥ राघवस्य मतं ज्ञात्वा लक्ष्मणो ऽपि तदैव हि ॥

सा तत् रामवचनं ( मू. ), ॥ ७४ ॥ ( पू. ) आगता. ॥ ( मू. ) तां दृष्ट्वा [ चुकोप ]. ॥ ७५ ॥ रघुनन्दनः तां बहुशः ( पू. ). ॥ राघवोदितं वचनं ( मू. ) ॥ ७६ ॥ लक्ष्मणं प्राह – ' मे, रामस्य ( मू. ) हुताशनं शीघ्रं प्रज्वालय. ' ॥ ७७ ॥ अरिन्दमः लक्ष्मणः अपि ( पू. ) ॥

१ हळुहळू. २ न उच्चारण्याजोगीं दुर्भाषणें. ३ रामानें उच्चारिलेलें. ४ सहन नाहीं झालें जिला, अशी. ५ विश्वासासाठीं. ६ अग्नीला.



' दिव्य केलें पाहिजे. '



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रास रचून अग्नि पेटवून दिला. इतकें कार्य केल्यावर तो शत्रूंना दमविणारा वीर ( लक्ष्मण ) रामाच्या बाजूस जाऊन स्वस्थ उभा राहिला. ॥ ७८ ॥ सगळे लोक व देवांच्या आणि राक्षसांच्या स्त्रिया हा चमत्कार पाहण्यासाठीं तेथें आल्या होत्या. पुढें, सीतेनें भक्तिपुरःसर रामचंद्राला प्रदक्षिणा घातली, ॥७९ ॥ देवतांना आणि ब्राह्मणांना नमस्कार केले, व अग्नीच्या जवळ जाऊन आणि हात जोडून प्रतिज्ञा केली :– ॥ ८० ॥ ‘ ज्याअर्थीं माझें अंतःकरण कधींही रामचंद्रापासून वेगळें झालें नाहीं, त्याअर्थीं सर्व लोकांचीं कृत्यें प्रत्यक्ष अवलोकन करणारा भगवान् अग्नि माझें सर्वथा रक्षण करील ( शीतल होईल ).’ ॥ ८१ ॥

महाकाष्ठचयं कृत्वा ज्वालयित्वा हुताशनम् ॥ रामपार्श्वमुपागम्य तस्थौ तूष्णीमरिन्दमः ॥ ७८ ॥ ततः सीता परिक्रम्य राघवं भक्तिसंयुता ॥ पश्यतां सर्वलोकानां देवराक्षसयोषिताम् ॥ ७९ ॥ प्रणम्य देवताभ्यश्च ब्राह्मणेभ्यश्च मैथिली ॥ बद्धाञ्जलिपुटा चेदमुवाचाग्निसमीपगा ॥ ८० ॥ यथा मे हृदयं नित्यं नापसर्पति राघवात् ॥ तथा लोकस्य साक्षी मां सर्वतः पातु पावकः ॥ ८१ ॥

( पू. द्वि. ) ज्वालयित्वा ॥( मू. ) तस्थौ. ॥ ७८ ॥ ( ७९ पू. ) मैथिली सीता राघवं परिक्रम्य, ॥ ( ७९ उ. ) सर्वलोकानां च पश्यतां [ सतां ], ॥ ( ८० पू. ) प्रणम्य, ॥ अग्निसमीपगा ( मू. ) [ सती ] इदं उवाच – ॥ ७९ ॥८०॥ ‘ ( पू. ) न अपसर्पति, ॥ ( मू. ) मां सर्वतः पातु.’ ॥८१॥

१ मोठी काष्ठांची रास. २ पेटवून. ३ राहिला. ४ मुकाभ्यानें. ५ दूर होतें. ६ रक्षण करो.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

सीता अग्नींत शिरते.

त्यावेळीं इतकें भाषण करून सीतेनें अग्नीला प्रदक्षिणा घातली व त्या भडकलेल्या आगींत प्रवेश केला. त्या साध्वीच्या मनाला, - स्वतांच्या पवित्रतेबद्दल खात्री असल्यामुळें, - भीति अगदीं वाटली नाहीं. ॥ ८२ ॥ सिद्धगणांसह सर्व प्राणी, सीता प्रचंड अग्नींत शिरली असें पाहून, अतिशय हळहळले व परस्परांशीं ह्मणूं लागले :– 'अहो ! सीता ह्मणजे लक्ष्मीचा अवतार. रामाची सर्व शोभा कायती तीच. रामाला तर हें सर्व विदित आहे, आणि त्यानें आपल्या सीतेचा त्याग केला कसा ( तिला अग्नींत प्रवेश करण्यास अनुमोदन दिलें कसें )?' ॥ ८३ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणार्थबोधे युद्धकाण्डे द्वादशः सर्गः ॥ १२ ॥

पुढें भगवान् सहस्रनेत्र इंद्र, यम, वरुण, महातेजस्वी कुबेर, नंदिवाहन पिनाकपाणि ( शंकर ), ॥ १ ॥

एवमुक्त्वा तदा सीता परिक्रम्य हुताशनम् ॥ विवेश ज्वलनं दीप्तं निर्भयेन हृदा सती ॥८२॥ दृष्ट्वा ततो भूतगणाःससिद्धाः सीतां महावह्निगतां भृशार्ताः॥ परस्परं प्राहुरहो स सीतां रामः श्रियं स्वां कथमत्यजज्ज्ञः ॥ ८३ ॥ इति श्रीम० युद्धकाण्डे द्वादशः सर्गः ॥ १२ ॥ ततः शक्रः सहस्राक्षो यमश्च वरुणस्तथा ॥ कुबेरश्च महातेजाः पिनाकी वृषवाहनः ॥ १ ॥

तदा सती सीता ( पू. ) परिक्रम्य[1], ॥ ( मू. ) दीप्तं ज्वलनं[2] विवेश[3]. ॥८२॥ ततः ससिद्धाः ( पू. ) दृष्ट्वा भृशार्ताः[4] [ सन्तः ] ॥ परस्परं प्राहुः – 'अहो सः ज्ञः[6] रामः श्रियं स्वां ( मू. )?' ॥ ८३ ॥ इति युद्धकाण्डे द्वादशः सर्गः ॥ १२ ॥ ततः सहस्राक्षः[8] ( पू. ) ॥ महातेजाः (मू.) पिनाकी[11], ॥१॥

१ प्रदक्षिणा घालून. २ अग्नीस. ३ शिरली. ४ मोठ्या अग्नींत शिरलेल्या. ५ अत्यंत दुःखी. ६ शहाणा ज्ञानसंपन्न. ७अत्यजत् टाकिता झाला. ८ सहस्र नेत्र ज्याला, असा. ९ इंद्र. १० वृषभ वाहन ज्याचें, असा. ११पिनाक नांवाचें धनुष्य ज्याचें तो(शकर).



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मुनि, सिद्ध, चारण ह्यांसह ब्रह्मवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असा ब्रह्मदेव, पितर, ऋषि, साध्य, गंधर्व, अप्सरा, सर्प, ॥ २ ॥ हे व दुसरेही लोक, उत्तम विमानांत बसून, ज्या ठिकाणीं रामचंद्र होता, तेथें आले व हात जोडून प्रभु रामचंद्राला ह्मणाले :— ॥ ३ ॥ ' रघुवीरा ! तूं ज्ञानरूप आहेस. तूं सर्व लोकांना उत्पन्न करून त्यांचीं कर्मे प्रत्यक्ष अवलोकन करीत असतोस. तूं वसूंपैकीं आठवा आहेस. रुद्रगणांमध्यें शंकर तूं होस. ॥४॥ तूं चतुर्मुख ब्रह्मदेवाच्या रूपानें सर्व लोकांची उत्पत्ति करितोस. अश्विनीकुमार तुझ्या नाकपुड्या असून चं-

ब्रह्मा ब्रह्मविदां श्रेष्ठो मुनिभिः सिद्धचारणैः ॥ पितरो ऋषयः साध्या गन्धर्वाप्सरसोरगाः ॥ २ ॥ एते चान्ये विमानाग्र्यैराजग्मुर्यत्र राघवः ॥ अब्रुवन्परमात्मानं रामं प्राञ्जलयश्च ते ॥ ३ ॥ कर्ता त्वं सर्वलोकानां साक्षी विज्ञानविग्रहः॥ वसूनामष्टमो ऽसि त्वं रुद्राणां शंकरो भवान् ॥ ४ ॥ आदिकर्ता ऽसि लोकानां ब्रह्मा त्वं चतुराननः ॥ अश्विनौ घ्राणभूतौ ते चक्षुषी चन्द्रभास्करौ ॥ ५ ॥

ब्रह्मविदां श्रेष्ठः ( पू. ) [ च सह ] ॥ ( मू. ) ॥ २ ॥ एते, अन्ये ( पू. ), [ तत्र आजग्मुः. ॥ ते प्राञ्जलयः [ सन्तः ] ( मू. ) अब्रुवन् – ॥ ३ ॥ ' त्वं सर्वलोकानां ( पू. ) [ च असि ]. ॥ त्वं ( मू. ) रुद्राणां शङ्करः [ अस्ति ]. ॥ ४ ॥ त्वं लोकानां ( पू. ) ब्रह्मा असि. ॥ अश्विनौ ते (मू.) [ ते ] चक्षुषी. ॥ ५ ॥

---

१ उत्तम विमानांच्या योगें. २ आले. ३ ज्ञानरूपी. ४ चतुर्मुख.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

द्रसूर्य तुझे नेत्र आहेत.॥५॥तूं लोकांचा उत्पादक व नाशकर्ता असून नित्य आहेस. तुजहून अन्य कोणी नाहीं. तूं सदासर्वकाळ उदय पावलेला असतोस (तुझ्या ठिकाणीं रात्र व दिवस हा भेद नाहीं). तुझें स्वरूप नित्य शुद्ध, नित्य ज्ञानरूप, नित्य मुक्त, निर्गुण व भेदभावरहित होय.॥६॥जे लोक तुझ्या मायेच्या योगें वेष्टिलेले असतात, त्यांना तूं मनुष्यरूपी भासतोस. रामा, तुझें नामस्मरण करणारांना तर तूं नित्य चैतन्यरूपी वाटतोस. ॥७॥ रावणानें आमचें स्थान व त्याच्याबरोबर तेजही हरण केलें होतें; पण आज तूं त्या दुष्टाचा वध केलास ह्मणून आह्मांला आपलें पद पुन्हां प्राप्त झालें.'॥८॥(शंकर ह्मणाले :– पार्वति! ) राम सत्यमार्गाचा अवलंब करून राहत असे. देव अशा प्रकारें स्तुति करीत असतां, साक्षात् पितामह ब्रह्मदेव नम्र होऊन रा-

लोकानामादिरन्तो ऽसि नित्य एकः सदोदितः ॥ सदा शुद्धः सदा बुद्धः सदा मुक्तो ऽगुणो ऽद्वयः ॥६॥ त्वन्मायासंवृतानां त्वं भासि मानुषविग्रहः ॥ त्वन्नाम स्मरतां राम सदा भासि चिदात्मकः ॥ ७ ॥ रावणेन हृतं स्थानमस्माकं तेजसा सह ॥ त्वया ऽद्य निहतो दुष्टः पुनः प्राप्तं पदं स्वकम् ॥ ८ ॥ एवं स्तुवत्सु देवेषु ब्रह्मा साक्षात्पितामहः ॥ अब्रवीत्प्रणतो भूत्वा रामं सत्यपथे स्थितम् ॥ ९ ॥

राम, त्वं ( मू. ) असि. ॥ ६ ॥ ( मू. ) भासि, ( मू. ) भासि. ॥ ७ ॥ रावणेन अस्माकं ( पू. ) हृतं. ( मू. ) [ अयं ] निहतः [ अनेन ] स्वकं पदं प्राप्तं. ' ॥ ८ ॥ देवेषु एवं स्तुवत्सु [ सत्सु ], ( पू. ) ब्रह्मा ॥ ( मू. ) रामं अब्रवीत् – ॥ ९ ॥

---

१ नित्य उदय पावलेला. २ तुझ्या मायेनें वेष्टिलेल्यांना.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

माचा स्तव करूं लागला :– ॥९॥ ब्रह्मदेव ह्मणाला :– "देवा विष्णुरूपा रघुवीरा ! मी तुला वंदन करितों. तूं सर्व जगाच्या राहटीचें कारण आहेस. अध्यात्मज्ञानसंपन्न लोक हृदयांतरीं तुझें ध्यान करितात. तुझ्या ठिकाणीं त्याज्य ( दुःखसाधनें ) व ग्राह्य ( सुखसाधनें ) हा भेद नाहीं. तूं परिपूर्ण, एक, सत्तारूपी, सर्वांच्या हृदयांत राहणारा व ज्ञानमय आहेस. ॥ १० ॥ ज्यांच्या तमोगुणाचा नाश झाला ते यति, ' कांहीं होवो परमेश्वराचें दर्शन करून घ्यावयाचेंच ' अशा निश्चयानें प्राण व अपान ह्या दोन वायूंना हृदयांत कोंडून सकल संशयबंधनांचा व विषयसमूहांचा भेद करितात, तेव्हां त्यांना ज्याचें दर्शन मिळतें तो परमेश्वर रामरूपानें - येथें अवतरला आहे; - त्याच्या मस्तकावर रत्नांचा किरीट आहे व त्याची अंगकांति सूर्यासा-

ब्रह्मोवाच । वन्दे देवं विष्णुमशेषस्थितिहेतुं[1] त्वामध्यात्मज्ञानिभिरन्तर्हृदि[2] भाव्यम्[3] ॥ हेयाहेयद्वन्द्वविहीनं[4] परमेकं सत्तामात्रं सर्वहृदिस्थं दृशिरूपम्[5] ॥ १० ॥
प्राणापानौ निश्चयबुद्ध्या हृदि रुद्ध्वा[8] छित्त्वा[10] सर्वं संशयबन्धं विषयौघान्[9] ॥ पश्यन्तीशं यं गतमोहा[6] यतयस्तं[7] वन्दे रामं रत्नकिरीटं रविभासम् ॥ ११ ॥

ब्रह्मा उ० – ( मू. ) विष्णुं त्वां वन्दे. ॥ १० ॥ गतमोहाः यतयः निश्चयबुद्ध्या हृदि ( पू. ) [च] छित्त्वा ॥ यं ईशं पश्यन्ति, ( मू. ) रामं वन्दे. ॥ ११ ॥

---

१ सकलांच्या रक्षणाचें कारण. २ अंतःकरणांत. ३ चिंतन करण्याजोगा. ४ त्याज्य व ग्राह्य ह्या जोडीनें रहित. ५ ज्ञानरूप. ६ अज्ञानरहित. ७ संन्यासी. ८ रोध करून. ९ विषयांच्या प्रवाहांस. १० तोडून.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रखी आहे. मी त्याला वंदन करितों. ॥ ११ ॥ त्या प्रभूला मायेचे गुण स्पर्श करूं शकत नाहींत; तो लक्ष्मीचा पति होय; सर्वांचा आदि ह्मणजे जगाचें आदि कारण तरी तोच; त्याच्या स्वरूपाला देशतः किंवा कालतः परिमाण नाहीं ( तो सर्वव्यापी व तिन्ही काळीं समान राहणारा आहे ); तो मोहाचा नाश करितो, ह्मणून मुनि त्याला वंदन करितात; योगी पुरुषांच्या ध्यानाचा विषय तोच; योगमार्ग त्यानेंच प्रवृत्त केला; तो परिपूर्णरूपी ईश्वर स्वतां रमणीय असल्यामुळें सकल लोकांना रमवीत असतो. मी त्या रामचंद्राला प्रणाम करितों. ॥ १२ ॥ भाव ह्मणजे दृश्य व अभाव ह्मणजे तुच्छ : परमेश्वर भाव आणि अभाव ह्या दोन्ही प्रकारच्या ज्ञानांचा विषय नाहीं; - कारण, तो दृश्य नाहीं व तुच्छही नाहीं. - शंकरप्रभृति देव विषयभोगांवर

मायातीतं[1] माधवमाद्यं[2][3] जगदादिं[4] मानातीतं[5] मोहविनाशं[6] मुनिवन्द्यम्[7] ॥ योगिध्येयं[8] योगविधानं[9] परिपूर्णं वन्दे रामं रञ्जितलोकं[10] रमणीयम् ॥ १२ ॥ भावाभावप्रत्ययहीनं[11] भवमुख्यैर्भोगासक्तैरर्चितपादाम्बुजयुग्मम्[12][13] ॥ नित्यं शुद्धं बुद्धमनन्तं प्रणवाख्यं वन्दे रामं वै तमशेषासुरदावम्[14] ॥ १३ ॥

( मू. ) रामं वन्दे. ॥ १२ ॥ भावाभावप्रत्ययहीनं भोगासक्तैः ( मू. ) रामं वन्दे. ॥ १३ ॥

---

१ मायेच्या पार असणाऱ्या. २ लक्ष्मीपति. ३ पुरातन. ४ जगाचें आदिकारण. ५ प्रमाणांचा अविषय. ६ अज्ञानाचा नाश करणारा. ७ मुनि वंदन करितात ज्याला, अशा. ८ योगी ध्यान करितात ज्याचें, अशा. ९ योगमार्ग प्रवृत्त करणारा, अशा. १० रमविले लोक ज्यानें, अशा. ११ भाव किंवा अभाव दोन्ही अनुभव ज्याबद्दल नाहींत, अशा. १२ भोगांवर आसक्त न झालेल्यांनीं. १३ पूजिलें चरणकमलद्वय ज्याचें, अशा. १४ सर्व दैत्यांना वणव्यासारख्या.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आसक्त न राहतां त्याच्या चरणकमलद्वयाची आराधना करीत असतात. तो तीन्ही कालीं नाश न पावणा-
रा, मायेच्या दोषांनीं अस्पृष्ट, ज्ञानरूप व देशकालादिपरिमाणरहित आहे. प्रणव ( ॐकार ) ही त्याची
संज्ञा होय. त्यानें सकल दैत्यवंशरूपी अरण्याला वणवा लाविला ( त्याचा नाश केला ). ॥ १३ ॥ रामा ! तूं
माझा स्वामी आहेस; कारण, मी ज्यासाठीं तुझी प्रार्थना केली तो सगळा कार्यभाग तूं पार पाडिलास. तुझ्या
स्वरूपाला इयत्ता नाहीं. लक्ष्मीपति विष्णु तुझेंच रूप. तूं सकल जगाचें पोषण चालवितोस व अनन्य भावें
शरण येणारांना प्राप्त होतोस. जे लोक तुझ्या स्वरूपाचें ध्यान करितात, त्यांचा संसारपाश तूं दूर करितोस.
योगाभ्यासाच्या योगें जें अंतःकरण पवित्र झालें असेल, त्याच्या बरोबर तूं संचार करितोस ( त्या अंतःक-
रणाच्या वृत्तींना कळतोस ). ॥ १४ ॥ तूं लोकपरंपरांच्या उत्पत्तीचें व नाशाचें कारण आहेस. लोकांचा

त्वं मे नाथो नाथित[1]कार्याखिलकारी मानातीतो माधवरूपो ऽखिलधारी ॥ भक्त्या
गम्यो भावितरूपो भव[4]हारी योगाभ्यासैर्भावित[5]चेतःसहचारी ॥ १४ ॥ त्वामाद्य-
न्तं लोकततीनां परमीशं लोकानां नो लौ[7]किकमानैरधि[9]गम्यम् ॥

( पू. ), भक्त्या गम्यः[2], भावित[3]रूपः [ सन् ] ( मू. ) [ असि ]. ॥ १४ ॥ लोक[6]ततीनां आद्यन्तं
लोकानां परं ईशं लौकिक[7]मानैः [8]नो ( पू. ) ॥

१ प्रार्थिलेलीं सकल कार्यें करणारा. २ प्राप्त होण्याजोगा. ३ चिंतिलें रूप ज्याचें, असा. ४ संसार दूर करणारा. ५ शुद्ध झा-
लेल्या अंतःकरणाबरोबर फिरणारा ( त्याला कळणारा). ६ लोकपरंपरांचा. ७ लोकप्रसिद्ध प्रमाणांवरून. ८ नाहीं. ९ कळण्याजोगा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

परमेश्वर ( श्रेष्ठ पालनकर्ता ) तूंच. लौकिक प्रमाणांवरून तुझें ज्ञान होत नाहीं ( तर केवळ शास्त्रांच्या योगें मात्र होतें ). ज्यांच्या मनांत ईश्वराची पूजा करण्याविषयीं प्रीति, व तिचें फल अवश्य मिळेल असा निश्चय बसत असेल आणि ज्यांच्या चित्तवृत्ति ईश्वराकडे लागल्या असतील, त्यांनाच रामाची सेवा करितां येते. त्याचा शरीरवर्ण निळ्या कमळासारखा श्यामल आहे. मी त्या सुंदर रामचंद्राला वंदन करितों.॥१५॥ हे लक्ष्मीपते ! तुझें स्वरूप यच्च यावत् परिमाणांहून पलिकडे आहे; ह्मणजे तुला कोणत्याही परिमाणानें मोजतां येत नाहीं. जगांतील सर्व लोक इंद्रियादि प्रमाणांवर आसक्त असतात; त्यांतील कोणा तरी पुरुषाला तुझें ज्ञान संपादन करितां येईल काय ? मुनिजन तुला मोठा मान देतात. तूं कृष्णावतार घेऊन वृंदावनांत संचार केलास व त्यावेळीं मायेनें सकल देवसमूहाला वंदनही करीत असस. वस्तुतः तूं शंकरप्रभृति देवांना

भक्तिश्रद्धाभावसमेतैर्भजनीयं वन्दे रामं सुन्दरमिन्दीवरनीलम् [1] ॥ १५ ॥
को वा ज्ञातुं त्वामतिमानं [3] गतमानं [4] मानासक्तो [2] माधव शक्तो मुनिमान्यम् ॥
वृन्दारण्ये [5] वन्दितवृन्दारकवृन्दं [6] वन्दे रामं भवमुखवन्द्यं [7] सुखकन्दम् [8] ॥ १६ ॥

( मू. ) रामं त्वां वन्दे. ॥१५॥ माधव, मानासक्तः कः वा ( पु. ) त्वां ज्ञातुं शक्तः [ भवेत् ] ? ॥
( मू. ) रामं वन्दे. ॥ १६ ॥

---

१ निळ्या कमळाप्रमाणें श्यामल. २ इंद्रियांवर आसक्त. ३ प्रमाणांपलिकडे असणारा ( व्यापक ). ४ इयत्तारहित. ५ वृंदावनांत. ६ वंदिला देवसमूह ज्यानें, अशा. ७ शंकरप्रभृति देवांनीं वंदन करावें ज्याला, अशा. ८ सुखाचें उत्पत्तिस्थान.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

वंद्य आहेस. कारण, परमसुखाचा कंद ( उत्पादक ) काय तो तूंच. मी तुला प्रणाम करितों. ॥ १६ ॥ अनेक शास्त्रें व वेदसमूह तुझेंच वर्णन करीत असतात. तूं नित्यानंदमय व निर्विषयज्ञानरूप ( कांहीं तरी आहे खरें; अमुकच असें मात्र सांगतां येत नाहीं असें ज्ञान हें रूप ज्याचें असा ) व अनादि ( सर्वांच्या अगोदरचा ) असून माझा कार्यभाग करण्यासाठीं मनुष्यरूप स्वीकारिलें आहेस. तूं मथुराधिपति ( कृष्ण ) झाला होतास तेव्हां तुझा शरीरवर्ण पाचेसारखा होता. मी तुला प्रणाम करितों. " ॥ १७ ॥ ( शंकर ह्मणाले :— पार्वति ! ) ब्रह्मदेवाचें हें भाषण ब्रह्मज्ञान करून देणारें आहे. पृथ्वीवर जो मनुष्य श्यामवर्ण रामचंद्राचें ध्यान करून भक्तिपूर्वक ह्या उत्तम स्तोत्राचा पाठ व मनन करितो, तो पातकसमूहांपासून मुक्त होतो. प्रभु रामचंद्र भक्तांच्या इच्छित कामना पूर्ण करितो. ॥ १८ ॥

नानाशास्त्रैर्वेदकदम्बैः प्रति[२]पाद्यं नित्यानन्दं निर्विषयज्ञानमनादिम् ॥ मत्से[३]वार्थं मानुषभा[४]वं प्रतिप[५]न्नं वन्दे रामं मरकतव[६]र्णं मथुरेशम् ॥ १७ ॥ श्रद्धायुक्तो यः पठतीमं स्तवमाद्यं ब्राह्मं[८] ब्रह्मज्ञानविधानं भुवि मर्त्यः ॥ रामं श्यामं कामितका[७]मप्रदमीशं ध्यात्वा ध्या[९]ता पातक[१०]जालैर्वि[११]गतः स्यात् ॥ १८ ॥

नानाशास्त्रैः, वेदकदम्बैः [ च ] ( मू. ) रामं वन्दे. ॥ १७ ॥ भुवि श्रद्धायुक्तः यः मर्त्यः श्यामं कामितकामप्रदं ईशं रामं ध्यात्वा, ( पू. ) स्तवं पठति, [ सः ] ( मू. ). ॥ १८ ॥

---

१ वेदसमूहांनीं. २ प्रतिपादन करण्याजोगा. ३ माझ्या सेवेसाठीं. ४ मनुष्यरूपास. ५ पावलेल्या. ६ पाचेसारखा वर्ण ज्याचा, अशा. ७ इच्छिलेले मनोरथ देणारा अशा. ८ ब्रह्मज्ञानजनक. ९ ध्यान करणारा. १० पातकसमूहांनीं. ११ सोडिलेला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

लोकांच्या पितामहानें (ब्रह्मदेवानें) केलेली ही स्तुति अग्नीनें ऐकिली; व लागलाच तो(अग्नि)जानकीला अंका-
वर घेऊन प्रकट झाला. जानकीचें रूप तेजःपुंज दिसत होतें. तिची प्रभा निर्मल व किंचित् रक्तवर्ण होती.
तिनें तांबडें वस्त्र परिधान केलें असून आंगावर अनेक दिव्य अलंकार घातले होते. ॥१९॥ अग्नि सर्व जगाचा
साक्षी होय. तो शरणागताचीं सकल दुःखें दूर करितो. त्यानें रघुवीराला ह्मटलें :– "रामचंद्रा ! तूं पूर्वी
वनामध्यें देवी जानकी माझ्या स्वाधीन केली होतीस, - ती ही होय. - आतां हिचा स्वीकार कर. ॥२०॥

श्रुत्वा स्तुतिं लोकगुरोर्विभावसुः स्वांके समादाय विदेहपुत्रिकाम् ॥ विभ्राजमानां
विमलारुणद्युतिं रक्ताम्बरां दिव्यविभूषणान्विताम् ॥ १९ ॥ प्रोवाच साक्षी जग-
तां रघूत्तमं प्रपन्नसर्वार्तिहरं हुताशनः ॥ गृहाण देवीं रघुनाथ जानकीं पुरा त्वया
मय्यवरोपितां वने ॥ २० ॥

जगतां साक्षी हुताशनः विभावसुः लोकगुरोः स्तुतिं श्रुत्वा, ( १९ मू. ) विदेहपुत्रिकां
समादाय, प्रपन्नसर्वार्तिहरं रघूत्तमं प्रोवाच – 'रघुनाथ, त्वया पुरा वने मयि अवरोपितां ( मू. )
गृहाण. ॥ १९ ॥ २० ॥

---

१ होमद्रव्यें भक्षण करणारा. २ अग्नि. ३ लोकांच्या पित्याची. ४ शोभणाऱ्या. ५ स्वच्छ अरुणासारखी कांति जिची, अशा.
६ रक्त वस्त्र जिचें अशा. ७ दिव्य अलंकारांनीं युक्त. ८ जनककन्येला. ९ घेऊन. १० शरणागताच्या सर्व पीडा हरण करणाऱ्या.
११ ठेविलेल्या. १२ घे.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

- रामा ! शरणागतांचीं संकटें - दूर करणें हें तुझें व्रत होय. प्रभो, तूं रावणाचे प्राण हरण करण्यासाठीं मायेच्या योगें दुसरी जानकी निर्माण केलीस, व पुत्रबांधवांसह रावणाचा निःपात करून पृथ्वीचा भार उतरलास. ॥२१॥ प्रतिबिंबरूप सीता ज्या कार्याकरितां निर्मिली होती, तो भाग पार पडला ह्मणून ती कृतकृत्य होऊन अंतर्धान पावली. " - हें अग्नीचें वाक्य ऐकिल्यावर रामाच्या अंतःकरणाला - परम संतोष वाटला. जानकीलाही अत्यंत हर्ष झाला होता. पुढें रामानें अग्नीची पूजा करून सीतेचा स्वीकार केला व तिला अंकावर बसविलें. सीता ही त्रैलोक्याची माता नित्य अढळ रूपानें राहणारी लक्ष्मी, व राम हा लक्ष्मीचा पति विष्णु होय. ॥ २२ ॥

विधाय मायाजनकात्मजां हरे दशाननप्राणविनाशनाय च ॥ हतो दशास्यः सह पुत्रबान्धवैर्निराकृतोऽनेन भरो भुवः प्रभो ॥ २१ ॥ तिरोहिता सा प्रतिबिम्बरूपिणी कृता यदर्थं कृतकृत्यतां गता ॥ ततोऽतिहृष्टां परिगृह्य जानकीं रामः प्रहृष्टः प्रतिपूज्य पावकम् ॥ स्वांके समावेश्य सदाऽनपायिनीं श्रियं त्रिलोकीजननीं श्रियः पतिः ॥ २२ ॥

प्रभो, ( पू. ) मायाजनकात्मजां विधाय, ॥ ( मू. ) सह हतः, अनेन भुवः भरः निरा[1]कृतः. ॥२१॥ यदर्थं कृता, [ तद्विषयतः ] ( पू. ) प्रतिबिंब[2]रूपिणी सा तिरोहि[3]ता. ' ॥ ततः श्रियः पतिः रामः [4]पावकं प्रति[5]पूज्य, ( मू. ) जानकीं परि[6]गृह्य, [7]स्वाङ्के [8]समावेश्य [ च ] हृष्टः [ बभूव ], ॥ २२ ॥

---

१ दूर केलेला. २ छायारूप. ३ गुप्त झालेली. ४ अग्नीस. ५ पूजा करून. ६ स्वीकारून. ७ आपल्या मांडीवर. ८ बसवून.

६१२९

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

इन्द्र रामाची स्तुति करितो.

जानकीसहित श्रीरामाचें कांतीच्या योगें उज्ज्वल दिसणारें रूप पाहून देवेंद्राला आनंद वाटला; त्यानें जवळ येऊन व हात जोडून भक्तिपुरःसर सद्गदित वाणीनें रामाची स्तुति करण्यास प्रारंभ केला :– ॥ २३ ॥ इंद्र ह्मणाला :– "मी रामचंद्राची सेवा करण्यास सिद्ध आहें. त्या प्रभूची शरीरकांति निळ्या कमळासारखी तेजःपुंज श्यामल दिसते; त्याचें नाम तर संसाररूपी अरण्याला वणव्यासारखें भासतें ( संसाराचा नाश करणारें आहे ). भवानी ( पार्वती ) आपल्या हृदयांत त्याच्या आनंदरूपाचें चिंतन करीत असते. संसाराचा नाश होण्यास कारण तोच होय. शंकरप्रभृति देव त्याची सेवा करीत असतात. ॥ २४ ॥

दृष्ट्वाऽथ रामं जनकात्मजायुतं श्रिया स्फुरन्तं सुरनायको मुदा ॥ भक्त्या गिरा गद्गदया समेत्य कृताञ्जलिः स्तोतुमथोपचक्रमे ॥ २३ ॥ इन्द्र उवाच । भजेऽहं सदा राममिन्दीवराभं भवारण्यदावानलाभाभिधानम् ॥ भवानीहृदा भावितानन्दरूपं भवाभावहेतुं भवादिप्रपन्नम् ॥ २४ ॥

अथ सुरनायकः ( पू. ) रामं दृष्ट्वा, ॥ भक्त्या समेत्य कृताञ्जलिः [ सन् ] ( मू. ) – ॥ २३ ॥ इन्द्रः उ० – ' ( मू. ) रामं भजे. ॥ २४ ॥

१ देवेंद्र. २ जवळ येऊन. ३ निळ्या कमळासारखी कांति ज्याची, अशा. ४ संसाररूप अरण्यास वणव्यासारखें भासणारें नांव ज्याचें, अशा. ५ पार्वतीच्या मनानें. ६ चिंतिलें आनंदरूप ज्याचें, अशा. ७ संसाराच्या नाशाला कारण. ८ शंकरादिकांनीं सेविलेल्या.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रामचंद्रच एक देवगणांच्या दुःखपरंपराचा नाश करणारा होय. त्याचें शरीर मनुष्यासारखें दिसत आहे खरें; परंतु वस्तुतः त्याला कोणताही आकार नाहीं. त्याचीच स्तुति करणें योग्य. तो परम समर्थ परमानंदरूप श्रेष्ठ प्रभु भक्तांचीं दुःखें दूर करतो. त्यानें भूमीचा भार उतरिला. मी त्या रामचंद्राची सेवा करितों. ॥२५॥ तो राम शरणागतांना सर्व प्रकारें आनंद देतो. अनेक भक्त त्याला शरण येतात. त्याचें केवळ नांव शरणागतांचीं दुःखें निःशेष नाहींशीं करितें. शमदमादि तपश्चर्येच्या योगें योगाभ्यास करणारे महान्महान् योगी त्याचें सत्तारूपानें ध्यान करितात. तो सुग्रीव विभीषण इत्यादिकांचा मित्र होय. मी त्या रामरूपी सूर्याची

सुरानीक[2]दुःखौघनाशैकहेतुं [3]नराकारदेहं [4]निराकारमीड्यम्[5] ॥ परेशं परानन्दरूपं वरे[6]ण्यं हरिं राममीशं भजे भारनाशम्[7] ॥ २५ ॥ प्रपन्नाखिलानन्ददोहं[8] प्रपन्नं प्रप[9]न्नार्तिनिःशेषनाशाभिधानम् ॥ तपोयोगयोगीशभावाभिभाव्यं[10] कपीशादिमित्रं[11] भजे राममित्रम्[12] ॥ २६ ॥

( मू. ) रामं भजे. ॥ २५ ॥ ( मू. ) भजे. ॥ २६ ॥

---

१ सेवा करितों. २ देवसमूहाचे दुःखसमूह नष्ट करण्यास एक कारण. ३ मनुष्याच्या आकाराचा देह ज्याचा, अशा. ४ रूपरहित. ५ स्तुतीचा योग्य विषय. ६ श्रेष्ठ. ७ भार उतरणाऱ्या. ८ शरणागतांना सकळ आनंद अर्पण करणाऱ्या. ९ शरणागतांच्या पीडा निःशेष नाहींशा करितें नाम ज्याचें, अशा. १० तपश्चर्येच्या योगें योग साधणारे योगिजन सत्तारूपानें ज्याचें चिंतन करितात, अशा. ११ सुग्रीवादि मित्र ज्याचे, अशा. १२ रामरूपी सूर्यास.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

उपासना करितों. ॥ २६ ॥ जे लोक नित्य भोग भोगण्यांत गुंतून गेले असतात त्यांना राम फार दूर वाटतो. पण जे जन नित्य योगाभ्यास करितात त्यांना तो अतिशय जवळ (अंतर्यामीं) आहे असा अनुभव येतो. - तो ब्रह्मानंदरूप असल्यामुळें सकल - प्राण्यांच्या आनंदांचा कंद (उत्पत्तिस्थान) होय. त्याचें रूप जनककन्येला आनंदमय वाटतें, मी त्या रघुवीराला शरण आहें. ॥ २७ ॥ ईश्वरा ! - जसा स्फटिक जासुंदीच्या फुलाजवळ ठेविला तर लाल दिसतो, हिरव्या वस्तूजवळ ठेविला तर हिरवा दिसतो त्याप्रमाणें - तूं आपल्या महाशक्तियुक्त अशा योगमायेच्या सत्त्वरजस्तमादि विशेष गुणांनीं युक्त होतोस ह्मणून लीलेसाठीं मनुष्यशरीर धारण करून वागत आहेस असा दिसतोस. - वस्तुतः तूं निर्गुण निराकार आहेस. -

सदा भोग[1]भाजां सुदूरे[2] विभान्तं[3] सदा योग[4]भाजामदूरे[5] विभान्तम्[6] ॥ चिदानन्दकन्दं[7] सदा राघवेशं विदेहात्मजानन्दरूपं[8] प्रपद्ये[9] ॥ २७ ॥ महायोगमायाविशेषानुयुक्तो[10] विभासीश लीलानराकारवृत्तिः[11] ॥ त्वदानन्दलीलाकथापूर्णकर्णाः[12] सदानन्दरूपा[13] भवन्तीह लोके ॥ २८ ॥

(मू.) राघवेशं सदा प्रपद्ये. ॥ २७ ॥ ईश, [त्वं] (पू.) विभासि. ॥ इह लोके (मू.). ॥ २८ ॥

१ भोग भोगणारांला. २ अति दूर. ३ भासणाऱ्या. ४ योगाभ्यासी पुरुषांना. ५ जवळ. ६ भासणाऱ्या. ७ प्राण्यांच्या आनंदाचें मूलस्थान. ८ जनककन्येला आनंदरूपी. ९ शरण आहें. १० प्रबल योगमायेच्या सत्त्वादि भेदांनीं युक्त. ११ लीलेसाठीं स्वीकारिलीं मनुष्याच्या आकाराची वृत्ति ज्यानें, असा. १२ तूं आनंदानें ज्या लीला करितोस त्यांच्या गोष्टींनीं भरले कान ज्यांचे, असे. १३ आनंदमय.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तशा अवतारांमध्यें तूं आनंदानें अनेक चरित्रें करितोस; त्यांविषयींच्या गोष्टींनीं ह्या लोकांतील ज्या पुरुषांचे कान भरून जातात (जे पुरुष त्या कथा ऐकतात), ते नित्य आनंदमय बनतात. ॥२८॥ ईश्वरा ! 'मी स्वर्गींचा राजा' असा अभिमान हें मद्य प्राशन केल्यामुळें मी अत्यंत उन्मत्त होऊन गेलों होतों. भूमीवर सामान्य राजांना 'आह्मी राजे' असा अभिमान वाटतो, तसाच मलाही गर्व वाटत असे; त्याचा परिणाम मला तुझ्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान नाहीं, हा होय. आतां तुझ्या चरणकमलाच्या अनुग्रहामुळें माझा 'मी त्रैलोक्याचा अधिपति' हा गर्व नाहींसा झाला. ॥ २९ ॥ रामा! तुझ्या बाहुभूषणांत बसविलेलीं व हारांत गुंफलेलीं रत्नें चमकत असल्यामुळें तुझें रूप लोकांना फार मनोहर वाटतें. - पृथ्वीवर भाररूप जीं दैत्यांचीं सैन्यें

अहं [1]मानपानाभिमत्तप्रमत्तो न वेदा[2]खिलेशाभिमानाभिमानः ॥ [4]इदानीं भवत्पा[5]दपद्मप्रसादात्त्रिलोकाधि[6]पत्याभिमानो वि[7]नष्टः ॥ २९ ॥ [8]स्फुरद्रत्नकेयूरहाराभिरामं [9]धराभारभूतासुरानीकदावम् ॥ [10]शरच्चन्द्रवक्त्रं [11]लसत्पद्मनेत्रं दुरावार[12]पारं भजे राघवेशम् ॥ ३० ॥

( पू. ) [ अहं त्वां ] न वे[3]द. ॥ ( मू. ). ॥ २९ ॥ ( मू. ) राघवेशं भजे. ॥ ३० ॥

---

१ अहंकार हें मद्य प्राशन केल्यामुळें अभिमानी व धुंद झालेला. २ सर्वसामान्य श्रीमंतांच्या अभिमानासारखा अभिमान ज्याला असा. ३ जाणतों. ४ आतां. ५ तुझ्या चरणकमलाच्या कृपेनें. ६ त्रैलोक्याधिपति हा अभिमान. ७ नाश पावला. ८ चमकणारीं रत्नांचीं बाहूभूषणें व हार ह्यांच्यायोगें रमणीय. ९ पृथ्वीवर भारभूत असलेल्या दैत्यसमूहाचा वणवा. १० शरदृतूंतील चंद्राप्रमाणें, मुख ज्याचें, अशा. ११ शोभतात कमलासारखे नेत्र ज्याचे, अशा. १२ कळण्यास कठिण आदि अंत ज्याचा, अशा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

असतात, त्यांना तूं वणव्यासारखा भासतोस. तुझें मुख शरदृतूंतील चंद्रासारखें शांत व निर्मल दिसतें, व नेत्र तर कमळासारखे शोभत आहेत. तुझ्या माहात्म्याचा आदि किंवा अंत लागणें अत्यंत कठिण होय. मी तुझी सेवा करितों. ॥ ३० ॥ तुझी अंगकांति इंद्रनील मण्यांप्रमाणें व मेघांसारखी श्यामल आहे. तूं विराध वगैरे राक्षस मारून लोकांत जिकडे तिकडे शांतता पसरलीस. किरीटकुंडलादि अलंकारांच्या योगें तुझें स्वरूप सुशोभित दिसतें. शंकराला तर तूं अलभ्य लाभ वाटतोस. हे रघुपते रामचंद्रा! मी तुझी उपासना करीत राहतों. ॥ ३१ ॥ रामा! कोटि चंद्र एकदम उगवले असतां त्यांचा एकवटलेला प्रकाश जितका दिसेल

सुराधीशनीलाभ्रनीलांगकान्तिं[1] विराधादिरक्षोवधाल्लोक[2][3]शान्तिम्॥ किरीटादि[4]शोभं पुरारातिलाभं[5] भजे रामचन्द्रं रघूणामधीशम् ॥ ३१ ॥ लसच्चन्द्रकोटिप्रकाशा[6]दिपीठे[7] समासीनमंके समाधाय सीताम् ॥ स्फुरद्धेमवर्णा[8] तडित्पुञ्जभासां भजे रामचन्द्रं निवृत्तार्तितन्द्रम्[9] ॥ ३२ ॥

( मू. ) रामचन्द्रं भजे. ॥ ३१ ॥ अङ्के स्फुरद्धेमवर्णां तडित्पुञ्जभासां सीतां समाधाय ( मू. ) रामचन्द्रं भजे. ' ॥ ३२ ॥

---

१ इंद्रनीळ मण्यासारखी व मेघासारखी नीलवर्ण अंगकांति ज्याची, असा. २ विराध इत्यादि राक्षसांच्या वधेंकरून. ३ लोकांत शांति केली ज्यानें, अशा. ४ मुकुटादिकांच्या योगें शोभणाऱ्या. ५ शंकराला लाभ वाटला जो, अशा. ६ शोभतो कोटि चंद्रांप्रमाणें प्रकाश ज्याचा अशा उत्तम सिंहासनावर. ७ मांडीवर. ८ चकचकणाऱ्या सुवर्णासारखी कांति जिची अशा. ९ विजेच्या राशीप्रमाणें कांतियुक्त. १० बसवून. १० दूर झालीं पीडा व आळस हीं ज्यापासून, अशा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तसें ह्या तुझ्या उत्तम सिंहासनाचें तेज दिसतें. तूं ह्या सिंहासनावर अंकीं सीतेला घेऊन बसला आहेस. सीतेचा वर्ण सोन्यासारखा देदीप्यमान दिसतो; तिजकडे पाहिलें असतां, ही विद्युल्लतांची रास आहे कीं काय, असा भास पडतो. रामा! दुःख आणि आळस तुजपासून निरंतर दूर राहतात ( तूं नित्य प्रकाशरूपी आहेस ). मी तुझ्या सेवेस तत्पर आहें. " ॥ ३२ ॥ पार्वतीसह भगवान् शंकर विमानांत बसून आकाशमार्गी आले होते. इंद्राची स्तुति आटोपल्यावर, ते ( शंकर ) कमलदलनयन रघुवीराला ह्मणाले :– ॥ ३३ ॥ ' रामचंद्रा ! अयोध्येमध्यें तुला राज्याभिषेक व्हावयाचा, तो समारंभ पाहण्यासाठीं मी तिकडे येणार आहें. सध्यां तूं आपल्या ह्या देहाच्या जनकाचें ( दशरथाचें ) दर्शन घे. ' ॥३४॥ इतक्यांत, अग्रभागीं विमानांत बसून आलेला दशरथ रामचंद्राच्या दृष्टीस पडला. रामानें कनिष्ठ बंधूसह मोठ्या आनंदानें भक्तिपूर्वक

ततः प्रोवाच भगवान्भवान्या सहितो भवः॥ रामं कमलपत्राक्षं विमानस्थो नभःस्थले ॥ ३३ ॥ आगमिष्याम्ययोध्यायां द्रष्टुं त्वां राज्यसत्कृतम् ॥ इदानीं पश्य पितरमस्य देहस्य राघव ॥ ३४ ॥ ततोऽपश्यद्विमानस्थं रामो दशरथं पुरः ॥ ननाम शिरसा पादौ मुदा भक्त्या सहानुजः ॥ ३५ ॥

( पू. ) नभस्थले विमानस्थः [ सन् ] ( मू. ) रामं प्रोवाच – ॥ ३३ ॥ ' राघव, राज्यसत्कृतं त्वां द्रष्टुं, अयोध्यायां ( मू. ) पितरं पश्य. ' ॥ ३४ ॥ ततः सहानुजः रामः ( पू. ) अपश्यत्, पादौ ( मू. ) ननाम. ॥ ३५ ॥

१ पार्वतीशीं. २ शंकर. ३ आकाशांत. ४ विमानांत बसलेला. ५ पित्याला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पित्याच्या चरणांला शिरसा वंदन केलें. ॥ ३५ ॥ दशरथानें रामाला आलिंगन दिलें व मस्तक हुंगून ह्म-टलें :– 'वत्सा ! तूं मला संसाररूप दुःखसमुद्रांतून पार पाडिलेंस.' ॥ ३६ ॥ इतकें बोलून दशरथानें रामाला पुन्हां पोटाशीं धरिलें. रामानें त्याची पूजा केली. दशरथ परत निघून गेला. इकडे देवेंद्र रामापुढें हात जोडून उभा होता; त्याला रामानें सांगितलें :– ॥ ३७ ॥ 'सहस्राक्षा ! युद्धामध्यें मजकरितां अनेक वानर मरण पावून भूमीवर पडले आहेत. तूं माझ्या आज्ञेस्तव अमृतवृष्टि करून लवकर त्यांना जीवंत कर. ॥ ३८ ॥ इंद्रानें 'बरें आहे' असें ह्मणून अमृतवृष्टीच्या योगें त्या वानरांना जीवंत केलें. पूर्वी युद्धांत जे

आलिंग्य मूर्ध्न्यवघ्राय रामं दशरथोऽब्रवीत् ॥ तारितोऽस्मि त्वया वत्स संसा-
राद्दुःखसागरात् ॥ ३६ ॥ इत्युक्त्वा पुनरालिंग्य ययौ रामेण पूजितः ॥ रामोऽपि
देवराजं तं दृष्ट्वा प्राह कृताञ्जलिम् ॥ ३७ ॥ मत्कृते निहतान्संख्ये वानरान्प-
तितान् भुवि ॥ जीवयाशु सुधावृष्ट्या सहस्राक्ष ममाज्ञया ॥ ३८ ॥ तथेत्यमृतवृष्ट्या
तान् जीवयामास वानरान् ॥ ये ये मृधे हताः पूर्वं ते ते सुप्तोत्थिता इव ॥

दशरथः रामं (पू.) – ॥ 'वत्स, त्वया [अहं] (मू.) संसारात् तारितः अस्मि.' ॥ ३६ ॥ [दशरथः] (पू.) [सन्] ययौ. ॥ (मू.) देवराजं दृष्ट्वा प्राह – ॥ ३७ ॥ '(उ.) मत्कृते, सङ्ख्ये (पू.) पतितान् वानरान् सुधावृष्ट्या आशु जीवय.' ॥ ३८ ॥ [इन्द्रः] 'तथा' इति [उक्त्वा] (पू.) जीवयामास. ॥ पूर्वं मृधे (द्वि.) ॥

१ माझ्यासाठीं. २ युद्धांत. ३ अमृतवृष्टीच्या योगें. ४ लवकर. ५ जिवंत कर. ६ युद्धांत. ७ निजून उठलेले.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

जे वानर मेले होते, ते ते झोंपेंतून जागे झाल्याप्रमाणें उठून पहिल्यासारखे बलाढ्य होत्साते आनंदानें रामाजवळ आले. ॥३९॥ त्याठिकाणीं राक्षस मात्र अमृताचा स्पर्श झाला तरी उठले नाहींत. विभीषणानें साष्टांग प्रणाम करून भाषण केलें :– ॥ ४० ॥ 'देवा ! - माझी तुजपाशीं एक विनंति आहे; व - ज्या अर्थी तुझें मजवर प्रेम आहे त्या अर्थी तूं ती मान्य करण्याचा अनुग्रह करावास :– आज तूं सीतेसह मंगलस्नान कर, ॥ ४१ ॥ व आंगावर वस्त्रें भूषणें घाल. लक्ष्मणालाही तसें करण्यास अनुमोदन दे. मग उद्यां आपण सगळेजण - अयोध्येकडे - जाऊं.' विभीषणाची विनंति ऐकिल्यावर रघुनायकानें उत्तर दिलें :– ॥ ४२ ॥ 'विभीषणा ! माझा परम भक्त सुकुमार भरत माझी वाट पाहत राहिला आहे. तो जटावल्कलें धारण क-

पूर्ववद्बलिनो दृष्टा रामपार्श्वमुपाययुः ॥ ३९ ॥ नोत्थिता राक्षसास्तत्र पीयूषस्पर्शनादपि[1] ॥ विभीषणस्तु साष्टांगं प्रणिपत्याब्रवीद्वचः ॥ ४० ॥ देव मामनुगृह्णीष्व[2] मयि भक्तिर्यदा तव ॥ मंगलस्नानमद्य त्वं कुरु सीतासमन्वितः ॥ ४१ ॥ अलंकृत्य[3] सह भ्रात्रा श्वो गमिष्यामहे वयम् ॥ विभीषणवचः श्रुत्वा प्रत्युवाच रघूत्तमः ॥ ४२ ॥ सुकुमारोऽतिभक्तो मे भरतो मामवेक्षते ॥

( मू. ) [ सन्तः ] रामपार्श्वं उपाययुः. ॥ ३९ ॥ तत्र ( पू. ) न उत्थिताः. ( मू. ) ॥ अब्रवीत् – ॥ ४० ॥ 'देव, यदा मयि तव भक्तिः, [ तत् ] ( पू. ). ॥ सीतासमन्वितः त्वं अद्य ( मू. ). ॥ ४१ ॥ वयं भ्रात्रा सह ( पू. ).' ॥ रघूत्तमः ( मू. ) – ॥ ४२ ॥ 'सुकुमारः मे ( पू. )

१ अमृतस्पर्शानें. २ कृपा कर. ३ अलंकार घालून.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

' वानरांचा सत्कार ती माझी पूजा.

रून शब्दब्रह्माचा ( ॐकाराचा ) जप व चिंतन करण्यांत निमग्न असतो. ॥ ४३ ॥ त्याला बरोबर घेतल्या-शिवाय मी मंगलस्नान करणें किंवा अलंकारादि घालणें योग्य होईल काय! ह्मणून - मी तुला सांगतों कीं, - तूं सुग्रीवप्रभृति वानरांचा पुष्कळपणें सत्कार कर. ॥ ४४ ॥ वानरवीरांची पूजा केलीस कीं त्यांत माझा सत्कार झालाच, ह्याबद्दल संशय नलगे.' रामानें असें सांगितलें, तेव्हां बिभीषणानें सुवर्ण, रत्नें व वस्त्रें ह्यांचा वानरांवर नुसता पाऊस पाडला — ज्यांना जितकीं पाहिजेत तितकीं व जशीं आवडलीं तशीं रत्नें, भूषणें व वस्त्रें दिलीं. ॥ ४५ ॥ सर्व वानरसेनापतींचा रत्नभूषणांच्या योगें सत्कार केला असें पाहून रघुवीरानें व्यवहारास अनुस-

जटावल्कलधारी स शब्दब्रह्मसमाहितः ॥ ४३ ॥ कथं तेन विना स्नानमलंकारादिकं मम ॥ अतः सुग्रीवमुख्यांस्त्वं पूजयाशु विशेषतः ॥ ४४ ॥ पूजितेषु कपीन्द्रेषु पूजितो ऽहं न संशयः ॥ इत्युक्तो राघवेणाशु स्वर्णरत्नाम्बराणि च ॥४५॥ ववर्ष राक्षसश्रेष्ठो यथाकामं यथारुचि ॥ ततस्तान्पूजितान्दृष्ट्वा रामो रत्नैश्च यूथपान् ॥ ४६ ॥ अभिनन्द्य यथान्यायं विससर्ज हरीश्वरान् ॥

( मू. ) भरतः मां अवेक्षते. ॥ ४३ ॥ मम (पू.) च कथं ? ॥ अतः त्वं ( मू. ) आशु पूजय. ॥ ४४ ॥ कपीन्द्रेषु पूजितेषु [ सत्सु ], अहं ( ४५ पू. ) न. ॥ राघवेण इति उक्तः राक्षसश्रेष्ठः ( ४५ उ. ४६ पू. ) ववर्ष. ॥ ततः रामः तान् यूथपान् ( मू. ) ॥४५॥४६॥ यथान्यायं (४७पू.) विससर्ज. ॥

१ शब्दब्रह्माच्या ( ॐकाराच्या) ठिकाणीं एकाग्र ध्यान लावून असलेला. २ वाट पाहतो. ३ सुवर्ण, रत्नें, व वस्त्रें. ४ यथेच्छ. ५ आवडीप्रमाणें. ६ वृष्टि करिता झाला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रून योग्यतेनुसार त्यांचें गौरव केलें ( त्यांनीं केलेल्या पराक्रमांबद्दल प्रत्येकाची वेगवेगळी प्रशंसा केली ) व वानरवीरांना निरोप दिला. विभीषणानें सूर्यासारखें तेजःपुंज पुष्पक विमान आणविलें. ॥ ४६ ॥ ४७ ॥ राम त्या अत्युत्तम विमानांत चढून जानकीला अंकावर घेऊन बसला. ती सुकीर्तिमती जानकी - ह्या वेळीं चार लोकांसमक्ष पतीच्या जवळ बसावें लागल्यामुळें स्त्रीस्वभावास अनुसरून - लाजत होती. ॥ ४८ ॥ जवळच पराक्रमशाली धनुर्धारी लक्ष्मण बसला. - बाकी सर्व मंडळी भूमीवर उभी होती. - विमानांत आरोहण केल्यावर रामानें वानर, वानरांचा राजा सुग्रीव, अंगद व विभीषण ह्या सर्वांना सांगितलें :– 'वीरांनो ! तुह्मी वानरांच्या साह्यानें मित्राचें ( माझें ) कार्य पूर्ण केलें. ॥ ४९ ॥ ५० ॥ आतां मी तुह्मांला अनुज्ञा देतों कीं,

विभीषणसमानीतं पुष्पकं सूर्यवर्चसम् ॥ ४७ ॥ आरुरोह ततो रामस्तद्विमान-
मनुत्तमम् ॥ अंके निधाय वैदेहीं लज्जमानां यशस्विनीम् ॥ ४८ ॥ लक्ष्मणेन
सह भ्रात्रा विक्रान्तेन धनुष्मता ॥ अब्रवीच्च विमानस्थः श्रीरामः सर्ववानरान्
॥४९॥ सुग्रीवं हरिराजं च अंगदं च विभीषणम् ॥ मित्रकार्यं कृतं सर्वं भवद्भिः
सह वानरैः ॥ ५० ॥ अनुज्ञाता मया सर्वे यथेष्टं गन्तुमर्हथ ॥

ततः रामः ( ४७ उ. ४८ पू. ) पुष्पकं विमानं आरुरोह. ( मू. ) ॥ वैदेहीं अंके निधाय [अतिष्ठत्]. ॥ ४७ ॥ ४८ ॥ ( ४९ पू. ) लक्ष्मणेन सह ( ४९ उ. ५० पू. ) च अब्रवीत् – ॥ ' भवद्भिः, वानरैः सह सर्वं ( मू. ). ॥ ४९ ॥ ५० ॥ अनुज्ञाताः मया सर्वे [ यूयं ] ( मू. ) ॥

---

१ सूर्यासारखें तेजःपुंज. २ अत्युत्तम. ३ मांडीवर. ४ घेऊन. ५ लाजणाऱ्या. ६ सुकीर्तिसंपन्न. ७ गाजविला पराक्रम ज्यानें, अशा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तुह्मी स्वेच्छेनें आपआपल्या स्थानीं गमन करा. सुग्रीवा! तूं आपल्या सेनेला बरोबर घेऊन लवकर किष्किंधेस जा. ॥ ५१ ॥ विभीषणा! तूं आपल्या राज्याचा उपभोग घेत लंकेमध्यें सुखानें राहा. तुझी मजवर भक्ति आहे, त्या अर्थी इंद्रासह देवांच्यानेंदेखील तुझें कांहीं वांकडें करवणार नाहीं. ॥ ५२ ॥ आतां माझ्या मनांत आपल्या पित्याच्या राजधानीस–अयोध्येस–जावें अशी इच्छा आहे.' रामानें असें सांगितलें असतां, ते महापराक्रमी वानर ॥ ५३ ॥ व राक्षस विभीषण असे सर्वजण हात जोडून ह्मणाले :– 'रघुवीरा! आमच्या मनांत तुजबरोबर अयोध्येस यावयाचें आहे. ॥ ५४ ॥ तुला राज्याभिषेक झाला असें डो-

सुग्रीव प्रतियाह्याशु किष्किन्धां सर्वसैनिकैः ॥ ५१ ॥ स्वराज्ये वस लंकायां मम भक्तो विभीषण ॥ न त्वां धर्षयितुं शक्ताः सेन्द्रा अपि दिवौकसः ॥ ५२ ॥ अयोध्यां गन्तुमिच्छामि राजधानीं पितुर्मम ॥ एवमुक्तास्तु रामेण वानरास्ते महाबलाः ॥ ५३ ॥ ऊचुः प्राञ्जलयः सर्वे राक्षसश्च विभीषणः ॥ अयोध्यां गन्तुमिच्छामस्त्वया सह रघूत्तम ॥ ५४ ॥ दृष्ट्वा त्वामभिषिक्तं तु कौसल्यामभिवाद्य[3] च ॥

(मू.) [सह] आशु किष्किन्धां प्रतियाहि[1]. ॥ ५१ ॥ विभीषण, [त्वं] मम भक्तः [सन्] (पू.) वस. ॥ (मू.) त्वां धर्षयितुं[2] न शक्ताः. ॥ ५२ ॥ मम पितुः राजधानीं (पू.).' ॥ रामेण (मू.) वानराः, ॥ ५३ ॥ (पू.) च सर्वे प्रांजलयः [सन्तः] ऊचुः – ॥ 'रघूत्तम, त्वया सह (मू.) ॥ ५४ ॥ प्रभो, अभिषिक्तं त्वां (पू.) ॥

१ परत जा. २ भिवविण्यास. ३ वंदन करून.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ळ्यांनीं पाहूं, कौसल्येला वंदन करूं, आणि नंतर आह्मी आपआपल्या राज्यांकडे जाऊं. प्रभो ! एवढें करण्यास आह्मांला अनुज्ञा दे. ॥ ९९ ॥ रामानें 'बरें आहे' ह्मणून सुग्रीवाला सांगितलें :– 'सुग्रीवा ! तूं; वानरमंडळी, विभीषण व हनुमान अशा सगळ्यांना बरोबर घेऊन लवकर पुष्पकविमानांत बस.' ॥९६॥ तेव्हां सैन्यासह सुग्रीव व प्रधानांसह विभीषण असे सगळेजण भराभर त्या दिव्य पुष्पकविमानांत चढले. ॥९७॥ सगळे वानर चढून बसल्यावर, रामानें कुबेराच्या त्या उत्तम विमानाला निघण्याची आज्ञा दिली; तत्क्षणीं तें आकाशमार्गानें चालूं लागलें. ॥ ९८ ॥ त्या तेजस्वी विमानाला - ब्रह्मदेवाच्या विमानाप्रमाणें

पश्चाद्वृणीमहे राज्यमनुज्ञां देहि नः प्रभो ॥ ५५ ॥ रामस्तथेति सुग्रीव वानरैः सविभीषणः ॥ पुष्पकं सहनूमांश्च शीघ्रमारोह सांप्रतम् ॥५६॥ ततस्तु पुष्पकं दिव्यं सुग्रीवः सह सेनया ॥ विभीषणश्च सामात्यः सर्वे चारुरुहुर्द्रुतम् ॥ ५७ ॥ तेष्वारूढेषु सर्वेषु कौबेरं[8] परमासनम्[9] ॥ राघवेणाभ्यनुज्ञातमुत्पपात विहायसा ॥ ५८ ॥
बभौ तेन विमानेन हंसयुक्तेन भास्वता ॥

( मू. ) वृणीमहे[1]. नः अनुज्ञां[2] देहि[3].' ॥५५ ॥ रामः 'तथा' इति [ उक्त्वा आह – ] '( मू. ) [ त्वं ] साम्प्रतं वानरैः सह पुष्पकं शीघ्रं आरोह[4].' ॥ ५६ ॥ ( पू. ) सामात्यः[5] ( मू. ) सेनया सह दिव्यं पुष्पकं द्रुतं आरुरुहुः[6]. ॥ ५७ ॥ तेषु सर्वेषु आरूढेषु[7] [ सत्सु ], ( मू. ) [ सत् ] विहायसा उत्पपात. ॥ ५८ ॥ तदा प्रहृष्टः रामः ( पू. ) विमानेन

---

१ स्वीकारूं. २ अनुमोदन. ३ दे. ४ चढ. ५ मंत्र्यांसह. ६ चढले. ७ चढलेले. ८ कुबेराचें. ९ उत्तम विमान.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पुष्पकविमान चालूं लागलें.

पुढें - हंस जोडिला होता. ह्मणून आंत बसलेला आनंदमूर्ति राम ह्या वेळीं प्रतिब्रह्मदेव दिसूं लागला. ॥ ५९ ॥ कुबेरानें तीव्र तपश्चर्या करून मिळविलेलें तें विमान त्या वेळीं सूर्यबिंबाप्रमाणें शोभत होतें. आंत सीतालक्ष्मणांसह राम बसला असल्यामुळें तर त्याला ( विमानाला ) अवर्णनीय शोभा आली होती. ॥ ६० ॥

॥ इति श्रीमदध्यात्मरामायणार्थबोधे युद्धकाण्डे त्रयोदशः सर्गः ॥ १३ ॥

सीतेचें मुख चंद्रासारखें शांत, सुंदर व रमणीय दिसे. विमान चालू झाल्यावर राम चहूंकडे दृष्टि फिरवून जानकीला सांगूं लागला :– ॥ १ ॥ 'प्रिये! ती पहा त्रिकूटपर्वताच्या शिखरावर वसलेली भव्य व

प्रहृष्टश्च तदा रामश्चतुर्मुख इवापरः॥ ५९ ॥ ततो बभौ भास्करबिम्बतुल्यं कुबेरयानं तपसाऽनुलब्धम् ॥ रामेण शोभां नितरां प्रपेदे सीतासमेतेन सहानुजेन ॥ ६० ॥ इति श्रीम० युद्ध० त्रयोदशः सर्गः ॥ १३ ॥ पातयित्वा ततश्चक्षुः सर्वतो रघुनन्दनः ॥ अब्रवीन्मैथिलीं सीतां रामः शशिनिभाननाम् ॥ १ ॥ त्रिकूटशिखराग्रस्थां पश्य लंकां महाप्रभाम् ॥

अपरः ( मू. ) बभौ. ॥ ५९ ॥ ( पू. ) कुबेरयानं भास्करबिम्बतुल्यं बभौ, ॥ ( मू. ) रामेण नितरां शोभां प्रपेदे. ॥ ६० ॥ इति त्रयोदशः सर्गः ॥ १३ ॥ ततः रघुनन्दनः रामः ( पू. ) पातयित्वा ( मू. ) सीतां अब्रवीत् – ॥ १ ॥ ' ( पू. ) लङ्कां पश्य. ॥

१ शोभला. २ अत्यंत. ३ पावलें. ४ फिरवून. ५ चंद्रासारखें मुख जिचें, अशा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तेजःपुंज लंकानगरी दिसत आहे! इकडे ही रणभूमि अवलोकन कर; येथें मांसाचा चिखल पडून पहा कसा रिबरिबाट झाला आहे तो! ॥ २ ॥ ह्या ठिकाणींच राक्षसांचें आणि वानरांचें दारुण युद्ध झालें, व येथेंच मी मारलेला राक्षसेश्वर रावण लोळत पडला आहे! ॥३॥ कुंभकर्ण, इंद्रजित् इत्यादि सगळ्या राक्षसांचा ह्या स्थलींच वध झाला. - प्रिये! तुझ्यासाठीं- मी अफाट जलराशीवर—महासागरावर—हा सेतु बांधिला बरें. ॥ ४ ॥ हें पहा महासागरांतील सेतुबंधनामक तीर्थ दिसूं लागलें. सगळें त्रैलोक्य ह्याला वंदन करितें. ॥ ५ ॥ हें परम पवित्र तीर्थ दर्शन घेतल्याबरोबर सकल पातकांचा नाश करितें. ह्या स्थलीं मीं रामेश्वरनामें शिवलिंगा-

एतां रणभुवं पश्य मांसकर्दमपंकिलाम् ॥ २ ॥ असुराणां प्लवंगानामत्र वैशसनं महत् ॥ अत्र मे निहतः शेते रावणो राक्षसेश्वरः ॥३॥ कुम्भकर्णेन्द्रजिन्मुख्याः सर्वे चात्र निपातिताः ॥ एष सेतुर्मया बद्धः सागरे सलिलाशये ॥ ४ ॥ एतच्च दृश्यते तीर्थं सागरस्य महात्मनः ॥ सेतुबन्धमिति ख्यातं त्रैलोक्येन च पूजितम् ॥ ५ ॥ एतत्पवित्रं परमं दर्शनात्पातकापहम् ॥

( मू. ) एतां रणभुवं पश्य. ॥ २ ॥ अत्र ( पू. ) [ च ] महत् वैशसनं [ जातं ]. ॥ ( मू. ) रावणः शेते. ॥ ३ ॥ ( पू. ). ॥ सलिलाशये सागरे ( मू. ). ॥ ४ ॥ महात्मनः सागरस्य [ सम्बन्धि ] ( मू. ) [ यत् ] एतत् तीर्थं दृश्यते, ॥ ५ ॥ [ तत् ] एतत् परमं ( पू. ) [ अस्ति ]. ॥

१ मांसाच्या चिखलानें रिबरिबीत झालेल्या. २ रणभूमीस. ३ दारुण युद्ध. ४ मारिलेला. ५ पडला आहे. ६ उदकसमूह.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ची स्थापना केली. ॥ ६ ॥ येथें विभीषण मंत्र्यांना बरोबर घेऊन मला शरण आला. ती पहा सुग्रीवाची राजधानी किष्किंधा; तिच्या भोंवतीं चित्रविचित्र वृक्षांचें अरण्य - कसें सुंदर दिसत आहे पाहिलेंस काय ?' ॥ ७ ॥ ( शंकर ह्मणाले :– पार्वति ! ) तेथें पोंचल्यावर सुग्रीवानें रामाच्या आज्ञेवरून सीतेची इच्छा पुरविण्यासाठीं तारा आदिकरून वानरांच्या स्त्रियांना बोलावून आणविलें. ॥ ८ ॥ त्या स्त्रियांना घेऊन तें विमान आकाशमार्गें सत्वर चालूं लागलें, असें पाहून राम सीतेला पुन्हां सांगूं लागला :– ' सीते ! हा पहा ऋष्यमूक पर्वत; येथें मी वालीचा वध केला. ॥९॥ हें पंचवटी स्थान; ह्या ठिकाणीं मी अनेक राक्षस मारिले.

अत्र रामेश्वरो देवो मया शम्भुः प्रतिष्ठितः ॥ ६ ॥ अत्र मां शरणं प्राप्तो मन्त्रिभिश्च विभीषणः ॥ एषा सुग्रीवनगरी किष्किन्धा चित्रकानना[1] ॥७॥ तत्र रामाज्ञया ताराप्रमुखा हरियोषितः[2] ॥ आनयामास सुग्रीवः सीतायाः प्रियकाम्यया[3] ॥ ८ ॥ ताभिः सहोत्थितं शीघ्रं विमानं प्रेक्ष्य[4] राघवः ॥ प्राह चाद्रिमृष्यमूकं पश्य वाल्यत्र मे हतः ॥ ९ ॥ एषा पञ्चवटी नाम राक्षसा यत्र मे हताः ॥

मया ( मू. ). ॥ ६ ॥ अत्र विभीषणः मन्त्रिभिः [ सह ] ( मू. ) किष्किन्धा सुग्रीवनगरी.' ॥ ७ ॥ तत्र ( उ. ) ( पू. ) आनयामास. ॥ ८ ॥ राघवः ( पू. ) शीघ्रं प्रेक्ष्य, [ सीतां ] प्राह – ' ऋष्यमूकं ( मू. ) वाली हतः. ॥ ९ ॥ ( पू. ) राक्षसाः हताः. ॥

१ विचित्र अरण्य जीजवळ, अशा. २ वानरस्त्रियांना. ३ प्रिय करण्याच्या इच्छेनें. ४ पाहून.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

हे पहा हिकडे सुंदर दोन आश्रम दिसत आहेत; हा अगस्त्यमुनींचा व हा दुसरा सुतीक्ष्णऋषीचा. ॥ १० ॥ सुंदरि ! हे पहा सगळे ओळखीचे ऋषि दिसूं लागले. देवि ! हा श्रेष्ठ पर्वत चित्रकूट स्पष्ट दिसत आहे; ॥११॥ येथेंच कैकेयीचा पुत्र (भरत) मला प्रसन्न करून घेण्यासाठीं आला होता. सीते ! तो पहा यमुनेच्या तीरावर भरद्वाजमुनींचा आश्रम दिसूं लागला. ॥ १२ ॥ ही सर्व जगाला पवित्र करणारी भागीरथी गंगा दिसूं लागली ! सीते ! ती पहा आपली सरयू नदी दिसत आहे; तिच्या तीरावर यज्ञस्तंभांच्या कशा ओळी लागल्या आहेत - पाहिल्यास काय ? - ॥ १३ ॥ ती आपली अयोध्यानगरी दिसूं लागली ! हे मानिनि

अगस्त्यस्य सुतीक्ष्णस्य पश्याश्रमपदे शुभे ॥ १० ॥ एते ते तापसाः सर्वे दृश्यन्ते वरवर्णिनि[1] ॥ असौ शैलवरो[2] देवि चित्रकूटः प्रकाशते ॥ ११ ॥ अत्र मां कैकयी-पुत्रः प्रसादयितुमागतः[3] ॥ भरद्वाजाश्रमं पश्य दृश्यते यमुनातटे ॥ १२ ॥ एषा भागीरथी गंगा दृश्यते लोकपावनी ॥ एषा सा दृश्यते सीते सरयूर्यूपमालिनी[4] ॥ १३ ॥ एषा सा दृश्यते ऽयोध्या प्रणामं कुरु भामिनि ॥

( मू. ) [ च ] शुभे आश्रमपदे पश्य. ॥ १० ॥ वरवर्णिनि, ते एते सर्वे ( पू. ). ॥ देवि, ( मू. ). ॥ ११ ॥ कैकेयीपुत्रः ( मू. ) [ अयं ] यमुनातटे दृश्यते. ॥ १२ ॥ ( पू. ) गङ्गा दृश्यते. ॥ सीते, ( मू. ) सरयूः दृश्यते. ॥ १३ ॥ भामिनि, एषा सा अयोध्या ( पू. ). ' ॥

---

१ उत्तम शरीरवर्ण जिचा, अशी. २ श्रेष्ठ पर्वत. ३ संतुष्ट करण्यास. ४ यज्ञस्तंभांच्या माळा जिच्या तीरावर, अशी.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

( जानकि )! हिला नमस्कार कर.' ( शंकर म्हणाले :– पार्वति ! ) अशा क्रमानें परमात्मा रामचंद्र भरद्वाजाच्या आश्रमीं येऊन पोंचला. ॥ १४ ॥ चवदावें वर्ष बरोबर पूर्ण झालें त्या दिवशीं पंचमी तिथीला कनिष्ठबंधूसह प्रभु रघुवीरानें भरद्वाजमुनींचें दर्शन घेऊन त्यांना वंदन केलें. ॥ १५ ॥ मुनि आश्रमांत स्वस्थपणें बसले होते. रामचंद्रानें नम्रपणें त्यांना विचारिलें :– 'महाराज ! भरताकडील कांहीं वर्तमान आपल्या कानीं आलें आहे काय? तो भावा( शत्रुघ्ना )सह खुशाल आहे ना? ॥ १६ ॥ अयोध्येंत सर्वप्रकारें समृद्धि व शांतता असेलच ! बरें, पण आमच्या माता जीवंत आहेत ना ?' रामाचें भाषण ऐकिल्यावर भरद्वाजाच्या अंतःकरणाला आनंद आला; त्यानें ॥ १७ ॥ उत्तर दिलें :– "रामा, सर्व मंडळी खुशाल आहे !

एवं क्रमेण संप्राप्तो भरद्वाजाश्रमं हरिः ॥ १४ ॥ पूर्णे चतुर्दशे वर्षे पञ्चम्यां रघुनन्दनः ॥ भरद्वाजं मुनिं दृष्ट्वा ववन्दे सानुजः प्रभुः ॥ १५ ॥ पप्रच्छ मुनिमासीनं विनयेन रघूत्तमः ॥ शृणोषि कच्चिद्भरतः कुशल्यास्ते सहानुजः ॥ १६ ॥ सुभिक्षा वर्तते ऽयोध्या जीवन्ति च हि मातरः ॥ श्रुत्वा रामस्य वचनं भरद्वाजः प्रहृष्टधीः ॥ १७ ॥ प्राह सर्वे कुशलिनो भरतस्तु महामनाः ॥

हरिः ( मू. ) सम्प्राप्तः. ॥ १४ ॥ प्रभुः सानुजः रघुनन्दनः ( पू. ) पूर्णे [ सति ], पञ्चम्यां ( मू. ) ॥ १५ ॥ रघूत्तमः आसीनं ( पू. ) पप्रच्छ – ॥ ' सहानुजः (मू.) [इति] शृणोषि कच्चित्? ॥१६॥ अयोध्या ( पू. ) च जीवन्ति [ किं ]?' ॥ रामस्य वचनं (मू.) भरद्वाजः ॥ १७ ॥ प्राह – (पू.) ॥

१ ऐकतोस. २ काय बरें. ३ अन्नोदकपरिपूर्ण.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

भरताचें अंतःकरण उदात्त खरें! तो केवळ फळें व मुळें भक्षण करून निर्वाह चालवितो व जटावल्कलें धारण करून ॥ १८ ॥ आणि पादुकांवर सकल राज्यभार ठेवून ( राज्यांतील सगळ्या कारभाराच्या गोष्टी पादुकांना निवेदन करून ) तुझी वाट पाहत राहिला आहे. रघुनंदना! तूं दंडकारण्यांत जें जें चरित्र केलेंस, ॥ १९ ॥ – प्रथम सीतेला रावणाकडून नेवविलेंस पुढें राक्षसांचा वध केलास – तें सगळें मला तपश्चर्येच्या प्रभावामुळें व तुझ्या अनुग्रहानें कळून आलें. रामा! ॥ २० ॥ तूं साक्षात् परब्रह्मरूप आहेस. तुला आदि, मध्य किंवा अंत नाहींत. तूं सृष्टीच्या प्रारंभीं उदक उत्पन्न करून त्यांत, राहिला होतास, - ह्मणून तुला 'नारायण' असें ह्मणतात. - सृष्टीचा उत्पादक तूंच. ॥२१॥ हे विश्वरूपा! तूं नरांचा अंतर्या-

फलमूलकृताहारो जटावल्कलधारकः ॥ १८ ॥ पादुके सकलं न्यस्य राज्यं त्वां सुप्रतीक्षते ॥ यद्यत्कृतं त्वया कर्म दण्डके रघुनन्दन ॥ १९ ॥ राक्षसानां विनाशं च सीताहरणपूर्वकम् ॥ सर्वं ज्ञातं मया राम तपसा ते प्रसादतः ॥ २० ॥ त्वं ब्रह्म परमं साक्षादादिमध्यान्तवर्जितं॥त्वमग्रे[2] सलिलं सृष्ट्वा[3] तत्र सुप्तो[4] ऽसि भूतकृत् ॥ २१ ॥ नारायणो[5] ऽसि विश्वात्मन्नराणाम[6]न्तरात्मकः ॥

( मू. ) भरतः ॥ १८ ॥ ( पू. ) न्यस्य, त्वां सुप्रतीक्षते. ॥ रघुनन्दन, त्वया दन्डके ( मू. ) कृतं, ॥ १९ ॥ राम, [ तत् ] सर्वं ( पू. ) राक्षसानां विनाशं [ कर्म ] ( मू. ) च ज्ञातं. ॥ २० ॥ ( पू. ) परमं ब्रह्म. ॥ भूतकृत ( मू. ). ॥ २१ ॥ ( पू. ) नारायणः असि. ॥

---

१ वाट पाहतो. २ उदक. ३ उत्पन्न करून. ४ निजलेला. ५ नार ह्मणजे उदकाचा समूह अयन ह्मणजे आश्रय ज्याचा, उदकांत राहणारा. ६ नार म्हणजे जीवसमूह अयन ह्मणजे वसतिस्थान ज्याचें असा. ७ अंतर्यामिरूपी.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

भरद्वाजांनीं केलेली रामस्तुति.

मी आहेस ह्मणूनही तुला 'नारायण' असें ह्मणतात. सर्व लोकांचा पितामह (आजोबा) ब्रह्मदेव तुझ्या नाभिकमलापासून उत्पन्न झाला. ॥ २२ ॥ एतावता, तूं चतुर्दश भुवनांचा नियामक आहेस. सर्व लोक तुला नमस्कार करितात. तूं विष्णूचा अवतार; जानकी लक्ष्मी; व शेष हा लक्ष्मणनांवानें अवतरला आहे. ॥ २३ ॥ तूं आत्म्याच्या योगें आत्म्याच्या आश्रयावरच आपल्या मायेकडून ही सृष्टि करवितोस; तथापि, जसें आकाश सर्वत्र भरलें असूनही कोठें गुंतलेलें किंवा चिकटलेलें नाहीं, तसा तूं कोठेंही आसक्त नसतोस. तूं आपल्या ज्ञानशक्तीच्या योगें जगांतील सर्व कर्में प्रत्यक्ष पाहतोस. ॥ २४ ॥ रघुनंदना! तूं प्राण्यांच्या अंतरीं व बाहेर भरून राहिला आहेस, तथापि ज्यांच्या दृष्टींत अज्ञान असतें, त्या लोकांना नियमित आकाराचा (साडेतीन हात शरीराचा) भासतोस. ॥ २५ ॥ जगत् तूंच; जगाचा आधार तूंच; जगाचा पालनकर्ता

त्वन्नाभिकमलोत्पन्नो ब्रह्मा लोकपितामहः ॥ २२ ॥ अतस्त्वं जगतामीशः सर्वलोकनमस्कृतः ॥ त्वं विष्णुर्जानकी लक्ष्मीः शेषोऽयं लक्ष्मणाभिधः ॥ २३ ॥ आत्मना सृजसीदं त्वमात्मन्येवात्ममायया ॥ न सज्जसे नभोवत्त्वं चिच्छक्त्या[1] सर्वसाक्षिकः[2] ॥२४॥ बहिरन्तश्च भूतानां त्वमेव रघुनन्दन ॥ पूर्णोऽपि मूढदृष्टीनां विच्छिन्न[5] इव लक्ष्यसे[6] ॥ २५ ॥ जगत्त्वं जगदाधारस्त्वमेव परिपालकः ॥

लोकपितामहः ब्रह्मा (मू.). ॥२२॥ (मू.) शेषः. ॥२३॥ त्वं आत्ममायया तत् इदं (पू.) सृजसि. ॥ (मू.) त्वं नभोवत्[3] [तत्र] न सज्जसे[4]. ॥२४॥ रघुनन्दन, भूतानां (मू.). ॥२५॥ जगत्पते, (पू.) ॥

१ ज्ञानशक्तीनें. २ सर्व गोष्टी प्रत्यक्ष पाहाणारा. ३ आकाशासारखा. ४ आसक्त होतोस. ५ मर्यादित. ६ भासतोस.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तूंच. हे जगन्नियंत्या ! सगळ्या सृष्टींतील उपभोगणारे पुरुष व उपभोग्य विषय तरी तूंच आहेस. ॥ २६ ॥ रघुकुलोत्तमा ! जगांत जें कांहीं दिसतें, ऐकूं येतें, किंवा आठवलें जातें, तें एकूणएक सगळें तूंच होस; तुजवांचून दुसरें कांहीं नाहीं. ॥ २७ ॥ - वास्तविक पाहूं गेलें तर तुजकडे सृष्टिकर्तृत्वादि गुण नाहींत; कारण, - माया आपल्या अहंकारादि गुणांच्या योगें लोकांना उत्पन्न करिते. पण, रामा ! त्या मायेला प्रेरणा मिळते तुझ्या शक्तीनें; ह्मणून स्रष्टृत्वादि गुण तुजवर आरोपिले जातात. ॥ २८ ॥ माया मूळची जड आहे ( तिला स्वतंत्रपणें कोणतेंही कार्य करतां येत नाहीं ); परंतु, जसें लोहचुंबक जवळ असला कीं लोखंड च-

त्वमेव सर्वभूतानां भोक्ता[1] भोज्यं[2] जगत्पते ॥ २६ ॥ दृश्यते[3] श्रूयते[4] यद्यत्स्मर्यते[5] वा रघूत्तम ॥ त्वमेव सर्वमखिलं त्वद्विना ऽन्यन्न किंचन ॥ २७ ॥ माया सृजति लोकांश्च स्वगुणैरहमादिभिः ॥ त्वच्छक्तिप्रेरिता[6] राम तस्मात्त्वय्युपचर्यते[7] ॥ २८ ॥ यथा चुम्बकसान्निध्याच्चलन्त्येवायआदयः[8] ॥ जडा तथा त्वया दृष्टा माया सृजति वै जगत् ॥ २९ ॥

[ च त्वं एव ]. ॥ २६ ॥ रघूत्तम, यत्, यत् ( पू. ), ॥ [ तत् ] सर्वं अखिलं ( मू. ) न. ॥२७॥ राम, त्वच्छक्तिप्रेरिता ( पू. ) लोकान् सृजति. ( मू. ). ॥ २८ ॥ यथा अयआदयः ( पू. ) चलन्ति[9], ॥ तथा ( मू. ) सृजति. ॥ २९ ॥

१ भोगणारा. २ भोगण्याचा विषय. ३ दिसतें. ४ ऐकूं येतें. ५ आठवलें जातें. ६ तुझ्या शक्तीनें प्रेरणा दिली जिला, अशी. ७ लादलें जातें. ८ लोखंड वगैरे. ९ हालतात.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ळवळ करूं लागतें, त्याप्रमाणें मायेवर तुझी दृष्टि पडली कीं ती जगत् उत्पन्न करूं शकते. ॥ २९ ॥ तूं वस्तुतः शरीररहित आहेस परंतु विश्वाच्या संरक्षणासाठीं दोन शरीरें स्वीकारितोस. :– विराट् तुझें स्थूल शरीर व हिरण्यगर्भ सूक्ष्म शरीर, असें ह्मणतात. ॥ ३० ॥ रघुकुमारा ! विराट् रूपापासून हे सहस्रावधि अवतार उत्पन्न होतात; व कार्यभाग आटोपल्यावर हे विराजामध्येंच प्रवेश करितात. ॥ ३१ ॥ रघुकुलोत्तमा ! जगामध्यें जे लोक केवळ तुजकडे मनें लावून तुझ्या अवतारकथा गातात किंवा वर्णन करितात, त्यांनाच मोक्ष प्राप्त होतो. ॥ ३२ ॥ राघवा ! ब्रह्मदेवानें तपश्चर्या करून तुला संतोषविलें व पृथ्वीचा भार उतरण्या-

देहद्वयमदेह[1]स्य तव विश्वं रि[2]रक्षिषोः ॥ विराट् स्थूलं शरीरं ते सूत्रं सूक्ष्ममुदाहृतम् ॥ ३० ॥ वि[4]राजः संभवन्त्येते अवताराः सहस्रशः ॥ कार्यान्ते प्रविशन्त्येव विराजं रघुनन्दन ॥ ३१ ॥ अवतारकथां लोके ये गायन्ति [6]गृणन्ति च ॥ अनन्यमनसो मुक्तिस्तेषामेव रघूत्तम ॥ ३२ ॥ त्वं ब्रह्मणा पुरा भूमेर्भारहाराय राघव ॥ प्रार्थितस्तपसा तुष्टस्त्वं जातो ऽसि रघोः कुले ॥ ३३ ॥

( पू. ) तव देह[3]द्वयं. ॥ ते स्थूलं शरीरं ( मू. ). ॥ ३० ॥ रघुनन्दन, ( पू. ) अवताराः सम्भवन्ति, ( मू. ) एव प्रवि[5]शन्ति. ॥ ३१ ॥ रघूत्तम, ये अनन्यमनसः लोके ( मू. ) मुक्तिः. ॥ ३२ ॥ राघव, ( मू. ) जातः असि. ॥ ३३ ॥

१ देहरहित, अशा. २ रक्षण करूं इच्छिणाऱ्या. ३ स्थूल व सूक्ष्म असे दोन देह. ४ विराट्रूपापासून. ५ शिरतात. ६ कथन करितात.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

साठीं तुझी प्रार्थना केली, ह्मणून तूं रघुकुलांत अवतार घेतलास. ॥ ३३ ॥ रामा ! - रावणाचा वध करणें - हें देवाचें काम फार कठिण होतें खरें, पण तूं पार पाडिलेंस. आतां पुढेंही तूं अनेक सहस्र वर्षेंपर्यंत हा मनुष्यदेह धारण करून ॥ ३४ ॥ स्वर्ग व मृत्यु ह्या उभय लोकांच्या कल्याणासाठीं दुर्घट कामें करीत राहशील, व कीर्तीच्या योगें सगळें जग व्यापून सोडशील. तुझीं चरित्रें लोकांचीं पापें दूर करितील. ॥ ३५ ॥ जगन्नाथा ! माझी तुजजवळ एवढी प्रार्थना आहे कीं, तूं माझा आश्रम पवित्र कर. आजचा दिवस सैन्यासह येथें राहा व भोजन कर; उद्यां नगरास जातां येईल. " ॥ ३६ ॥ राम 'बरें' ह्मणून त्या दिवशीं त्या उत्तम आश्रमांत राहिला. भरद्वाजमुनींनीं सीता, लक्ष्मण व सैन्य सर्वांसहित रामचंद्राचा सत्कार

देवकार्यमशेषेण कृतं ते राम दुष्करम् ॥ बहुवर्षसहस्राणि मानुषं देहमाश्रितः ॥ ३४ ॥ कुर्वन्दुष्करकर्माणि लोकद्वयहिताय च ॥ पापहारीणि भुवनं यशसा[1] पूरयिष्यसि[2] ॥ ३५ ॥ प्रार्थयामि जगन्नाथ पवित्रं कुरु मे गृहम् ॥ स्थित्वाऽद्य भुक्त्वा सबलः श्वो गमिष्यसि पत्तनम्[3] ॥ ३६ ॥ तथेति राघवोऽतिष्ठत्तस्मिन्नाश्रम उत्तमे ॥ ससैन्यः पूजितस्तेन सीतया लक्ष्मणेन च ॥ ३७ ॥

राम, ते दुष्करं ( मू. ). ॥ ३४ ॥ [ त्वं ] ( पू. ) पापहारीणि दुष्करकर्माणि कुर्वन् [ सन् ] (मू.). ॥ ३५ ॥ जगन्नाथ, ( पू. ) पवित्रं कुरु.॥ सबलः [ त्वं ] ( मू. ) गमिष्यसि. ' ॥ ३६ ॥ राघवः 'तथा' इति [ उक्त्वा ] ( पू. ) आश्रमे ( मू. ) [सहितः] तेन पूजितः [ सन् ] अतिष्ठत्. ॥ ३७ ॥

१ कीर्तीनें. २ भरून सोडशील. ३ नगरास.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

भरताकडे जासूद पाठविला.

केला. ॥ ३७ ॥ पुढें रामानें क्षणभर विचार करून मारुतीला सांगितलें :— हनुमंता ! तूं येथून लवकर अयोध्येस जा. ॥ ३८ ॥ राजवाड्यांतील सर्व मंडळी खुशाल आहे कीं नाहीं शोध घे. शृंगवेरपुरांत माझा मित्र गुह राहत असतो त्याला जाऊन सांग कीं, ॥ ३९ ॥ जानकी व लक्ष्मण उभयतांसह मी ( राम ) आलों आहें. हा निरोप कळविल्यावर तेथून नंदिग्रामांत जा. तेथें माझा भाऊ भरत आहे, ॥ ४० ॥ त्याला भेटून सांग कीं मी, माझी पत्नी व भाऊ सर्व खुशाल आहों. सीता रावणानें चोरून नेली, पुढें मी त्याचा वध केला इत्यादि ॥ ४१ ॥

ततो रामश्चिन्तयित्वा मुहूर्तं प्राह मारुतिम् ॥ इतो गच्छ हनूमंस्त्वमयोध्यां प्रति सत्वरः ॥ ३८ ॥ जानीहि कुशली कच्चिज्जनो नृपतिमन्दिरे ॥ शृंगवेरपुरं गत्वा ब्रूहि मित्रं गुहं मम ॥ ३९ ॥ जानकीलक्ष्मणोपेतमागतं मां निवेदय ॥ नन्दिग्रामं ततो गत्वा भरतं भ्रातरं मम ॥ ४० ॥ दृष्ट्वा ब्रूहि सभार्यस्य सभ्रातुः कुशलं मम ॥ सीतापहरणादीनि रावणस्य वधादिकम् ॥ ४१ ॥

ततः रामः मुहूर्तं ( पू. ) प्राह — ॥ ' हनूमन्, त्वं सत्वरः [सन्] ( मू. ) गच्छ. ॥ ३८ ॥ नृपतिमन्दिरे जनः ( पू. ) [ इति ] जानीहि. ॥ ( उ. ) [ कुशलं ] ब्रूहि. ॥ ३९ ॥ ( पू. ) आगतं निवेदय. ॥ ततः ( मू. ) भ्रातरं भरतं ॥ ४० ॥ ( पू. ) कुशलं ( मू. ) च ब्रूहि. ॥ ४१ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

सगळें माझें व भावाचें चरित्र क्रमानें त्याला निवेदन कर आणि शेवटीं सांग कीं, राम सकल शत्रुगणांला मारून, पत्नी व बंधु अशा उभयतांना बरोबर घेऊन॥ ४२॥आणि आपला कार्यभाग संपादून, मोठाले अस्वल व वानर यांसह इकडे येत आहे. असा वृत्तांत तेथें सांग, भरताचें चारित्र ॥ ४३ ॥ सगळें समजून घे आणि पुन्हां लवकर मजकडे ये. ' मारुतीनें 'ठीक आहे' ह्मणून लागलेंच तेथल्या तेथें मनुष्यासारखें शरीर धारण केलें. ॥ ४४ ॥ व, जसा गरुड मोठ्या सर्पाला धरण्यासाठीं वेगानें धांवतो, तसा मारुति वायूसारख्या

ब्रूहि क्रमेण मे भ्रातुः सर्वं तत्र विचेष्टितम् ॥ हत्वा शत्रुगणान्सर्वान्सभार्यः सह-लक्ष्मणः ॥ ४२ ॥ उपयाति समृद्धार्थः सह ऋक्षहरीश्वरैः ॥ इत्युक्त्वा तत्र वृत्तान्तं भरतस्य विचेष्टितम् ॥ ४३ ॥ सर्वं ज्ञात्वा पुनः शीघ्रमागच्छ मम सन्निधिम् ॥ तथेति हनुमांस्तत्र मानुषं वपुरास्थितः ॥ ४४ ॥ नन्दिग्रामं ययौ तूर्णं वायुवेगेन मारुतिः ॥ गरुत्मानिव वेगेन जिघृक्षन्भुजगोत्तमम् ॥ ४५ ॥

( पू. ) क्रमेण ब्रूहि. ॥ ( मू. ) [ रामः ] सर्वान् शत्रुगणान् हत्वा, ॥ ४२ ॥ समृद्धार्थः[1] [ सन् ] ( पू. ) सह उपयाति[2]. ॥ ( मू. ) [ च ] ॥ ४३ ॥ ( पू. ) आगच्छ. ' ॥ हनूमान् 'तथा' इति [उक्त्वा], ( मू. ). ॥ ४४ ॥ मारुतिः (उ.) जिघृक्षन्[3] गरुत्मान्[4] इव तूर्णं[5] वायुवेगेन (पू.). ॥ ४५ ॥

१ सिद्ध झालें प्रयोजन ज्याचें, असा. २ जवळ येतो. ३ धरूं इच्छिणारा. ४ गरुड. ५ जलद.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

वेगानें नंदिग्रामाकडे चालला. ॥ ४९ ॥ मारुतीनें प्रथम शृंगवेरपुरास जाऊन गुहाची भेट घेतली व आनंदित अंतःकरणेंकरून त्याला गोड वाटणारा निरोप सांगितला :- ॥ ४६ ॥ 'गुहा ! तुझा मित्र धर्मात्मा श्रीमान् दशरथपुत्र रामचंद्र खुशाल आहे. त्यानेंच तुला कुशलवार्ता कळविण्यासाठीं - मला इकडे पाठविलें.- ॥ ४७ ॥ रघुवीर आज भरद्वाजमुनींनीं अनुमोदन दिलें कीं इकडे येईल; मग तुला त्या रघुकुलोत्तम देवाचें दर्शन मिळेल.' ॥ ४८ ॥ महातेजस्वी मारुतीनें सांगितलेली - वार्ता ऐकिल्याबरोबर - आनंद झाल्यामुळें गुहाच्या आंगावर रोमांच उभे राहिले. महावेगवान् मारुति वायुवेगानें तेथून उडाला. ॥ ४९ ॥

शृंगवेरपुरं प्राप्य गुहमासाद्य[1] मारुतिः ॥ उवाच मधुरं वाक्यं प्रहृष्टेनान्तरात्मना ॥ ४६ ॥ रामो दाशरथिः श्रीमान्सखा ते सह सीतया ॥ सलक्ष्मणस्त्वां धर्मात्मा क्षेमी कुशलमब्रवीत् ॥४७॥ अनुज्ञातोऽद्य मुनिना भरद्वाजेन राघवः ॥ आगमिष्यति तं देवं द्रक्ष्यसि त्वं रघूत्तमम् ॥ ४८ ॥ एवमुक्त्वा महातेजाः संप्रहृष्टतनूरुहम्[2] ॥ उपपात महावेगो वायुवेगेन मारुतिः ॥ ४९ ॥

मारुतिः ( मू. ) मधुरं वाक्यं उवाच -- ॥ ४६ ॥ 'ते सखा ( मू. ) सीतया सह क्षेमी रामः त्वां कुशलं अब्रवीत्. ॥ ४७ ॥ भरद्वाजेन मुनिना अद्य ( पू. ) ॥ आगमिष्यति. त्वं ( मू. ) द्रक्ष्यसि.' ॥ ४८ ॥ महातेजाः ( बा. उ. ) ( पू. ) एवं उक्त्वा, वायुवेगेन उत्पपात. ॥ ४९ ॥

१ गांठून. २ आनंदानें आंगावर थरारले रोमांच ज्याच्या, अशा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

वाटेंत त्याला रामतीर्थ लागलें व महानदी सरयू दृष्टीस पडली. तिला उल्लंघून मारुति आनंदानें नंदिग्रामांत आला. ॥ ५० ॥ हें गांव अयोध्येच्या अलिकडे एक कोसावर आहे. तेथें वल्कलें व हरणाचें चर्म हीं वस्त्रें धारण करणारा, दीन आणि कृश झालेला आश्रमवासी भरत मारुतीच्या दृष्टीस पडला. ॥ ५१ ॥ भरताचें शरीर मळानें व चिखलानें आच्छादलेलें होतें; मस्तकावर जटा व आंगावर वल्कलरूप वस्त्रें होतीं; तो निर्वाहासाठीं फळें व मुळें खाऊन रामाचें ध्यान करण्यांत निमग्न असे, ॥ ५२ ॥ आणि त्या (पूर्वीं रामानें दिलेल्या) पादुकांची पूजा करून त्यांच्या आश्रयावर पृथ्वीचें राज्य चालवीत असे. - राजा वागेल तसें प्रधानांनीं वागावें : ह्या धर्माला अनुसरून - त्याचे मंत्री व नगरांतील मुख्य लोक काषाय (भगवीं) वस्त्रें

सो ऽपश्यद्रामतीर्थं च सरयूं च महानदीम् ॥ तामतिक्रम्य हनुमान्नन्दिग्रामं ययौ मुदा ॥ ५० ॥ क्रोशमात्रे[1] त्वयोध्यायाश्चीर[2]कृष्णाजिनाम्बरम् ॥ ददर्श भरतं दीनं कृशमाश्रम[3]वासिनम् ॥५१॥ मल[4]पंकविदिग्धांगं जटिलं[5] वल्कलाम्बरम् ॥ फलमूलकृताहारं रामचिन्तापरायणम् ॥ ५२ ॥ पादुके ते पुरस्कृत्य[6] शासयन्तं वसु[7]न्धराम् ॥ मन्त्रिभिः पौरमुख्यैश्च काषाया[8]म्बरधारिभिः ॥ ५३ ॥

(पू.), रामतीर्थं च अपश्यत्. ॥ हनुमान् (मू.) ययौ. ॥ ५० ॥ अयोध्यायाः (५१।५२ मू.) ॥ ते (५३ पू.) शासयन्तं ॥ (५३ मू.) मन्त्रिभिः पौरमुख्यैः च ॥

---

१ कोसभर [ अलिकडे ]. २ चिंध्या व हरिणचर्म हें वस्त्र ज्याचें, अशा. ३ मठांत राहाणाऱ्या. ४ मळानें व चिखलानें लिंपलें शरीर ज्याचें, अशा. ५ जटायुक्त. ६ पूजा करून. ७ पृथ्वीला. ८ भगवीं वस्त्रें धारण करणाऱ्या.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मारुति भरताला प्रियवार्ता सांगतो.

पांघरून॥५३॥भोंवतीं बसले होते. - त्याच्याकडे पाहिल्याबरोबर पाहणाराला - हा धर्म प्रत्यक्ष शरीर धारण करून येथें बसला आहे कीं काय, असें वाटे. वायुपुत्र हनुमान् हात जोडून त्याला सांगूं लागला :- ॥५४॥ 'भरता! तूं ज्या रामाचें ध्यान करीत आहेस व जो तापसवृत्ति स्वीकारून दंडकारण्यांत राहतो म्हणून तुला वाईट वाटत आहे, त्या राघवानें स्वतांची खुशाली कळविण्यासाठीं तुजकडे - मला पाठविलें आहे. - ॥५५॥ राजा! मी तुला प्रिय वार्ता सांगतों. तूं हा अतिभयंकर शोक सोडून दे. ह्या घटकेसच तुला तुझा भाऊ राम भेटेल! ॥ ५६ ॥ रामचंद्रानें युद्धांत रावणाचा वध केला व सीता परत मिळविली. सध्यां तो आपला कार्यभाग संपादून सीता आणि लक्ष्मण ह्या उभयतांसह जवळ येऊन पोंचला आहे.' ॥ ५७ ॥

वृ[1]तदेहं मूर्तिमन्तं साक्षाद्धर्ममिव स्थितम् ॥ उवाच प्राञ्जलिर्वाक्यं हनूमान्मारुतात्मजः ॥ ५४ ॥ यं त्वं चिन्तयसे रामं तापसं दण्डके स्थितम् ॥ अनुशोचसि का[2]कुत्स्थः स त्वां कुशलमब्रवीत् ॥ ५५ ॥ प्रियमा[3]ख्यामि ते देव शोकं त्यज सुदारुणम् ॥ अस्मिन्मुहूर्ते भ्राता त्वं रामेण सह संगतः ॥ ५६ ॥ समरे रावणं हत्वा रामः सीतामवाप्य च ॥ उपयाति समृद्धार्थः ससीतः सहलक्ष्मणः ॥५७॥

( ५४ पू. ) भरतं ददर्श. ॥ (५४ उ.) प्राञ्जलिः [सन्] वाक्यं उवाच - ॥ ५१ ॥ ५२ ॥ ५३ ॥ ॥ ५४ ॥ त्वं ( पू. ) रामं चिन्तयसे, ॥ अनुशोचसि च, सः ( मू. ). ॥ ५५ ॥ देव, ते ( पू. ) शोकं त्यज. ॥ त्वं ( मू. ) [ भविष्यसि ]. ॥ ५६ ॥ ( मू. ) रामः उपयाति.' ॥ ५७ ॥

१ वेष्टिला देह ज्याचा, असा. २ ककुत्स्थाच्या कुलांत जन्मलेला. ३ सांगतों.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

अशी वार्ता कळल्याबरोबर तो महातेजस्वी भरत आनंदातिशयामुळें मूर्च्छा येऊन भूमीवर पडला. कैकेयी-च्या त्या प्रिय पुत्राला देहभान नाहींसें झालें. ॥ ५८ ॥ - कांहीं वेळानें शुद्धीवर येऊन - भरतानें लागलीच प्रिय वार्ता सांगणाऱ्या मारुतीला घट्ट मिठी मारिली. ह्यावेळीं भरताच्या नेत्रांतून आनंदाश्रूंचे इतके पूर वाहूं लागले कीं, त्यांच्या योगें वानराचें ( मारुतीचें ) सर्वांग भिजलें ! ॥ ५९ ॥ भरताचे मारुतीजवळ पहिले उद्गार असे निघाले :– " बा ! माझ्यावर कृपा करून तूं येथें आलास तर तूं कोण देव आहेस का मनु-ष्यच आहेस ? तुझें दर्शन मला चंद्रासारखें सुखकर वाटतें. तूं प्रिय वार्ता सांगितलीस ह्मणून मी तुला कांहीं प्रिय देणगी देतों – ॥ ६० ॥ लक्ष गाई, शंभर उत्तम गांव व सर्व अलंकारांनीं सुभूषित केलेल्या सुंदर

एवमुक्तो महातेजा भरतो हर्षमूर्च्छितः[1] ॥ पपात भुवि चास्वस्थः कैकेयीप्रियन-न्दनः ॥ ५८ ॥ आलिंग्य भरतः शीघ्रं मारुतिं प्रियवादिनम् ॥ आनन्दजैरश्रु-जलैः सिषेच[2] भरतः कपिम् ॥५९॥ देवो वा मानुषो वा त्वमनुक्रोशादिहागतः ॥ प्रियाख्यानस्य ते सौम्य ददामि ब्रुवतः प्रियम् ॥६०॥ गवां शतसहस्रं च ग्रामाणां च शतं वरम् ॥ सर्वाभरणसंपन्ना मुग्धाः कन्यास्तु षोडश ॥ ६१ ॥

( मू. ) भरतः अस्वस्थः [ सन् ] भुवि पपात. ॥ ५८ ॥ ( पू. ) मारुतिं आलिङ्ग्य ॥ ( मू. ) [ आह – ] ॥ ५९ ॥ ' अनुक्रोशात् इह आगतः त्वं ( पू. ) ? ॥ ( मू. ) ब्रुवतः ते प्रियाख्यानस्य [ प्रतिप्रियं ] ददामि. ॥ ६० ॥ वरं ( मू. ) कन्याः च [ ददामि ]. ' ॥ ६१ ॥

---

१ हर्षानें मूर्छा आली ज्याला, असा. २ अभिषेक करिता झाला. ३ दयेस्तव ४ बोलणाऱ्या. ५ गोड गोष्टीला. ६ परत देणगी. ७ देतों.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

सोळा कन्या - घे. - " ॥ ६१ ॥ इतकें बोलून भरत पुन्हां मारुतीला ह्मणाला :– " राम अति विस्तीर्ण - घोर - अरण्यांत गेल्याला किती तरी वर्षें झालीं ! ॥ ६२ ॥ माझ्या मनाला संतोष देणारी धन्याची कुशल वार्ता - फार वर्षांनीं आज - मला ऐकायाला सांपडली ! लोकांत एक ह्मण प्रसिद्ध आहे तिचा खरेपणा आतां माझ्या प्रत्ययाला आला कीं, ॥ ६३ ॥ ' मनुष्य जीव धरून राहिला असतां शंभर वर्षांनीं तरी त्याला आनंदाचा दिवस उजाडतो. ' बरें, बा ! रामाची आणि वानरांची मैत्री जमली कशी, ॥ ६४ ॥ तो प्रकार मला सांग. तुझें कल्याण होवो. तुझ्या सांगण्यावर माझा विश्वास आहे. " महासमर्थ भरतानें असा



एवमुक्त्वा पुनः प्राह भरतो मारुतात्मजम् ॥ बहूनीमानि वर्षाणि गतस्य सुमहद्वनम् ॥ ६२ ॥ शृणोम्यहं प्रीतिकरं मम नाथस्य कीर्तनम् ॥ कल्याणी बत गाथेयं लौकिकी प्रतिभाति मे ॥ ६३ ॥ एति जीवन्तमानन्दो नरं वर्षशतादपि ॥ राघवस्य हरीणां च कथमासीत्समागमः ॥ ६४ ॥ तत्त्वमाख्याहि भद्रं ते विश्वसेयं वचस्तव ॥ एवमुक्तो ऽथ हनूमान् भरतेन महात्मना ॥ ६५ ॥

( ६२ पू. ) एवं उक्त्वा पुनः प्राह – ॥ "अहं ( ६२ उ. ) गतस्य, ॥ मम नाथस्य ( ६३ पू. ) ॥ शृणोमि. ( मू. ) गाथा मे कल्याणी प्रतिभाति बत– ॥ ६२ ॥ ६३ ॥ ' आनन्दः (पू.) एति. ' ॥ (मू.) कथं आसीत् ? ॥६४॥ (पू.) भद्रं. तव वचः विश्वसेयं." ॥ अथ महात्मना भरतेन (मू.)॥६५॥

१ ह्मण. २ सुंदर ( सत्य ). ३ जगणाऱ्या. ४ मनुष्याला. ५ शंभर वर्षांनीं. ६ मिळतो. ७ विश्वास ठेवितों.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

प्रश्न विचारिला, तेव्हां मारुतीनें ॥ ६९ ॥ त्याला क्रमशः सगळें रामचरित्र निवेदन केलें. मारुतीच्या मुखां-
तून ती कथा ऐकिल्यावर भरताला पराकाष्ठेचा आनंद झाला. ॥ ६६ ॥ शत्रुघ्नालाही - ती वार्ता कळली
तेव्हां - हर्ष वाटला. भरतानें आनंदित मुद्रेनें शत्रुघ्नाला आज्ञा दिली कीं, 'रघुकुमरा! नगरामध्यें जितकीं
म्हणून देवालयें आहेत, त्या सर्व ठिकाणीं ॥ ६७ ॥ उत्तम बुद्धिमान पुरुषांनीं अनेक प्रकारचीं पूजासा-
हित्यें व बलि घेऊन पूजा बांधाव्या; सूत, वैतालिक, बंदी, स्तुतिपाठक, ॥ ६८ ॥ मुख्य मुख्य वारांगनांचें
शेंकडों ताफे असा मेळा आतांच्या आतां बाहेर यावा; राजपत्न्या, प्रधानमंडळ, हत्ती घोडे पायदळ अशी

आचचक्षे ऽथ रामस्य चरितं कृत्स्नशः क्रमात् ॥ श्रुत्वा तु परमानन्दं भरतो
मारुतात्मजात् ॥ ६६ ॥ आज्ञापयच्छत्रुहणं मुदा युक्तं मुदा ऽन्वितः ॥ दैवता-
नि च यावन्ति नगरे रघुनन्दन ॥ ६७ ॥ नानोपहारबलिभिः पूजयन्तु महाधि-
यः ॥ सूता वैतालिकाश्चैव बन्दिनः स्तुतिपाठकाः ॥ ६८ ॥ वारमुख्याश्च शतशो
निर्यान्त्वद्यैव संघशः ॥ राजदारास्तथा ऽमात्याः सेनाहस्त्यश्वपत्तयः ॥ ६९ ॥

( पू. ) आचचक्षे. ॥ ( मू. ) श्रुत्वा परमानन्दं [ प्राप ]. ॥६६॥ मुदा अन्वितः [ सः ] मुदा अ-
न्वितं शत्रुहणं ( पू. ) – ॥ ' रघुनन्दन, नगरे यावन्ति, ( मू. ), ॥ ६७ ॥ महाधियः [ तावन्ति ]
( मू. ), ॥ ६८ ॥ शतशः ( मू. ) सेनाः च अद्य एव सङ्घशः निर्यान्तु. ॥ ६९ ॥

१ सांगता झाला. २ हे स्तुतिपाठकांचे (भाटांचे) भेद आहेत. ३ वारांगना. ४ महाबुद्धिमान्. ५ निर्यान्तु निघोत. ६ थव्यांनीं.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

एकंदर सेना, ॥ ६९ ॥ ब्राह्मण, नागरिक जन, देशोदेशांतून आलेले राजे अशा सर्वांनीं रामाचें चंद्रासारखें मुख अवलोकन करण्यासाठीं आतांच निघून यावें; - शत्रुघ्ना ! ही सर्व व्यवस्था तूं लाव. -' ॥७०॥ भरताची आज्ञा ऐकून शत्रुघ्नानें नगरांत द्वाही फिरविली. तीप्रमाणें लोकांनीं मोत्यांचीं व रत्नांचीं तेजःपुंज तोरणें लावून नगर शृंगारिलें; जागोजाग चित्रविचित्र पताका उभारिल्या; व अनेक कलाकुशल लोकांनीं आपआपलीं घरें सुशोभित केलीं. ॥ ७१ ॥ ७२ ॥ प्रत्येकाला रामाचें दर्शन घेण्याची उत्कंठा होती, म्हणून सगळे लोक थव्याथव्यांनीं बाहेर निघाले. एक लक्ष घोडे, दहाहजार हत्ती ॥ ७३ ॥

ब्राह्मणाश्च तथा पौरा राजानो ये समागताः ॥ निर्यान्तु राघवस्याद्य द्रष्टुं शशिनिभाननम् ॥७०॥ भरतस्य वचः श्रुत्वा शत्रुघ्नपरिचोदिताः ॥ अलंचक्रुश्च नगरीं मुक्तारत्नमयोज्ज्वलैः ॥ ७१ ॥ तोरणैश्च पताकाभिर्विचित्राभिरनेकधा ॥ अलंकुर्वन्ति वेश्मानि नानाबलिविचक्षणाः ॥७२॥ निर्यान्ति वृन्दशः सर्वे रामदर्शनलालसाः ॥ हयानां शतसाहस्रं गजानामयुतं तथा ॥ ७३ ॥

(पू.), ये राजानः समागताः, [ ते ] च अद्य (मू.) द्रष्टुं निर्यान्तु.' ॥७०॥ ( ७१ पू. ) [जनाः] ( ७१ मू. ) तोरणैः, विचित्राभिः ( ७२ पू. ) च अनेकधा नगरीं अलंचक्रुः. ॥ [ शत्रुघ्नप्रेरिताः ] (मू.) वेश्मानि [च] अलंकुर्वन्ति. ॥ ७१ ॥ ७२ ॥ (पू.) वृन्दशः निर्यान्ति. ॥ तथा (मू.), ॥७३॥

---

१ अनेक प्रकारच्या कुशल कामांत निपुण. २ घरें. ३ शोभवितात. ४ मेळ्यांनीं. ५ घोड्यांचें.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

व सोन्याच्या सूत्रांनीं ( स्त्र्या कलाबतूनें ) शृंगारिलेले दहासहस्त्र रथ बाहेर पडले. लोकांनीं परमात्म्याला अर्पण करण्यास योग्य अशा लहानमोठ्या वस्तु भेटीसाठीं बरोबर घेतल्या. ॥ ७४ ॥ त्यांच्या पाठीमागून राजघराण्यांतील स्त्रिया पालख्यांत बसून निघाल्या. भरत तर पादुका मस्तकावर ठेवून व हात जोडून ॥ ७५ ॥ शत्रुघ्नासह पायीं चालत रामाला सामोरा यावयास निघाला. हा समाज बाहेर पडला मात्र, इतक्यांत दूर अंतरावर चंद्रासारखें शुभ्र विमान दिसूं लागलें ! ॥ ७६ ॥ तत्क्षणीं मारुतीनें लोकांना सांगितलें :– ‘ जनहो ! तें पहा सूर्यासारखें तेजःपुंज पुष्पक विमान दिसत आहे ! हें ब्रह्मदेवानें संकल्पमात्रेंकरून

रथानां दशसाहस्रं स्वर्णसूत्रविभूषितम् ॥ पारमेष्ठीन्[2]युपादाय द्रव्याण्युच्चावचानि च ॥ ७४ ॥ ततस्तु शिबिकारूढा[5] निर्ययू राजयोषितः[6] ॥ भरतः पादुके न्यस्य शिरस्येव कृताञ्जलिः ॥ ७५ ॥ शत्रुघ्नसहितो रामं पादचारेण निर्ययौ ॥ तदैव दृश्यते दूराद्विमानं चन्द्रसन्निभम् ॥ ७६ ॥ पुष्पकं सूर्यसंकाशं मनसा ब्रह्मनिर्मितम् ॥ एतस्मिन् भ्रातरौ वीरौ वैदेह्या रामलक्ष्मणौ ॥ ७७ ॥

स्वर्णसूत्रविभूषितं[1] ( पू. ) [ च निर्याति. ॥ सर्वे ] ( मू. ) द्रव्याणि उपादाय[3] [ निर्ययुः[4] ]. ॥ ७४ ॥ ( मू. ) निर्ययुः. ॥ शिरसि एव ( मू. ) भरतः ॥ ७५ ॥ ( ७६ पू. ) [ अवलोकयितुं ] पादचारेण[7] निर्ययौ. तदा एव पवनात्मजः, ‘ जनाः, ( ७६ उ. ७७ पू. ) पुष्पकं विमानं दूरात् दृश्यते. ( ७७ मू. ) [ सहितौ ] रामलक्ष्मणौ, ॥

१ सुवर्णाच्या दोऱ्यांनीं सुशोभित केलेलें. २ ईश्वराला योग्य. ३ घेऊन. ४ निघाले. ५ पालखींत बसलेल्या. ६ राजस्त्रिया. ७ पायीं चालत.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

उत्पन्न केलें. ह्यामध्यें जानकीसह उभयतां शूर बंधु रामलक्ष्मण, वानरांचा राजा सकुटुंब सपरिवार सुग्रीव व मंत्र्यांसह विभीषण इतकी मंडळी बसली आहे.' ॥ ७७ ॥ ७८ ॥ त्यावेळीं स्त्रिया, मुलें, तरुण व वृद्ध सर्व लोक जिकडे तिकडे आनंदभरांत 'हा पहा राम आला ! हा राम आला !' असें बोलूं लागले. तो कलकलाट स्वर्गापर्यंत जाऊन पोंचला ! ॥ ७९ ॥ रथांत, हत्तींवर व घोड्यांवर बसलेले लोक खालीं उतरून भूमीवर उभे राहिले, तों आकाशांत उगवलेल्या चंद्रासारखा विमानामध्यें बसलेला रामचंद्र त्यांच्या दृष्टीस पडला. ॥ ८० ॥ भरताला पराकाष्ठेचा हर्ष झाला. तो हात जोडून रामाला आणखी पुढें सामोरा चालला. विमानांत उच्चस्थानीं बसलेला राम - दृष्टीस पडला - त्यावेळीं भरतानें त्याला आनंदानें, ॥ ८१ ॥

सुग्रीवश्च कपिश्रेष्ठो मन्त्रिभिश्च विभीषणः ॥ दृश्यते पश्यत जना इत्याह पवनात्मजः ॥ ७८ ॥ ततो हर्षसमुद्भूतो निःस्वनो दिवमस्पृशत् ॥ स्त्रीबालयुववृद्धानां रामोऽयमिति कीर्तनात् ॥ ७९ ॥ रथकुञ्जरवाजिस्था अवतीर्य महीं गताः ॥ ददृशुस्ते विमानस्थं जनाः सोममिवाम्बरे ॥ ८० ॥ प्राञ्जलिर्भरतो भूत्वा प्रहृष्टो राघवोन्मुखः ॥ ततो विमानाग्रगतं भरतो राघवं मुदा ॥ ८१ ॥

कपिश्रेष्ठः ( ७८ पू. ) [ सहितः ] विभीषणः च ॥ ( मू. ). ॥ ७६ ॥ ७७ ॥ ७८ ॥ ततः (उ.) ॥ ( पू. ). ॥ ७९ ॥ ( पू. ) ॥ ते जनाः विमानस्थं [ रामं ] अम्बरे ( मू. ) ददृशुः. ॥ ८० ॥ ततः प्रहृष्टः भरतः ( ८१ मू. ) ॥

१ पाहा. २ घोष. ३ स्वर्गास. ४ पोंचला. ५ रथ, हत्ती, घोडे, ह्यांवर बसलेले. ६ उतरून. ७पृथ्वीवर.८आकाशांत. ९ चंद्राला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

लोक मेरुपर्वतावर उगवलेल्या सूर्याला वंदन करितात त्याप्रमाणें, नम्र होऊन प्रणाम केला. पुढें रामानें आज्ञा दिली असतां विमान भूमीवर उतरलें. ॥८२॥ त्यावेळीं आगोदर कनिष्ठ बंधू(शत्रुघ्ना)सह भरताला विमानांत चढविलें. रामाची भेट झाली असतां भरतानें आनंदित होऊन रामाला पुन्हां वंदन केलें. ॥ ८३ ॥ भाऊ भरत फारा दिवसांनीं भेटला ह्मणून रामानें त्याला उचलून मांडीवर बसविलें व आनंदानें घट्ट पोटाशीं धरिलें. ॥ ८४ ॥ पुढें भरत लक्ष्मणाला भेटला. नंतर त्यानें सीतेकडे वळून व 'मी भरत वंदन करीत आहें ' असें सांगून तिला प्रणाम केला. ह्यावेळीं प्रेमामुळें त्याचा कंठ दाटून आला. ॥ ८५ ॥

ववन्दे प्रणतो रामं मेरुस्थमिव भास्करम् ॥ ततो रामाभ्यनुज्ञातं विमानमपतद्भुवि ॥ ८२ ॥ आरोपितो विमानं तद्भरतः सानुजस्तदा ॥ राममासाद्य मुदितः पुनरेवाभ्यवादयत् ॥ ८३ ॥ समुत्थाप्य चिराद्दृष्टं भरतं रघुनन्दनः ॥ भ्रातरं स्वांकमारोप्य मुदा तं परिषस्वजे ॥८४॥ ततो लक्ष्मणमासाद्य वैदेहीं नाम कीर्तयन् ॥ अभ्यवादयत प्रीतो भरतः प्रेमविह्वलः ॥ ८५ ॥

( ८२ पू. ) इव [ स्थितं ] रामं ववन्दे. ॥ ( मू. ) अपतत्[1]. ॥ ८१ ॥ ८२ ॥ तदा तत् विमानं आरोपितः[2] सानुजः ( मू. ) [ सन् ] पुनः एव अभ्यवादयत्[3]. ॥ ८३ ॥ रघुनन्दनः चिरात् दृष्टं भरतं भ्रातरं ( मू. ). ॥ ८४ ॥ ततः प्रीतः ( मू. ), वैदेहीं नाम कीर्तयन्[6] [सन्] अभ्यवादयत, ॥८५॥

१ उतरलें. २ चढविलेला. ३ वंदन करिता झाला. ४ उठवून. ५ आलिंगिता झाला. ६ मुखानें उच्चारणारा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

भरत वानरवीरांना भेटतो.

पुढें त्यानें सुग्रीव, जांबवान्, युवराज अंगद, मैंद, द्विविद, नील, ऋषभ ह्या वीरांना आलिंगन दिलें, ॥८६॥ तसाच भरत सुषेण, नल, गवाक्ष, गंधमादन, शरभ, पनस ह्यांनाही भेटला. ॥ ८७ ॥ वानरांनीं शांत अशीं मनुष्यासारखीं रूपें धरिलीं होतीं; त्या सर्वांनीं आनंदित होऊन आदरपूर्वक भरताला कुशलप्रश्न विचारिले. ॥ ८८ ॥ पुढें भरत सुग्रीवाला पुन्हां आलिंगन देऊन प्रेमानें ह्मणाला :– 'राजा ! तुझ्या साह्यामुळें रामाला जय मिळाला व रावणाचा नाश झाला. ॥ ८९ ॥ सुग्रीवा ! तूं आह्मा चौत्रांचा पांचवा भाऊ आहेस.'

सुग्रीवं जाम्बवन्तं च युवराजं तथांगदम् ॥ मैन्दद्विविदनीलांश्च ऋषभं चैव सस्वजे ॥ ८६ ॥ सुषेणं च नलं चैव गवाक्षं गन्धमादनम् ॥ शरभं पनसं चैव भरतः परिषस्वजे ॥ ८७ ॥ सर्वे ते मानुषं रूपं कृत्वा भरतमादृताः ॥ पप्रच्छुः कुशलं सौम्याः प्रहृष्टाश्च प्लवंगमाः ॥८८॥ ततः सुग्रीवमालिंग्य भरतः प्राह भक्तितः॥ त्वत्सहायेन रामस्य जयोऽभूद्रावणो हतः ॥८९॥ त्वमस्माकं चतुर्णां तु भ्राता सुग्रीव पञ्चमः ॥

( मू. ). ॥ ८६ ॥ भरतः ( मू. ). ॥ ८७ ॥ सर्वे ते ( उ. ) ( पू. ) आदृताः [ सन्तः ] भरतं, कुशलं पप्रच्छुः. ॥ ८८ ॥ ततः भरतः भक्तितः ( पू. ) – ॥ '( मू. ). ॥ ८९ ॥ सुग्रीव, ( पू. ) भ्राता.' ॥

१ विचारिते झाले. २ चौघांचा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

त्यावेळीं शत्रुघ्नानेंही नम्रपणें रामाला व लक्ष्मणाला वंदन करून नंतर सीतेच्या चरणांस प्रणाम केला. पुढें राम आईच्या भेटीला गेला. ती चवदा वर्षें नित्य शोक करून अगदीं विव्हल झाली होती. तिचें पूर्वीचें तेज आतां अगदीं राहिलें नव्हतें. ॥ ९० ॥ ९१ ॥ रामानें मातेचें मन प्रसन्न करण्यासाठीं नमस्कार करून तिचे पाय घट्ट धरिले. पुढें त्यानें कैकेयी, सुमित्रा व दुसऱ्याही माता अशा सर्वांना नमस्कार केले. ॥ ९२ ॥ भरतानें भक्तिपूर्वक आजपर्यंत पूजा करून ठेविलेल्या त्या पादुका रामाच्या पायीं जोडिल्या, ॥ ९३ ॥ - व ह्मटलें : - ' रामा ! मी हें राज्य तुझी ठेव ह्मणून आजपर्यंत चालविलें.

शत्रुघ्नश्च तदा राममभिवाद्य सलक्ष्मणम् ॥ ९० ॥ सीतायाश्चरणौ पश्चाद्ववन्दे विनयान्वितः ॥ रामो मातरमासाद्य विवर्णां[1] शोकविह्वलाम् ॥ ९१ ॥ जग्राह प्रणतः[2] पादौ मनो मातुः प्रसादयन् ॥ कैकेयीं च सुमित्रां च ननामेतरमातरः ॥ ९२ ॥ भरतः पादुके ते तु राघवस्य सुपूजिते ॥ योजयामास रामस्य पादयो-र्भक्तिसंयुतः[3] ॥ ९३ ॥ राज्यमेतन्न्यासभूतं[4] मया निर्यातितं[5] तव ॥

तदा ( मू. ) रामं अभिवाद्य, ॥ ९० ॥ पश्चात् विनयान्वितः [ सन् ] ( मू. ) मातरं आसाद्य, ॥ ९१ ॥ प्रणतः, मातुः ( पू. ) [ सन् ] पादौ जग्राह, ॥ ( मू. ) च ननाम. ॥ ९२ ॥ भक्तिसंयुतः ( पू. ) राघवस्य पादुके ( मू. ) योजयामास, [ उवाच च - ] ॥ ९३ ॥ ' मया ( पू. ) राज्यं तव निर्यातितं. ॥

---

१ निस्तेज, फिकी. २ नम्र. ३ जोडिता झाला. ४ ठेव ह्मणून ठेविलेलें. ५ चालविलें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

भरत रामाला सर्वस्व निवेदितो.

आज माझ्या जन्माची सार्थकता झाली व माझे मनोरथ सिद्धीस गेले ; ॥ ९४ ॥ कारण, प्रभो ! तूं अयोध्येस परत आलेला माझ्या दृष्टीस पडलास. रामा ! धान्याचीं कोठारें, सैन्य व द्रव्यभांडार हीं सगळीं माझ्या हातून पूर्वीपेक्षां दसपट वाढलीं आहेत; पण ॥ ९५ ॥ हा सर्व तुझाच प्रभाव. जगत्पते ! आतां आपल्या नगरीचें पालन कर. ' भरत अशा प्रकारें बोलून - सर्वस्व निवेदन करीत - आहे हें पाहून सर्व वानरवीरांच्या ॥ ९६ ॥ नेत्रांवाटे आनंदाश्रु वाहूं लागले. त्यांनीं संतुष्ट होऊन भरताची वाखाणणी केली. - सगळे इष्टजन भेटले तेव्हां - रामाच्याही मनाला संतोष झाला. तो भरताला मांडीवर घेऊन

अद्य मे सफलं जन्म फलितो मे मनोरथः ॥ ९४ ॥ यत्पश्यामि समायातमयोध्यां त्वामहं प्रभो ॥ कोष्ठागारं बलं कोशं कृतं दशगुणं मया ॥ ९५ ॥ त्वत्तेजसा जगन्नाथ पालयस्व पुरं स्वकम् ॥ इति ब्रुवाणं भरतं दृष्ट्वा सर्वे कपीश्वराः ॥ ९६ ॥ मुमुचुर्नेत्रजं तोयं प्रशशंसुर्मुदाऽन्विताः ॥ ततो रामः प्रहृष्टात्मा भरतं स्वांकगं मुदा ॥ ९७ ॥

अद्य मे जन्म ( मू. ) [ च ] फलितः; ॥ ९४ ॥ प्रभो, यत् अहं अयोध्यां ( ९५ पू. ) पश्यामि. ॥ मया ( ९५ मू. ) बलं च त्वत्तेजसा दशगुणं कृतं. ( ९६ पू. ) पुरं पालयस्व. ' ( मू. ) ॥ ९५ ॥ ॥ ९६ ॥ नेत्रजं तोयं ( पू. ) प्रशशंसुः. ॥ ततः प्रहृष्टात्मा रामः मुदा ( मू. ) [ कृत्वा ] ॥ ९७ ॥

१ कोठारें ( धान्याचीं ). २ सैन्यें. ३ द्रव्यभांडार. ४ तुझ्या प्रभावानें. ५ दसपट. ६ रक्षण कर. ७ नेत्रांतून निघालेलें. ८ उदक. ९ वाहवा म्हणूं लागले.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आनंदानें ॥ ९७ ॥ त्याच विमानांत बसून लागलाच भरताच्या आश्रमीं गेला. तेथें राम त्या श्रेष्ठ विमानां-तून भूमीवर उतरला. ॥ ९८ ॥ नंतर प्रभूनें पुष्पकाला सांगितलें :– 'बा विमाना! कुबेराकडे जा आणि त्याला वाहा. मी तुला अनुज्ञा देतों कीं, तूं धनपालक कुबेराच्या अनुरोधानें वाग व त्याची सेवा करीत राहा.' ॥ ९९ ॥ पुढें, जसा देवेंद्र बृहस्पतीला प्रणाम करितो त्याप्रमाणें, राम वसिष्ठ गुरूंच्या चरणांस वंदन करून व त्यांना बसण्यास उत्तम महामोल आसन देऊन स्वतां गुरूजींच्या समीपभागीं बसला. ॥ १०० ॥

॥ इति श्रीमदध्यात्मरामायणार्थबोधे युद्धकाण्डे चतुर्दशः सर्गः ॥ १४ ॥

ययौ तेन विमानेन भरतस्याश्रमं तदा ॥ अवरुह्य तदा रामो विमानाग्र्यान्मही-तलम् ॥ ९८ ॥ अब्रवीत्पुष्पकं देवो गच्छ वैश्रवणं वह ॥ अनुगच्छानुजानामि कुबेरं धनपालकम् ॥९९॥ रामो वसिष्ठस्य गुरोः पदाम्बुजं नत्वा यथा देवगुरोः शतक्रतुः ॥ दत्वा महार्हासनमुत्तमं गुरोरुपाविवेशाथ गुरोः समीपतः ॥ १०० ॥

इति श्रीमदध्यात्मरामायणे उमामहेश्वरसंवादे युद्धकाण्डे चतुर्दशः सर्गः ॥ १४ ॥

तदा (पू.) ययौ. ॥ (मू.) अवरुह्य [अतिष्ठत्], ॥ ९८ ॥ देवः पुष्पकं अब्रवीत्– '(मू.) कुबेरं अनुगच्छ.' ॥ ९९ ॥ (पू.) देवगुरोः, [तथा] नत्वा, ॥ गुरोः उत्तमं महार्हासनं दत्वा, (मू.) उपाविवेश. ॥ १०० ॥ इति चतुर्दशः सर्गः ॥ १४ ॥

---

१ उत्तम विमानांतून. २ उतरून. ३ राहिला. ४ कुबेराला. ५ कडे जा. ६ इंद्र. ७ बृहस्पतीच्या. ८ महामोल सिंहासन. ९ देऊन. १० बसला.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

त्या वेळीं कैकेयीचा पुत्र भरत भक्तियुक्त अंतःकरणानें हातांची ओंजळ आपल्या मस्तकीं धरून ज्येष्ठ बंधूला ह्मणाला :- ॥१॥ 'रामा ! तूं माझ्या मातेचा सत्कार केलास व मला राज्य दिलेंस; तें जसें तूं मला दिलेंस, तसेंच आज मी तुला परत देत आहें.' ॥ २ ॥ इतकें बोलून भरतानें भक्तिपूर्वक रामाच्या चरणांपुढें साष्टांग नमस्कार घातला व अनेक प्रकारें त्याची प्रार्थना केली; त्याच्या बरोबर त्याच्या मातेनें-कैकेयीनेंही-रामाला सांगितलें :- - रामा ! तूं माझें वचन पाळिलेंस ह्मणून मीं संतुष्ट झालें; आतां स्वसंतोषानें हें राज्य मी तुला देत आहें, मनांत कांहीं विकल्प न धरितां ह्याचा स्वीकार कर.' - ॥ ३ ॥ रामानें 'बरें आहे' ह्मणून भरतापासून राज्यसूत्रें आपणाकडे घेतलीं. राम ह्मणजे साक्षात् परमेश्वर स्वस्वरूपीं मायेचा अंगिकार

ततस्तु कैकयीपुत्रो भरतो भक्तिसंयुतः ॥ शिरस्यञ्जलिमाधाय ज्येष्ठं भ्रातरमब्रवीत् ॥ १ ॥ माता मे सत्कृता राम दत्तं राज्यं त्वया मम ॥ ददामि तत्ते च पुनर्यथा त्वमददा मम ॥ २ ॥ इत्युक्त्वा पादयोर्भक्त्या साष्टांगं प्रणिपत्य च ॥ बहुधा प्रार्थयामास कैकेय्या गुरुणा सह ॥ ३ ॥ तथेति प्रतिजग्राह भरताद्राज्यमीश्वरः ॥ मायामाश्रित्य सकलां नरचेष्टामुपागतः ॥ ४ ॥

( पू. ) भरतः ॥ ( मू. ) - ॥१॥ 'राम, त्वया मे (पू.) राज्यं दत्तं. ॥ (मू.) अददाः, [ तथा अहं ] पुनः तत् ते ददामि.' ॥ २ ॥ इति उक्त्वा भक्त्या ( पू. ) ॥ गुरुणा कैकेय्या सह ( मू. ). ॥ ३ ॥ ( उ ). ईश्वरः 'तथा' इति [ उक्त्वा ] ( पू. ) प्रतिजग्राह. ॥ ४ ॥

१ शिरसि मस्तकावर. २ ओंजळ. ३ ठेवून. ४ दिलेंस. ५ मनुष्यलीलेस. ६ पावलेला. ७ परत घेता झाला. ८ माता, पूज्य



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

करून मनुष्यासारख्या सर्व लीला करीत राहिला होता. ॥ ४ ॥ ज्याला नित्य स्वात्मानंदसुखाचा अनुभव मिळतो, सुखमय ज्ञान हेंच एक ज्याचें रूप, व ज्याच्या आनंदरूपापेक्षां पलिकडे कोणताही आनंद राहिला नाहीं, त्या परमात्म्याला ॥५॥ मनुष्यलोकींच्या (क्षुद्र) राज्याशीं करायाचें होतें काय ? ज्या जगन्नियंत्यानें नुसती भुंवई वांकडी केली तर क्षणमात्रांत त्रैलोक्याचा प्रलय व्हावयाचा, ॥६॥ ज्याची केवळ कृपादृष्टि फिरली कीं मनुष्याला इंद्राचीं ऐश्वर्यें प्राप्त होऊं शकतात, व ज्यानें लीलामात्रानें महासृष्टि उत्पन्न केली, त्या लक्ष्मीपतीपुढें ह्या राज्याची प्रतिष्ठा ती केवढी !! ॥ ७ ॥ तथापि, तो प्रभु आपल्या भक्त जनांच्या विविध इच्छा पूर्ण कराव्या एवढ्यासाठीं लीलेनें मनुष्यदेह धारण करून लोकशिक्षणाकरितां प्रत्येक प्रसं-

स्वाराज्यानुभवो यस्य सुखज्ञानैकरूपिणः ॥ निरस्तातिशयानन्दरूपिणः परमा-
त्मनः ॥ ५ ॥ मानुषेण तु राज्येन किं तस्य जगदीशितुः ॥ यस्य भ्रूभंगमात्रेण
त्रिलोकी नश्यति क्षणात् ॥ ६ ॥ यस्यानुग्रहमात्रेण भवन्त्याखण्डलश्रियः ॥
लीलासृष्टमहासृष्टेः कियदेतद्रमापतेः ॥ ७ ॥ तथापि भजतां नित्यं कामपूर-
विधित्सया ॥ लीलामानुषदेहेन सर्वमप्यनुवर्तते ॥ ८ ॥

( मू. ) स्वाराज्यानुभवः [ अस्ति ], ॥ ५ ॥ तस्य जगदीशितुः ( मू. ) नश्यति, ॥ ६ ॥ ( पू. ) भवन्ति, ॥ [ तस्य ] ( मू. ) एतत् कियत् ? ॥ ७ ॥ तथापि [ सः ] ( मू. ). ॥ ८ ॥

१ दूर केलें इतरांचें आधिक्य ज्यानें असा आनंद हेंच रूप ज्याचें अशा. २ आत्मसुखानुभव. ३ भुंवया वांकड्या केल्याबरोबर. ४ स्वर्ग, मृत्यु, पाताल, हे तीन लोक. ५ नाश पावते. ६ इंद्राचीं ऐश्वर्यें. ७ सहज निर्मिली प्रचंड सृष्टि ज्यानें अशा.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

गाला अनुरूप वर्तन ठेवीत असे. असो. ॥ ८ ॥ पुढें शत्रुघ्नाच्या सांगीवरून कुशलसा एक नापित आला. रामाला अभिषेक करण्यासाठीं साहित्यें आणिलीं. ॥ ९ ॥ प्रथम भरताला श्मश्रु व केशसंस्कार करून मंगलस्नान घातलें; त्याच्यामागून महात्मा लक्ष्मण, पुढें वानरराजा सुग्रीव, नंतर राक्षसेश्वर विभीषण सर्वांचीं स्नानें झालीं. ॥१०॥ तेव्हां मग रामानें आपल्या जटा मोकळ्या करवून (श्मश्रु करवून) अभ्यंगस्नान केलें, विविध पुष्पमाला घातल्या, उट्या लाविल्या आणि महामोल वस्त्रें परिधान केलीं. ह्यावेळीं तेथें असलेली ती राममूर्ति कांतीच्यायोगें अतिशय उज्ज्वल दिसूं लागली. ॥ ११ ॥ रामाचे अंगोद्वर्तन ( आंगाला सुगंधि द्रव्य लावून रगडणें ) वगैरे संस्कार लक्ष्मणानें व महाबुद्धिमान् भरतानें करविले, आणि सीतेचे राजपत्न्यांनीं

ततः शत्रुघ्नवचनान्निपुणः[1] श्मश्रुवर्धकः[2] ॥ संभाराश्चाभिषेकार्थमानीता[3] राघवस्य हि ॥ ९ ॥ पूर्वं तु भरते स्नाते लक्ष्मणे च महात्मनि ॥ सुग्रीवे वानरेन्द्रे च राक्षसेन्द्रे विभीषणे ॥ १० ॥ विशोधितजटः[4] स्नातश्चित्रमाल्यानुलेपनः[5] ॥ महार्हवसनोपेतस्तस्थौ तत्र श्रिया ज्वलन् ॥ ११ ॥ प्रतिकर्म च रामस्य लक्ष्मणश्च महामतिः ॥ कारयामास भरतः सीताया राजयोषितः ॥ १२ ॥

( पू. ), ॥ राघवस्य अभिषेकार्थं ( मू. ). ॥ ९ ॥ ( पू. ) लक्ष्मणे, ( मू. ) च स्नाते [ सति ], ॥ १० ॥ ( मू. ) [ रामः ] तत्र तस्थौ. ॥ ११ ॥ महामतिः लक्ष्मणः, भरतः च रामस्य प्रतिकर्म ॥ कारयामास. राजयोषितः सीतायाः [ प्रतिकर्म कारयामासुः ] ॥ १२ ॥



१चतुर. २ नापित. ३साहित्यें. ४स्वच्छ केल्या (सोडविल्या) जटा ज्याच्या, असा. ५नानाप्रकारचीं फुलें व उट्या धारण करणारा.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

करविले. ॥ १२ ॥ जानकी मूळचीच सुंदर (सिंहकटि) होती; तिला महामोल वस्त्रें आणि अलंकार घालून विशेष सुशोभित केलें. कौसल्येचा स्वभाव फार उत्तम होता. तिचें पुत्रावर अत्यंत प्रेम असे. ह्या उत्सवप्रसंगीं तर काय तिला पराकाष्ठेचा आनंद झाला होता. तिनें स्वतां सगळ्या वानरास्त्रियांना नाहूं घालविलें. ॥ १३ ॥ नंतर शत्रुघ्नाच्या सांगण्यावरून सुबुद्धिमान् सुमंत्र एक सूर्यासारखा तेजःपुंज रथ जोडून घेऊन आला आणि रामाच्या अग्रभागीं उभा राहिला. सत्यधर्माचरणांत तत्पर असा रामचंद्र त्या रथांत बसला. ॥ १४ ॥ १५ ॥ सुग्रीव, युवराज ( अंगद ), हनुमान्, बिभीषण सर्वजण स्नानें करून, उत्तम वस्त्रें नेसून

महार्हवस्त्राभरणैरलंचक्रुः सुमध्यमाम् ॥ ततो वानरपत्नीनां सर्वासामेव शोभना ॥
अकारयत कौसल्या प्रहृष्टा पुत्रवत्सला ॥१३॥ ततः स्यन्दनमादाय शत्रुघ्नवचनात्सुधीः ॥ सुमन्त्रः सूर्यसंकाशं योजयित्वा ऽग्रतः स्थितः ॥ १४ ॥ आरुरोह रथं रामः सत्यधर्मपरायणः ॥ १५ ॥ सुग्रीवो युवराजश्च हनुमांश्च विभीषणः ॥
स्नात्वा दिव्याम्बरधरा दिव्याभरणभूषिताः ॥ १६ ॥

( पू. ) अलंचक्रुः. ॥ ततः सर्वासां एव ( द्वि. ) [ प्रतिकर्म ] ( मू. ) कौसल्या अकारयत. ॥१३॥ ( पू. ) सुमन्त्रः सूर्यसंकाशं स्यन्दनं आदाय ( मू. ). ॥ १४ ॥ ( मू. ) रामः रथं आरुरोह. ॥ १५ ॥ ( पू. ) च ( मू. ) [ सन्तः ] ॥ १६ ॥

१ करविती झाली. २ सूर्यासारखा तेजस्वी. ३ रथाला. ४ घेऊन. ५ अंगद.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ते अयोध्येस चालले.

व दिव्य अलंकारांनीं शरीरें सुभूषित करून सिद्ध होते. ॥ १६ ॥ ते रथांत, घोड्यांवर व हत्तींवर बसून कांहीं रामाच्या मागें व कांहींजण पुढें असे चालूं लागले. सुग्रीवाच्या पत्न्या व सीता पालख्यांत बसून विस्तीर्ण राजधानीकडे चालल्या. ॥ १७ ॥ इंद्र हिरवे घोडे जोडिलेल्या रथांत बसून देवांसह थाटानें बाहेर पडावा, त्याप्रमाणें राम रथांत बसून आपल्या विशाल राजधानीस चालला. ॥१८॥ भरतानें रथ हांकण्याचें काम स्वीकारिलें; महातेजस्वी शत्रुघ्नानें शुभ्र छत्र धरिलें; लक्ष्मणानें पंखा घेतला; जवळच उभा असलेला शत्रूंना जर्जर करणारा सुग्रीव एक चंवरी वारूं लागला व राक्षसांच्या राजानें दुसरी चंवरी उचलली. छत्र, पंखा, व चंवऱ्या ह्यांचे दांडे रत्नखचित होते; आणि चंवऱ्या चंद्रासारख्या शुभ्र तेजस्वी दिसत होत्या. ॥१९॥२०॥

राममन्वी[1]युरग्रे च रथाश्वगजवाहना[2]: ॥ सुग्रीवपत्न्यः सीता च ययुर्यानैः पुरं महत् ॥ १७ ॥ वज्रपाणिर्यथा देवैर्हरिता[3]श्वरथे स्थितः ॥ प्रययौ रथमास्थाय तथा रामो महत्पुरम् ॥ १८ ॥ सारथ्यं भरतश्चक्रे रत्नदण्डं महाद्युतिः ॥ श्वेतातपत्रं शत्रुघ्नो लक्ष्मणो व्यजनं दधे ॥ १९ ॥ चामरं च समीपस्थो न्यवीजयदरिन्दमः ॥ शशिप्र[12]काशं त्वपरं जग्राहासुरनायकः ॥ २० ॥

( पू. ) [ ययुः ]. ॥ ( मू. ) पुरं ययुः. ॥ १७ ॥ (पू.) [4]वज्रपाणिः देवैः सह, ॥ तथा रामः रथं आ[5]स्थाय, ( मू. ) प्रययौ. ॥ १८ ॥ महाद्युतिः भरतः ( पू. ). ॥ शत्रुघ्नः [6]रत्नदण्डं ( मू. ) [ च ] [8]व्यजनं दधे. ॥ १९ ॥ समीपस्थः अरिन्दमः [ सुग्रीवः ] ( पू. ). ॥ असुर[11]नायकः ( मू. ). ॥२०॥

१ मागून चालले. २ वाहनांच्या योगें. ३ हिरवे घोडे ज्याचे अशा रथांत. ४ वज्र हातांत ज्याच्या, तो ( इंद्र ). ५ बसून. ६ रत्नांचा दांडा ज्याचा, अशा. ७ शुभ्र छत्रास. ८ पंखा. ९ धरिता झाला. १०वारिता झाला.११राक्षसांचा राजा.१२चंद्रतुल्य.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

देव, सिद्धांचे समुदाय, व ज्यांचें दर्शन अपूर्व पुण्यकारक समजलें जातें ते ऋषि रामाची स्तुति करूं लागले; जिकडून तिकडून तो स्तुतीचा मधुर रव कानीं येई. ॥ २१ ॥ वानर मनुष्यांसारखीं रूपें घेऊन हत्तींवर बसले आणि नगारे व शंख वाजवीत व मृदंग, पणव, टिमक्या ह्या वाद्यांचा दुमदुमाट करीत चालले. ॥२२॥ अशा थाटानें रघुवीर आपल्या शृंगारलेल्या नगरांत येऊन पोंचला. मार्गानें चाललेली राममूर्ति नागरिक जनांच्या दृष्टीस पडली.॥२३॥त्याची अंगकांति दूर्वेच्या पत्राप्रमाणें श्यामल होती; त्यानें मस्तकावर महामोल मुकुट व सर्व शरीरावर उंची रत्नांचे अलंकार घातले होते; त्याचे नेत्रप्रांत किंचित् रक्तवर्ण व कमलासारखे दीर्घ होते. असें रामरूप पाहून अयोध्येंतील लोकांना परमानंद झाला ! खरोखर ते. अत्यंत पुण्यवान् होत. ॥२४॥

दिविजैः सिद्धसंघैश्च ऋषिभिर्दिव्यदर्शनैः ॥ स्तूयमानस्य रामस्य शुश्रुवे मधुरध्वनिः ॥ २१ ॥ मानुषं रूपमास्थाय वानरा गजवाहनाः ॥ भेरीशंखनिनादैश्च मृदंगपणवानकैः ॥ २२ ॥ प्रययौ राघवश्रेष्ठस्तां पुरीं समलंकृताम् ॥ ददृशुस्ते समायान्तं राघवं पुरवासिनः ॥ २३ ॥ दूर्वादलश्यामतनुं महार्हकिरीटरत्नाभरणाचितांगम् ॥ आरक्तकञ्जायतलोचनान्तं दृष्ट्वा ऽऽययुर्मोदमतीवपुण्याः॥२४॥

( पू. ) ऋषिभिः च ॥ ( मू. ) [ स्तुतिवाक्यानां ] मधुरध्वनिः शुश्रुवे. ॥ २१ ॥ (मू.) च [युक्ताः] वानराः [ प्रययुः ]. ॥ २२ ॥ ( पू. ) पुरीं प्रययौ. ॥ ते पुरवासिनः ( मू. ) ददृशुः. ॥ २३ ॥ पुण्याः ( मू. ) [ तं ] दृष्ट्वा, अतीव मोदं आययुः. ॥ २४ ॥

---

१ मधुर शब्द. २ ऐकूं येऊं लागला. ३ नागरिक जन. ४ तांबूस व कमलासारखे दीर्घ नेत्रप्रांत ज्याचे, अशा. ५ आनंदास.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

राम पिंवळें उंची वस्त्र नेसला असून त्यावर चित्रविचित्र रत्नांनीं खचलेला कमरपट्टा घातला होता. त्याचें वक्षःस्थल विशाल व पुष्ट होतें. कंठांत महामोल मोत्यांचे उत्तम हार घातले असल्यामुळें तो फार शोभत असे. सुग्रीव आदिकरून धीरप्रशांत स्वभावाचे वानर त्याची सेवा करीत होते; त्याचें तेज तर सूर्यासारखें दिसे; त्याच्या आंगाला कस्तूरीमिश्र चंदनाची उटी लाविली असून कंठांत कल्पवृक्षाच्या फुलांची माळ लोंबत होती. अशी राममूर्ति प्रजाजनांच्या दृष्टीस पडली. ॥ २९ ॥ २६ ॥ रामाची स्वारी मार्गानें चालली आहे असें कानीं पडल्याबरोबर पराकाष्ठेचा हर्ष वाटल्यामुळें अयोध्येंतील स्त्रियांच्या मुखावर अतिशय टवटवी

विचित्ररत्नाञ्चितसूत्रनद्धपीताम्बरं पीनभुजान्तरालम् ॥ अनर्घ्यमुक्ताफलदिव्यहारैर्विरोचमानं रघुनन्दनं प्रजाः ॥२५॥ सुग्रीवमुख्यैर्हरिभिः प्रशान्तैर्निषेव्यमाणं रवितुल्यभासम् ॥ कस्तूरिकाचन्दनलिप्तगात्रं निवीतकल्पद्रुमपुष्पमालम् ॥ २६॥ श्रुत्वा स्त्रियो राममुपागतं मुदा प्रहर्षवेगोत्कलिताननश्रियः ॥ अपास्य सर्वं गृहकार्यमाहितं हर्म्याणि चैवारुरुहुः स्वलंकृताः ॥ २७ ॥

प्रजाः ( २९ मू. ) प्रशान्तैः ( २६ मू. ) रघुनन्दनं [ ददृशुः ]. ॥ २५ ॥ २६ ॥ रामं उपागतं ( पू. ) स्त्रियः आहितं सर्वं गृहकार्यं अपास्य, स्वलंकृताः [ सत्यः ] ( मू. ). ॥ २७ ॥

१ विचित्र रत्नखचित कटिसूत्रानें बांधिला पीतांबर ज्याचा, अशा. २ पुष्ट बाहुमध्य ( वक्षस्थल) ज्याचा, अशा. ३ महामोल मोत्यांच्या दिव्य हारांनीं. ४ शोभणाऱ्या. ५ कंठांत घातली कल्पवृक्षाच्या फुलांची माळ ज्यानें, अशा. ६ आनंदभराच्या योगें अतिशय वाढली मुखशोभा ज्यांची, अशा. ७ पुढें असलेलें; हातीं घेतलेलें; अगत्याचें. ८ टाकून. ९ वाड्यांवर. १० चढल्या.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आली. त्या, हातांत घेतलेलीं घरांतील कामें तशींच टाकून व भराभरा अलंकार भूषणें घालून, - रामाला पाहण्यासाठीं - वाड्यांवर चढल्या. ॥ २७ ॥ रामाची आकृति सर्वांच्या दृष्टींना आनंद देणारी होती. तो दृष्टीस पडला तेव्हां स्त्रियांचीं मुखें विकसित व सुंदर दिसूं लागलीं. आनंदमूर्ति राम दर्शन घेणारांच्या नेत्रांला व मनाला प्रेम करण्याचा योग्य विषय वाटे. स्त्रियांनीं त्याच्यावर फुलें उधळलीं, नेत्रांच्या योगें त्याचें रूप पुष्कळपणें पाहिलें व मनांनीं त्याला आलिंगन दिलें. ॥ २८ ॥ इकडे, प्रभु भक्तसंकटनाशन रामचंद्रही, हास्ययुक्त व प्रेमळ अशा दृष्टीच्या योगें प्रजाजनांकडे अवलोकन करीत, हळूहळू पित्याच्या मंदिराजवळ येऊन पोंचला. ह्यावेळीं लोकांना, तो सर्वांचा पितामह दुसरा ब्रह्मदेवच आहे कीं काय, असें वाटलें ( आजा नातवाकडे जशा दृष्टीनें पाहतो तशाच प्रेमळ दृष्टीनें राम प्रजांकडे पाहत होता ). त्या उ-

दृष्ट्वा[1] हरिं सर्वदृगुत्सवाकृतिं पुष्पैः किरन्त्यः[2] स्मितशोभिताननाः ॥ दृग्भिः पपुर्नेत्रमनोरसायनं[3] स्वानन्दमूर्तिं मनसाऽभिरेभिरे[4] ॥ २८ ॥ रामः स्मितस्निग्धदृशा[5] प्रजास्तथा पश्यन्प्रजानाथ[6] इवापरः प्रभुः ॥ शनैर्जगामाथ पितुः स्वलंकृतं गृहं महेन्द्रालयसन्निभं[7] हरिः ॥ २९ ॥

सर्वदृगुत्सवाकृतिं हरिं ( पू. ) ॥ [ ताः ] ( मू. ) [ रामं ] दृग्भिः पपुः, मनसा अभिरेभिरे. ॥२८॥ तथा हरिः रामः ( पू. ) प्रजानाथः इव ॥( मू. ) पितुः गृहं शनैः जगाम. ॥ २९ ॥

---

१ सर्वांच्या नेत्रांना आनंद देणारें रूप ज्याचें, अशा. २ वृष्टि करणाऱ्या. ३ नेत्रांना व मनाला प्रेमपाझर उत्पन्न करणाऱ्या. ४ आलिंगित्या झाल्या. ५ हास्ययुक्त प्रेमळ दृष्टीच्या योगें. ६ प्रजांचा धनी ( ब्रह्मदेव ). ७ मोठ्या इंद्रभुवनासारख्या.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

त्सवप्रसंगीं राजमंदिर इंद्रभुवनाप्रमाणें शृंगारिलें होतें. ॥ २९ ॥ तो रघुकुलदीपक रामचंद्र वाड्यांत शिरल्यावर एका अभ्यंतरगृहांत उतरला. त्यानें तेथें प्रथम आनंदानें आपल्या मातेच्या चरणांस वंदन केलें व मग पित्याच्या सर्व पत्न्यांना ( सावत्र आयांना ) अनुक्रमानें भक्तिपूर्वक नमस्कार केले. ॥ ३० ॥ राम जसें बोले तसें चरित्र करून दाखवी. त्यानें नंतर भरताला सांगितलें :– 'भरता! माझें सर्व संपत्तींनीं भरलेलें उत्तम मंदिर, ॥ ३१ ॥ माझा मित्र वानरांचा राजा जो सुग्रीव, त्याला राहावयास, दे तसेंच दुसऱ्याही सर्व मंडळींना सुखानें राहतां येईल अशा सोईचीं मंदिरें देण्याची व्यवस्था लाव.' ॥ ३२ ॥ रामानें अशी आज्ञा दिली असतां भरतानें तीप्रमाणें सर्व व्यवस्था केली. नंतर महातेजस्वी असा तो रामाचा धाकटा भाऊ सुग्री-

प्रविश्य वेश्मान्तरसंस्थितो[1] मुदा रामो ववन्दे चरणौ स्वमातुः ॥ क्रमेण सर्वाः पितृयोषितः प्रभुर्ननाम भक्त्या रघुवंशकेतुः[2] ॥ ३० ॥ ततो भरतमाहेदं रामः सत्यपराक्रमः ॥ सर्वसम्पत्समायुक्तं मम मन्दिरमुत्तमम् ॥३१॥ मित्राय वानरेन्द्राय सुग्रीवाय प्रदीयताम् ॥ सर्वेभ्यः सुखवासार्थं मन्दिराणि प्रकल्पय[3] ॥ ३२ ॥ रामेणैवं समादिष्टो[4] भरतश्च तथाऽकरोत् ॥ उवाच च महातेजाः सुग्रीवं राघवानुजः ॥ ३३ ॥

( पू. ) चरणौ मुदा ववन्दे. रघुवंशकेतुः प्रभुः ( मू. ) ननाम. ॥ ३० ॥ ( पू. ) रामः भरतं, इदं आह – '( मू. ) मन्दिरं मम ( ३२ मू. ).' ॥ ३१ ॥ ३२ ॥ ( मू. ) सुग्रीवं उवाच – ॥ ३३ ॥

१ घरामध्यें उतरलेला. २ रघुवंशांतील उत्तम पुरुष. ३ सिद्ध कर. ४ आज्ञा दिलेला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

वाला ह्मणाला :- ॥३३॥ ' राजा ! रामचंद्राला अभिषेक करण्यासाठीं चार समुद्रांचें पवित्र उदक आणिलें पाहिजे. तुझे दूत त्वरित जाऊन येण्यासारखे आहेत. त्यांना लवकर ह्या कामाला पाठवून दे. ' ॥ ३४ ॥ सुग्रीवानें लागलीच जांबवान्, मारुति, अंगद आणि सुषेण अशा चौघांची रवानगी केली. ते वीर वायूसारख्या वेगानें जाऊन ॥ ३५ ॥ उदकानें भरलेले सुवर्णकलश घेऊन आले. तीर्थोदक आणिलें असतां मंत्र्यांसह शत्रुघ्नानें तें ॥ ३६ ॥ रामाला अभिषेक करण्यासाठीं वसिष्ठमुनींजवळ नेऊन दिलें. वसिष्ठमुनि वयोवृद्ध, ज्ञानवृद्ध व आचरणानें पवित्र होते. त्यांनीं अनेक ब्राह्मण बोलावून त्यांच्या साह्यानें ॥ ३७ ॥ सीतेसह रामचंद्राला रत्नसिंहासनावर बसविलें. वसिष्ठ, वामदेव, जाबालि, गौतम ॥ ३८ ॥

राघवस्याभिषेकार्थं चतुःसिन्धुजलं शुभम् ॥ आनेतुं प्रेषयस्वाशु दूतांस्त्वरितवि-
क्रमान् ॥ ३४ ॥ प्रेषयामास सुग्रीवो जाम्बवन्तं मरुत्सुतम् ॥ अंगदं च सुषेणं
च ते गत्वा वायुवेगतः ॥ ३५ ॥ जलपूर्णान् शातकुम्भकलशांश्च समानयन् ॥
आनीतं तीर्थसलिलं शत्रुघ्नो मन्त्रिभिः सह ॥३६॥ राघवस्याभिषेकार्थं वसिष्ठाय
न्यवेदयत् ॥ ततस्तु प्रयतो वृद्धो वसिष्ठो ब्राह्मणैः सह ॥ ३७ ॥ रामं रत्नमये
पीठे ससीतं संन्यवेशयत् ॥ वसिष्ठो वामदेवश्च जाबालिर्गौतमस्तथा ॥ ३८ ॥

' ( पू. ) चतुःसिन्धुजलं ॥ ( मू. ) दूतान् प्रेषयस्व. ' ॥ ३४ ॥ ( मू. ) प्रेषयामास. ते वायुवेगतः गत्वा, ॥ ३५ ॥ ( मू. ) आनीतं तीर्थसलिलं ॥ ३६ ॥ ( मू. ) ॥ ३७ ॥ ससीतं ( मू. ) ॥ ३८ ॥

१ चारी समुद्रांचें पाणी. २ पाठव. ३ सुवर्णाच्या कुंभांस. ४ शुद्ध. ५ आसनावर. ७ बसविता झाला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तसेच वाल्मीकि ह्या सर्वांनीं मिळून मोठ्या आनंदानें दर्भांचीं अग्रें व तुळशी ह्यांनीं युक्त अशा पवित्र सुगंधि उदकाच्या योगें रामाला अभिषेक केला. ॥ ३९ ॥ वसु इंद्राला अभिषेक करितात, त्याप्रमाणें त्या ऋषींनीं ऋत्विज, उत्तम ब्राह्मण, कन्या, मंत्रिमंडळ, आकाशांत उभे राहिलेले देव, व पार्षदगणांसह स्तुति करीत असलेले चार लोकपाल ह्या मंडळीसह सर्व ओषधींच्या रसाच्या योगें रामाला अभिषेक केला. ॥ ४० ॥ ४१ ॥ शत्रुघ्नानें रामाच्या मस्तकावर शुभ्र छत्र धरिलें. सुग्रीव आणि बिभीषण दोघेजण दोन

वाल्मीकिश्च तथा चक्रुः सर्वे रामाभिषेचनम् ॥ कुशाग्रतुलसीयुक्तपुण्यगन्धजलै-
र्मुदा ॥ ३९ ॥ अभ्यषिञ्चन्रघुश्रेष्ठं वासवं वसवो यथा ॥ ऋत्विग्भिर्ब्राह्मणैः
श्रेष्ठैः कन्याभिः सह मन्त्रिभिः ॥ ४० ॥ सर्वौषधीरसैश्चैव दैवतैर्नभसि स्थितैः ॥
चतुर्भिर्लोकपालैश्च स्तुवद्भिः सगणैस्तथा ॥ ४१ ॥ छत्रं च तस्य जग्राह शत्रुघ्नः
पाण्डुरं शुभम् ॥ सुग्रीवराक्षसेन्द्रौ तौ दधतुः श्वेतचामरे ॥ ४२ ॥

( मू. ) रामाभिषेचनं चक्रुः. ॥ ३९ ॥ यथा वसवः वासवं, तथा [सर्वे] श्रेष्ठैः (४० उ.बा. ४१ पू.) दैवतैः, ॥ स्तुवद्भिः सगणैः ( मू. ) सह सर्वौषधिरसैः रघुश्रेष्ठं अभ्यषिंचन. ॥ ४०॥४१ ॥ शत्रुघ्नः ( पू. ) छत्रं जग्राह. ॥ तौ ( मू. ) दधतुः. ॥ ४२ ॥

१ दर्भांचीं अग्रें, तुळसी ह्यांनीं युक्त अशा पवित्र सुगंधी उदकाच्या योगें. २ इंद्राला. ३ आकाशांत. ४ परिवारासहित. ५ धरिते झाले.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

स्वच्छ चंवऱ्या वारीत उभे राहिले. ॥ ४२ ॥ इंद्राच्या सांगण्यावरून वायूनें रामचंद्राला एक सुवर्णमाला दिली. स्वतां इंद्रानें राजाला ( रामाला ), भक्तिपूर्वक, एक सर्व जातींच्या रत्नांनीं गुंफलेला व सुवर्णानें सुशोभित केलेला हिऱ्यांचा हार दिला. देवलोकीं गंधर्व गायन करूं लागले. अप्सरांच्या समुदायांनीं नृत्य करण्यास प्रारंभ केला. ॥ ४३ ॥ ४४ ॥ देवांनीं नगारे वाजविले. आकाशांतून पुष्पवृष्टि पडूं लागली. रामाचें शरीर नूतन दूर्वांकुराप्रमाणें श्यामवर्ण होतें; नेत्र कमलपत्रासारखे लांब दिसत; ॥ ४५ ॥ मस्तकावर कोटि सूर्यासारखा तेजस्वी मुकुट घातला असल्यामुळें तो फारच शोभत होता; त्याचें सौंदर्य

मालां च काञ्चनीं वायुर्ददौ वासवचोदितः ॥ सर्वरत्नसमायुक्तं मणिकाञ्चनभूषितम् ॥ ४३ ॥ ददौ हारं नरेन्द्राय स्वयं शक्रस्तु भक्तितः ॥ प्रजगुर्देवगन्धर्वा ननृतुश्चाप्सरोगणाः ॥ ४४ ॥ देवदुन्दुभयो नेदुः पुष्पवृष्टिः पपात खात् ॥ नवदूर्वादलश्यामं पद्मपत्रायतेक्षणम् ॥ ४५ ॥ रविकोटिप्रभायुक्तकिरीटेन विराजितम् ॥ कोटिकन्दर्पलावण्यं पीताम्बरसमावृतम् ॥ ४६ ॥

( ४३ पू. ) वायुः काञ्चनीं मालां ददौ. ॥ शक्रः तु स्वयं भक्तितः (४३ उ.) हारं नरेन्द्राय ददौ. देवगन्धर्वाः ( ४४ पू. ) च ननृतुः. ॥ ४३॥४४॥ ( पू. ) पुष्पवृष्टिः पपात. (पू.) ॥४५॥ (पू.)४६॥

१ इंद्रानें प्रेरिलेला. २ सुवर्णाच्या. ३ इंद्र. ४ गाऊं लागले. ५ नाचूं लागले. ६ आकाशांतून.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

अभिषिक्त रामाचें रूप, तेज व ऐश्वर्य.

मदनापेक्षां कोटिपट अधिक होतें; त्यानें पीतांबर परिधान केला होता; ॥ ४६ ॥ आंगावर सर्वत्र दिव्य अलंकार घातलेले व दिव्य चंदनाची उटी लावलेली – असा तो रघुकुमार दहासहस्र सूर्यांप्रमाणें तेजःपुंज दिसे. - त्याची आकृति महाविष्णूसारखी होती; भेद काय तो एवढाच कीं, - ह्याला दोन हात होते; ॥४७॥ त्याच्या डाव्या बाजूला सीता बसली होती; तिची अंगकांति सुवर्णासारखी होती, ती आपल्या आंगावर सर्व अलंकार घालून रामाच्या डाव्या मांडीवर बसली होती; ॥४८॥ तिनें आपल्या कमळासारख्या हातांत एक तांबडें कमळ घेतलें होतें; राम तिला डाव्या हातानें आलिंगन देऊन बसला होता; तो जगांतील सर्व सुंदर व्यक्तींपेक्षां अत्यंत शोभायुक्त दिसे. पार्वतीसह शंकराच्या मनांत त्याच्याविषयीं पूर्ण भक्ति नित्य वसत असते. ह्यावेळचें रूप पाहून - तर शंकराला स्तुति करण्याची उत्सुकता वाटूं लागली. - ह्मणून त्या

दिव्याभरणसंपन्नं दिव्यचन्दनलेपनम् ॥ अयुतादित्यसंकाशं द्विभुजं रघुनन्दनम् ॥ ४७ ॥ वामभागे समासीनां सीतां काञ्चनसन्निभाम् ॥ सर्वाभरणसंपन्नां वामांके समुपस्थिताम् ॥ ४८ ॥ रक्तोत्पलकराम्भोजां[1] वामेना[2]लिंग्य संस्थितम् ॥ सर्वातिशयशोभाढ्यं दृष्ट्वा भक्तिसमन्वितः ॥ ४९ ॥ उमया सहितो देवः शंकरो रघुनन्दनम् ॥ सर्वदेवगणैर्युक्तः स्तोतुं समुपचक्रमे ॥ ५० ॥

( ४७।४८ मू. ४९ पू. ) सीतां वामेन [ करेण ] आलिङ्ग्य संस्थितं ( ४९ उ. ) रघुनन्दनं दृष्ट्वा भक्तिसमन्वितः ॥ ४७ ॥ ४८ ॥ ४९ ॥ ( मू. ) शङ्करः रघुनन्दनं स्तोतुं समु[3]पचक्रमे – ॥ ५० ॥

१ तांबडें कमळ करकमळांत जिच्या, अशी. २ डाव्या. ३ आरंभ करिता झाला.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

देवानें ( शंकरानें ), सकल देवगणांना बरोबर घेऊन, रामाची स्तुति करण्यास प्रारंभ केला: — ॥४९॥५०॥
महादेव ह्मणाले :– “ सीतेसह रामचंद्राला नमस्कार असो. सीता हा मायाशक्तीचा अवतार होय. रामाचें शरीर निळ्या कमळाप्रमाणें श्यामवर्ण व कोमल दिसतें; तो महातेजस्वी पुरुष सांप्रत किरीट, हार व बाजुबंद हे अलंकार घालून सिंहासनावर बसला आहे. ॥ ५१ ॥ रामा ! तुला आदि, मध्य व अंत नाहींत; कारण, तूं एकटा आपल्या मायेच्या योगें ह्या लोकसमूहाला उत्पन्न करितोस, ह्याचें रक्षण करितोस आणि शेवटीं ह्याचा संहारही करितोस. इतकें केलेंस तरी पुन्हां तुला त्या कार्यांपासून लेप होत किंवा दोष लागत नाहीं; कारण, तूं स्वस्वरूपसुखांत नित्य रममाण असतोस. तूं सर्वथा निर्दोष आहेस. ॥ ५२ ॥ तूं आपल्याला शरण आलेल्या भक्तांना मोक्ष देण्यासाठीं, मुद्दाम गुणांचें पांघरूण घेऊन, देव मनुष्यें इत्यादि अनेक अवतार

श्रीमहादेव उवाच ॥ नमो ऽस्तु रामाय सशक्तिकाय नीलोत्पलश्यामलकोमला-
य ॥ किरीटहारांगदभूषणाय सिंहासनस्थाय महाप्रभाय ॥ ५१ ॥ त्वमादिमध्या-
न्तविहीन एकः सृजस्य[2]वस्य[3]त्सि[4] च लोकजातम् ॥ स्वमायया तेन न लिप्यसे
त्वं यत्स्वे सुखे ऽजस्ररतो ऽनवद्यः ॥ ५२ ॥ लीलां विधत्से गुणसंवृतस्त्वं प्रपन्नभ-
क्तानुविधानहेतोः॥नानावतारैः सुरमानुषाद्यैः प्रतीयसे ज्ञानिभिरेव नित्यम् ॥५३॥

श्रीप० उ० — ‘ ( मू. ) रामाय नमः अस्तु. ॥ ५१ ॥ आदिमध्यान्तहीनः एकः त्वं स्वमायया लोकजातं[1] ( मू. ) अनवद्यः[5] त्वं स्वे सुखे अजस्ररतः[6] [ असि ]. ॥ ५२ ॥ ( पू. ) सुरमानुषाद्यैः नानावतारैः लीलां विधत्से. [ एवंभूतः त्वं ] ( मू. ) प्रतीयसे[7]. ॥ ५३ ॥

---

१ लोकसमूहाला. २ उत्पन्न करितोस. ३ रक्षितोस. ४ अत्सि संहार करितोस. ५ निर्दोष. ६ नित्य रमलेला. ७ समजतोस.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

धरितोस व लीला करितोस (तुला अवतार घेण्याचें कारण एवढेंच कीं, भक्तांनीं त्या अवतारांतील कथा गाव्या व ऐकाव्या ह्मणजे त्यांचीं पापें क्षीण होतील व त्यांना मोक्ष मिळेल ). तुझें खरें रूप ( ईश्वर आहेस हें ) ज्ञानिजनांना मात्र कळतें - इतर लोक तुला सामान्य मनुष्य समजतात. - ॥ ५३ ॥ तूं प्रथम आपल्या रूपाच्या एका अंशेंकरून हे सगळे लोक उत्पन्न केलेस. तूंच शेषरूपानें खालीं राहून त्यांला उचलून धारितोस. तसेंच वर सूर्य, वायु, चंद्र, ओषधि ( धान्यें ) पर्जन्य ह्या रूपांनीं अनेक प्रकारें जगाचें रक्षण तूंच चालवितोस. ॥५४॥ ह्या सृष्टीमध्यें तूं प्राण्यांच्या शरीरांत जठराग्निरूपानें राहून त्यांनीं भक्षिलेलें सर्व अन्न नित्य पचवितोस. जठराग्नीला पचनाच्या कामीं पंचप्राणरूपी वायूचें साह्य असतें. एकंदरींत तूं आपल्या अखंड संतत रूपाच्या योगानें जगाचें पालन करितोस. ॥ ५५ ॥ ईश्वरा ! चंद्रामध्यें, सूर्यामध्यें व अग्नींत जें

स्वांशेन लोकं सकलं विधाय तं बिभर्षि च त्वं तदधः फणीश्वरः ॥ उपर्यथो भा-न्वनिलोडुपौषधीप्रवर्षरूपो ऽवसि नैकधा जगत् ॥५४॥ त्वमिह देहभृतां शिखि-रूपः पचसि भुक्तमशेषमजस्रम् ॥ पवनपञ्चकरूपसहायो जगदखण्डमयेन बिभर्षि ॥५५॥ चन्द्रसूर्यशिखिमध्यगतं यत्तेज ईश चिदशेषतनूनाम् ॥ प्राभवत्तनुभृतामिह धैर्यं शौर्यमायुरखिलं तव सत्त्वम् ॥ ५६ ॥

त्वं स्वांशेन सकलं ( पू. ) बिभर्षि. ॥ अथो ( मू. ) [त्वं] नैकधा जगत् अवसि. ॥ ५४ ॥ ( पू. ) त्वं अशेषं भुक्तं अजस्रं पचसि. ॥ पवनपंचकरूपसहायः [ त्वं ] ( मू. ). ॥ ५५ ॥ ईश, ( पू. ), या अशेषतनूनां चित्, [ यत् च ] इह ( मू. ) आयुः [ च तत् ] तव सत्त्वं प्राभवत्. ॥ ५६ ॥

१ धारण करितोस. २ सूर्य, वायु, चंद्र, ओषधि ( धान्यें ) व पर्जन्य हीं रूपें ज्यांचीं, असा. ३ अग्निरूपी. ४ ज्ञान.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तेज आहे, सर्व प्राण्यांच्या अंतरीं जो चैतन्यांश असतो आणि जीवांना धैर्य, शौर्य, आयुष्य ह्मणून जें कांहीं असतें, ती सर्व तुझी सत्ता होय ( तें सगळें तुझ्या रूपापासून उत्पन्न होतें. ) ॥ ५६ ॥ लोकांना तुझ्या रूपाचे ब्रह्मदेव, शिव, विष्णु, हे भेद व काल, कर्म, चंद्र, सूर्य हे विभाग दिसून येतात : - ते ह्यांपैकीं कोणत्या तरी एका रूपाची उपासना करितात : त्यांना स्वतांचें आराध्य रूप हेंच काय तें परमश्रेष्ठ वाटतें व बाकीचीं रूपें - त्याहून भिन्न आहेत असा भास होतो : ह्या कारणामुळें ते दुसऱ्या रूपाची आराधना करणाऱ्या संप्रदायाच्या लोकांशीं वाद करूं लागतात. पण परमेश्वरा ! वस्तुतः तूं एक परब्रह्म रूप आहेस, ब्रह्मदेवादि तुजहून भिन्न नाहींत, हाच सिद्धांत होय. ॥ ५७ ॥ ज्याप्रमाणें तुझे एकट्याचे मत्स्यादि दहा अवतार श्रुतींमध्यें, पुराणांत आणि लोकांत प्रसिद्ध आहेत, तसेच सद्रूप ब्रह्म आणि त्याहून वेगळें असत् विश्व हे विभाग तुझेच आहेत. तुजहून वेगळें कांहीं नाहीं. ॥ ५८ ॥ ह्या अपरंपार सृष्टीमध्यें जें जें उत्पन्न झालें, पुढें उद्भवणार व सध्यां स्थावरजंगमादिकांत निर्माण होत आहे,

त्वं विरिञ्चशिवविष्णुविभेदात्कालकर्मशशिसूर्यविभागात् ॥ वादिनां पृथगिवेश विभासि ब्रह्म निश्चितमनन्यदिहैकम् ॥ ५७ ॥ मत्स्यादिरूपेण यथा त्वमेकः श्रुतौ पुराणेषु च लोकसिद्धः ॥ तथैव सर्वं सदसद्विभागस्त्वमेव नान्यद्भवतो विभाति ॥५८॥ यद्यत्समुत्पन्नमनन्तसृष्टावुत्पत्स्यते यच्च भवच्च यच्च ॥ न दृश्यते स्थावरजंगमादौ त्वया विना ऽतः परतः परस्त्वम् ॥ ५९ ॥

ईश, इह (मू.) ब्रह्म [त्वं इति] निश्चितं. ॥५७॥ एकः त्वं यथा (मू.) अन्यत् न विभाति. ॥ ५८ ॥ अनन्तसृष्टौ ( पू. ) उत्पत्स्यते, यत् भवत्, [तत्] ( मू. ) न दृश्यते; अतः त्वं परतः परः. ॥ ५९ ॥

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

त्यात्यामध्यें तुजहून भिन्न असें कांहींच दिसत नाहीं. अर्थात तूं, सर्वांहून श्रेष्ठ जो हिरण्यगर्भ, त्याहूनही श्रेष्ठ आहेस. ॥ ५९ ॥ हे सकल जन तुझ्या मायेनें वेष्टिलेले ( मोहून टाकलेले ) आहेत ह्मणून ह्यांना तुझ्या परमात्मरूपाचें तत्त्वज्ञान होत नाहीं. तुझ्या भक्तांची आराधना करून ज्यांचीं अंतःकरणें पवित्र झालीं असतात त्यांना सर्वव्यापी महासमर्थ असें अद्वितीय परमात्मरूप कळून येतें. ॥ ६० ॥ ब्रह्मदेवादिकांचीं चित्तें देखील बाह्य विषयांवरच गुंतून पडतात व त्यांना सुद्धां तुझ्या ज्ञानमय आत्मतत्त्वाचें ज्ञान होत नाहीं; - तेव्हां सामान्य लोकांना तें कळेल कोठून ? - ह्मणून, जर अज्ञानी ( ज्ञान मिळविण्यास असमर्थ ) जीव - ज्ञानप्राप्तीच्या खटपटींत न पडतां - तुझ्या ह्या रूपाचें मनापासून भजन करीत राहिला तरच त्याचीं दुःखें नाश पावतात व त्याला मुक्ति मिळते. ॥ ६१ ॥ मी तुझ्या नामाचा जप करितों व तेवढ्यांत कृता-

तत्त्वं न जानन्ति परात्मनस्ते जनाः समस्तास्तव मायया ऽतः ॥ त्वद्भक्तसेवाऽमलमानसानां विभाति तत्त्वं परमेकमैशम् ॥ ६० ॥ ब्रह्मादयस्ते न विदुः स्वरूपं चिदात्मतत्त्वं बहिरर्थभावाः ॥ ततो ऽबुधस्त्वामिदमेव रूपं भक्त्या भजन्मुक्तिमुपैत्यदुःखः ॥ ६१ ॥ अहं भवन्नाम गृणन्कृतार्थो वसामि काश्यामनिशं भवान्या ॥ मुमूर्षमाणस्य विमुक्तये ऽहं दिशामि मन्त्रं तव राम नाम ॥ ६२ ॥

समस्ताः ( पू. ) अतः परमात्मनः ते तत्त्वं न जानन्ति; ( मू. ) तत्त्वं विभाति. ॥ ६० ॥ बहिरर्थभावाः ( पू. ) ते स्वरूपं न विदुः. ॥ ततः अबुधः इदं एव रूपं ( मू. ) [सन्] मुक्तिं उपैति. ॥६१॥ अहं अनिशं (पू.) [सन्] भवान्या [सह] काश्यां वसामि. ॥ राम, अहं (मू.) मन्त्रं दिशामि. ॥६२॥

१ बाह्य विषयांवर गुंतणारे. २ मरणोन्मुख. ३ देतों.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

र्थता मानून पार्वतीसह काशीक्षेत्रांत निरंतर राहतों. रामा! हें तर माझें व्रतच आहे कीं, त्या क्षेत्रांत जो प्राणी मरणोन्मुख झाला असेल त्याला, मोक्ष प्राप्त व्हावा एवढ्यासाठीं, तुझ्या नाममंत्राचा उपदेश द्यावयाचा. ॥ ६२ ॥ रामा! - मला आतां एवढा वर दे कीं, - जे कोणी लोक मी केलेलें हें स्तोत्र नित्य एकाग्र भक्ति-पूर्वक ऐकतील, गातील किंवा लिहितील, त्यांवर तुझी कृपा व्हावी, त्यांना परमावधीचें सर्व सुख मिळावें व अंतीं तुझें पद प्राप्त व्हावें." ॥ ६३ ॥ इंद्र ह्मणाला :– 'देवा! त्या राक्षसाधिपतीला (रावणाला) ब्रह्मदे-वापासून वर मिळाला होता; व त्या वराच्या धमकीवर त्यानें माझें देवराज्यरूप सर्व सौख्य हिरावून घेतलें होतें. पण आतां तूं त्या राक्षसरूपी दुष्ट शत्रूचा वध केलास, ह्मणून तुझ्या कृपेमुळें मला तें सर्व सुख पुन्हां परत मिळालें. ' ॥ ६४ ॥ देव ह्मणाले :– ' हे मुरदैत्याचा वध करणाऱ्या विष्णो! ब्राह्मण आह्मांला यज्ञांत जे हविर्भाग देत, ते सगळे तो दुष्ट आदिदैत्य घेत असे. आतां तूं त्याचा वध केलास ह्मणून तुझ्या प्रसा-

इमं स्तवं नित्यमनन्यभक्त्या शृण्वन्ति गायन्ति लिखन्ति ये वै ॥ ते सर्वसौख्यं परमं च लब्ध्वा भवत्पदं यान्तु भवत्प्रसादात् ॥ ६३ ॥ इन्द्र उवाच । रक्षोधिपेनाखिलदेवसौख्यं हृतं च मे ब्रह्मवरेण देव ॥ पुनश्च सर्वं भवतः प्रसादात्प्राप्तं हतो राक्षसदुष्टशत्रुः ॥ ६४ ॥ देवा ऊचुः । हृता यज्ञभागा धरादेवदत्ता मुरारे खलेनादिदैत्येन विष्णो ॥ हतोऽद्य त्वया नो वितानेषु भागाः पुरावद्भविष्यन्ति युष्मत्प्रसादात् ॥ ६५ ॥

ये ( पू. ) [ च ], ॥ ते परमं ( मू. ) भवत्पदं यान्तु. ' ॥६३॥ इ० उ० – 'देव, ब्रह्मवरेण (मू.). [ यतः त्वया ] राक्षसदुष्टशत्रुः हतः. ' ॥ ६४ ॥ देवाः ऊ० – ' मुरारे, विष्णो, [ येन ] ( पू. ) धरादेवदत्ताः यज्ञभागाः हृताः, ॥ [ सः ] त्वया अद्य हतः ( मू. ) भविष्यन्ति. ' ॥ ६५ ॥

६।३६

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

दानें ते यज्ञभाग पूर्वींप्रमाणें आह्मांला मिळूं लागतील.'॥६५॥पितर ह्मणाले:–'हे महासमर्था! नुकताच तूं ज्या दैत्याचा नाश केलास, तो दुष्ट, गया इत्यादि क्षेत्रांत लोकांनीं आह्मांला दिलेले पिंड बलात्कारें घेऊन खात असे. फार काय सांगावें, तो आह्मा सर्वांना धरून मारी देखील! आतां आह्मांला ते पिंड मिळतील व मग पहिल्यासारखें सामर्थ्यही प्राप्त होईल.'॥६६॥यक्ष ह्मणाले:–'रामा! रावण आह्मांला नेहमीं बलात्कारें वेठीला लावी ह्मणून निरुपाय होऊन मोठ्या दुःखानें आह्मी त्याची पालखी वाहत असों! रघुवीरा! तूं त्या दुष्ट रावणाचा वध केलास व आह्मांला दुःखपरंपरांतून सोडविलेंस. - तुझे आह्मांवर अनंत उपकार झाले. -' ॥६७॥ गंधर्व ह्मणाले :– 'रामा! आह्मीं संगीतकलेंत निपुण आहों ह्मणून पूर्वीं तुझ्या कीर्तनामृताचें गायन करीत

पितर ऊचुः। हतो ऽद्य त्वया दुष्टदैत्यो महात्मन् गयादौ नरैर्दत्तपिण्डादिकान्नः॥ बलादत्ति हत्वा गृहीत्वा समस्तानिदानीं पुनर्लब्धसत्त्वा भवामः॥६६॥ यक्षा ऊचुः। सदा विष्टिकर्मण्यनेनाभियुक्ता वहामो दशास्यं बलाद्दुःखयुक्ताः॥ दुरात्मा हतो रावणो राघवेश त्वया ते वयं दुःखजाताद्विमुक्ताः॥६७॥गन्धर्वा ऊचुः। वयं संगीतनिपुणा गायन्तस्ते कथामृतम्॥ आनन्दामृतसन्दोहयुक्ताः पूर्णाः स्थिताः पुरा॥६८॥

पि० ऊ० – 'महात्मन्, [ यः ] समस्तान् नः हत्वा, ( पू. ) बलात् गृहीत्वा अत्ति, [ सः ] दुष्टदैत्यः त्वया अद्य हतः. [ तेन वयं ] ( मू. ).'॥ ६६ ॥ य० ऊ० – 'राघव ईश, अनेन बलात् ( पू. ) [ वयं ] दशास्यं वहामः. ॥ त्वया दुरात्मा रावणः ( मू. ).' ॥ ६७ ॥ गं० ऊ० – '( पू. ) गायन्तः वयं ॥ पुरा ( मू. ). ॥ ६८ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

आनंदामृताच्या पूरामध्यें बुडाल्याप्रमाणें कृतकृत्य होऊन राहत असों; ॥ ६८ ॥ रामा ! मागाहून त्या दुष्ट रावणानें आह्मांला बलात्कारें स्वाधीन करून घेतलें - तेव्हां आमचा निरुपाय झाला. - शेवटीं आह्मी त्याचेच गुण गाऊं लागलों व त्याच्या सेवेंत दक्ष ॥६९॥ राहिलों. देवा ! आतां तूं त्या दुष्ट राक्षसाला मारून आह्मांला संकटांतून सोडविलेंस ! ' अशाच रीतीनें मोठाले सर्प, सिद्ध, किन्नर, मरुद्गण, ॥ ७० ॥ वसु, मुनि, गाई, गुह्यक, पक्षी, प्रजापति, अप्सरांचे समुदाय – ॥ ७१ ॥ असे सकल जन रामाला भेटून, नेत्रांना परमानंद देणारें त्याचें रूप पाहत राहिले. रामानें त्यांना वंदन केलें. नंतर ते वेगवेगळ्या प्रकारें रामाची स्तुति करून ॥ ७२ ॥ आपआपल्या लोकीं परत गेले. तसेच ब्रह्मदेव, रुद्र इत्यादि देव आनंदानें रामाची स्तुति करून

पश्चाद्दुरात्मना राम रावणेनाभिविद्रुताः ॥ तमेव गायमानाश्च तदाराधनतत्पराः ॥ ६९ ॥ स्थितास्त्वया परित्राता हतो ऽयं दुष्टराक्षसः ॥ एवं महोरगाः सिद्धाः किन्नरा मरुतस्तथा ॥ ७० ॥ वसवो मुनयो गावो गुह्यकाश्च पतत्रिणः ॥ सप्रजापतयश्चैते तथा चाप्सरसां गणाः ॥ ७१ ॥ सर्वे रामं समासाद्य दृष्ट्वा नेत्रमहोत्सवम् ॥ स्तुत्वा पृथक् पृथक् सर्वे राघवेणाभिवन्दिताः ॥७२॥ ययुः स्वं स्वं पदं सर्वे ब्रह्मरुद्रादयस्तथा ॥ प्रशंसन्तो मुदा रामं गायन्तस्तस्य चेष्टितम् ॥७३॥

राम, ( पू. ) [ वयं ] ( मू. ) च ॥ ६९ ॥ ( पू. ) हतः.' ॥ (मू.) ॥७०॥ ( पू. ) तथा ( मू. ) च ॥ ७१ ॥ ( पू. ) दृष्ट्वा, ॥ पृथक्, पृथक् स्तुत्वा [ अतिष्ठन् ]. ( मू. ). ॥ ७२ ॥ [ते] तथा ( पू. ) मुदा रामं ( मू. ) गायन्तः [ सन्तः ] स्वं स्वं पदं ययुः. ॥ ७३ ॥

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

त्याचें चरित्र गात गात ॥ ७३ ॥ स्वर्लोकीं गेले. रामाचें शरीर अभिषेक झाल्यामुळें भिजलें होतें, त्याच्या जवळ सीता व लक्ष्मण हीं दोघें होतीं; तो राजाधिराज सिंहासनावर बसलेला दिसे खरा, पण वस्तुतः नित्य सर्वांच्या हृदयांत राहत असतो. तेथें आलेले सर्वजण अशा राममूर्तीचें अंतरीं चिंतन करीत परत गेले. ॥ ७४ ॥ आकाशांत वाद्यें वाजत होतीं; देवसमुदाय आनंदित अंतःकरणेंकरून स्तुति व पुष्पवृष्टि करीत होते. मुनिगणांनीं भोंवतीं उभें राहून स्तव चालविलाच होता. रामाच्या प्रसन्न मुखावर किंचित् हास्य खेळत असल्यामुळें तें फार रमणीय दिसे; त्याचें तेज सूर्यापेक्षां कोटिपट अधिक वाटे; सीता, लक्ष्मण, मारुति, ऋषि व वानर त्याच्या सेवेस तत्पर उभे राहिले होते; अशा वेळीं तो श्यामसुंदर राम फारच शोभूं लागला. ॥ ७५ ॥ इति श्रीमदध्यात्मरामायणार्थबोधे युद्धकाण्डे पंचदशः सर्गः ॥ १५ ॥

शंकर ह्मणाले :- पार्वति ! राजाधिराज रामचंद्र सर्व लोकांना सुख देत असे. त्याला अभिषेक झाला

ध्यायन्तस्त्वभिषेकार्द्रं सीतालक्ष्मणसंयुतम् ॥ सिंहासनस्थं राजेन्द्रं ययुः सर्वे हृदि स्थितम् ॥७४॥ खे वाद्येषु ध्वनत्सु प्रमुदितहृदयैर्देववृन्दैः स्तुवद्भिर्वर्षद्भिः पुष्पवृष्टिं दिवि मुनिनिकरैरीड्यमानः समन्तात् ॥ रामः श्यामः प्रसन्नस्मितरुचिरमुखः सूर्यकोटिप्रकाशः सीतासौमित्रिवातात्मजमुनिहरिभिः सेव्यमानो विभाति ॥७५॥ इति पञ्चदशः सर्गः॥१५॥श्रीम०उ०॥ रामेऽभिषिक्ते राजेन्द्रे सर्वलोकसुखावहे॥

सर्वे ( मू. ) राजेन्द्रं ध्यायन्तः [ सन्तः ] ययुः. ॥ ७४ ॥ खे वाद्येषु ध्वनत्सु [ सत्सु ], प्रमुदितहृदयैः पुष्पवृष्टिं वर्षद्भिः ( पू. ) च समन्तात् ईड्यमानः ॥ ( मू. ) रामः विभाति. ॥ ७५ ॥ इति युद्धकाण्डे पञ्चदशः सर्गः ॥ १५ ॥ ( पू. ) रामे अभिषिक्ते [ सति ], ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

तेव्हां पृथ्वीवर धान्याची समृद्धि झाली; वृक्ष फळांनीं भरून गेले; ॥ १ ॥ ज्या फुलांना गंध येत नसे, तीं देखील सुवासयुक्त होऊन शोभूं लागलीं. रामानें ब्राह्मणांना दहा सहस्र घोडे, आणि तितक्याच धेनु ( नुकत्याच व्यालेल्या गाई ) व गाई दिल्या. त्यानें प्रथम अनंत वृषभांचीं दानें करून मग पुन्हां तीस कोटि सुवर्णाचीं नाणीं ब्राह्मणांना वांटिलीं. ॥ २ ॥ ३ ॥ त्याचप्रमाणें रघुवीरानें ब्राह्मणांना वस्त्रें, अलंकार व रत्नें अर्पण केलीं. रामाच्या मनांत भक्तजनांविषयीं वात्सल्य फार होतें. त्यानें सुग्रीवाला, प्रीतिपुरःसर एक सर्व जातींच्या रत्नांनीं गुंफलेली माळ दिली; तिचें तेज सूर्याच्या कांतीसारखें दिसे. रघुकुमारानें अंगदाला एक दिव्य बाहुभूषणांचा जोड दिला. ॥४॥५॥ रघुकुलभूषणानें प्रीतिपूर्वक एक हिऱ्यांचा हार सीतेच्या

वसुधा सस्यसंपन्ना फलवन्तो महीरुहाः ॥१॥ गन्धहीनानि पुष्पाणि गंधवन्ति चकाशिरे ॥ सहस्रशतमश्वानां धेनूनां च गवां तथा ॥ २ ॥ ददौ शतवृषान्पूर्वं द्विजेभ्यो रघुनन्दनः ॥ त्रिंशत्कोटिं सुवर्णस्य ब्राह्मणेभ्यो ददौ पुनः ॥३॥ वस्त्राभरणरत्नानि ब्राह्मणेभ्यो मुदा तथा ॥ सूर्यकान्तिसमप्रख्यां सर्वरत्नमयीं स्रजम् ॥ ४ ॥ सुग्रीवाय ददौ प्रीत्या राघवो भक्तवत्सलः॥अंगदाय ददौ दिव्ये ह्यंगदे रघुनन्दनः ॥ ५ ॥ चन्द्रकोटिप्रतीकाशं मणिरत्नविभूषितम् ॥

(मू.) [जाताः]. महीरुहाः फलवन्तः [जाताः]. ॥१ ॥ ( २पू ). ॥ रघुनन्दनः (२मू.) गवां च सहस्रशतं, (३पू.) ददौ. पुनः सुवर्णस्य (मू.). ॥ २ ॥ ३ ॥ तथा मुदा (पू.) [ ददौ ]. ॥ ( मू. ) ॥ ४ ॥ ( मू. ) प्रीत्या अङ्गदाय दिव्ये अङ्गदे ददौ. ॥ ५ ॥ रघुकुलोत्तमः प्रीत्या सीतायै ( मू. ) ॥

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

गळ्यांत घातला; त्यांत मधून मधून शोभेसाठीं अनेक जातींचीं रत्नें गुंफिलीं होतीं; त्याचें तेज कोटि चंद्रां-प्रमाणें सौम्य व शांत दिसे. ॥ ६ ॥ जानकीनें आपल्या कंठांतील तो हार काढून हातीं घेतला : ती कांहीं वेळ हाराकडे पाही, मग सगळ्या वानरांकडे दृष्टि फेंकी आणि नंतर आपल्या पतीच्या मुखाकडे अवलोकन करी – असेंच तिनें दोन तीन वेळां केलें. ॥ ७ ॥ रामाला दुसऱ्याचा अभिप्राय तेव्हांच कळत असे. त्यानें सीतेकडे पाहून सांगितलें :– ‘ जानकि ! - तुझ्या मनांत हा हार कोणाला तरी द्यावयाचा आहे एवढेंच ना ? - सुंदरि ! ज्यानें तुला संतोषविलें असेल, त्याला हा खुशाल दे. ’ ॥ ८ ॥ सीतेनें रामाच्या समक्ष तो हार मारुतीला दिला. त्या हाराच्या प्रभेमुळें व सीतेनें सत्कार केला ह्मणून मुख प्रसन्न झाल्यामुळें मारुति फारच शोभूं लागला. ॥ ९ ॥ त्याची अत्यंत भक्ति पाहून राम त्याच्यावर नित्य संतुष्ट

सीतायै प्रददौ हारं प्रीत्या रघुकुलोत्तमः ॥ ६ ॥ अवमुच्यात्मनः कण्ठाद्धारं जनकनन्दिनी ॥ अवैक्षत हरीन्सर्वान् भर्तारं च मुहुर्मुहुः ॥ ७ ॥ रामस्तामाह वैदेहीमिंगितज्ञो विलोकयन् ॥ वैदेहि यस्य तुष्टा ऽसि देहि तस्मै वरानने ॥ ८ ॥ हनूमते ददौ हारं पश्यतो राघवस्य च ॥ तेन हारेण शुशुभे मारुतिर्गौरवेण च ॥ ९ ॥ रामो ऽपि मारुतिं दृष्ट्वा कृताञ्जलिमुपस्थितम् ॥ भक्त्या परमया तुष्ट इदं वचनमब्रवीत् ॥ १० ॥

( मू. ) प्रददौ. ॥ ६ ॥ जनकनन्दिनी ( पू. ) अवमुच्य ॥ सर्वान् (मू.) अवैक्षत. ॥ ७ ॥ इङ्गितज्ञः (पू.) [ सन् ] आह – ॥ ‘ वरानने, ( मू. ) देहि. ’ ॥ ८ ॥ राघवस्य पश्यतः [ सतः ], ( पू. ) ददौ. ॥ मारुतिः (मू.) शुशुभे. ॥ ९ ॥ ( पू. ) दृष्ट्वा, ॥ परमया भक्त्या तुष्टः [सन्] (मू.) – ॥१०॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

असे. मारुति अग्रभागीं हात जोडून उभा आहे असें पाहून रामही त्याला ह्मणाला :— १० ॥ ' हनुमंता ! मी तुला प्रसन्न आहें. इच्छित वर माग. मागशील ती वस्तु, त्रैलोक्यांत देवांनाही मिळण्यास कठिण असली तरी, मी तुला देईन. ' ॥ ११ ॥ हनुमंताच्याही अंतःकरणाला आनंद वाटला. त्यानें रघुवीराला वंदन करून ह्मटलें :— ' रामा ! मी नित्य तुझें नामस्मरण करीत असतों, तरी मला तृप्ति वाटत नाहीं. ॥ १२ ॥ ह्मणून, माझी अशी इच्छा आहे कीं, तुझ्या नामाचें नित्य स्मरण करीत भूतलावर राहावें; लोकांत तुझें नांव विद्यमान असेल, तावत्कालपर्यंत हें माझें शरीर राहो. राजाधिराजा ! हा वर माझ्या मनाला इष्ट वाटतो. ' रामानें ' बरें आहे ' ह्मणून सांगितलें कीं, तूं मुक्त आहेस; खुशाल सुखानें पृथ्वीवर राहत जा; ॥१३॥१४॥ कल्पाच्या समाप्तिकालीं तूं माझ्या रूपीं येऊन मिळशील ह्यांत संशय नाहीं. जानकीनें संतुष्ट होऊन मारुती-

हनूमंस्ते प्रसन्नोऽस्मि वरं वरय कांक्षितम् ॥ दास्यामि दैवैरपि यद्दुर्लभं भुवनत्रये ॥ ११ ॥ हनूमानपि तं प्राह नत्वा रामं प्रहृष्टधीः ॥ त्वन्नाम स्मरतो राम न तृप्यति मनो मम ॥ १२ ॥ अतस्त्वन्नाम सततं स्मरन् स्थास्यामि भूतले ॥ यावत्स्थास्यति ते नाम लोके तावत्कलेवरम् ॥ १३ ॥ मम तिष्ठतु राजेन्द्र वरोऽयं मेऽभिकांक्षितः ॥ रामस्तथेति तं प्राह मुक्तस्तिष्ठ यथासुखम् ॥ १४ ॥ कल्पान्ते मम सायुज्यं प्राप्स्यसे नात्र संशयः ॥

'(पू.) वरं वरय. ॥(मू.) यत् दुर्लभं, [तत्] दास्यामि.' ॥११॥ प्रहृष्टधीः (पू.) नत्वा प्राह —॥ 'राम, (मू.) मनः न तृप्यति. ॥१२॥ (१३पू.) स्थास्यामि. ॥ राजेन्द्र, (१३मू.)स्थास्यति, तावत् मम कलेवरं तिष्ठतु. अयं (१४पू.).'॥रामः 'तथा' इति[उक्त्वा]तं प्राह—'मुक्तः[सन्](मू)तिष्ठ.॥१३॥१४॥(पू.).'॥

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

ला आशीर्वाद दिला :– ' मारुते ! तूं कोठेंही ॥ १९ ॥ राहिलास तरी त्या ठिकाणीं, माझ्या आज्ञेस्तव, सर्व उपभोग तुझ्या पाठीस लागून येतील. ' ॥ उभयतां ईश्वरांनीं ( सीतेनें व रामानें ) असें सांगितलें तेव्हां मारुतीच्या मनाला हर्ष झाला. ॥१६॥ त्याचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून आले. त्यानें दोघांना अनेकवेळां प्रणाम केले. नंतर तो महाबुद्धिमान् वानर तपश्चर्या करण्यासाठीं हिमालय पर्वतावर गेला. रामाला सोडून जातेवेळीं त्याला अत्यंत अवघड वाटलें. ॥ १७ ॥ नंतर राम गुहाकडे वळला. तो हात जोडून उभा होता. रामानें त्याला सांगितलें :– ' मित्रा ! आतां तूं आपल्या अत्युत्तम व रम्य अशा शृंगवेरपुरास जा, ॥ १८ ॥ आणि स्वतां संपादन केलेले उपभोग भोगीत राहा. मात्र नित्य माझें चिंतन असूं दे, ह्मणजे अंतीं तुला माझी सरू-

तमाह जानकी प्रीता यत्र कुत्रापि मारुते ॥१५॥ स्थितं त्वामनुयास्यन्ति भोगाः सर्वे ममाज्ञया ॥ इत्युक्तो मारुतिस्ताभ्यामीश्वराभ्यां प्रहृष्टधीः ॥१६॥ आनन्दाश्रुपरीताक्षो भूयो भूयः प्रणम्य तौ ॥ कृच्छ्राद्ययौ तपस्तप्तुं हिमवन्तं महामतिः ॥ १७ ॥ ततो गुहं समासाद्य रामः प्राञ्जलिमब्रवीत् ॥ सखे गच्छ पुरं रम्यं शृंगवेरमनुत्तमम् ॥ १८ ॥ मामेव चिन्तयन्नित्यं भुंक्ष्व भोगान्निजार्जितान् ॥ अन्ते ममैव सारूप्यं प्राप्स्यसे त्वं न संशयः ॥ १९ ॥

प्रीता जानकी तं आह – ' मारुते, ( मू. ) ॥ १५ ॥ (पू.) भोगाः मम आज्ञया अनुयास्यन्ति. ' ॥ ताभ्यां ईश्वराभ्यां ( मू. ) [ बभूव ]. ॥१६॥ महामतिः सः (पू.) प्रणम्य, (मू.) ययौ. ॥१७॥ ततः रामः (पू) [तं] अब्रवीत् – ॥'(मू.)पुरं गच्छ. ॥१८॥ नित्यं (पू.) भोगान् भुंक्ष्व. त्वं (मू.). ॥ १९ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

पता मुक्ति मिळेल, ह्यांत संशय नाहीं.' ॥ १९ ॥ इतकें सांगून प्रभु रामानें त्याला दिव्य अलंकार दिले व विपुल राज्य देऊन आत्मतत्त्वज्ञानाचा उपदेश केला. ॥ २० ॥ पुढें, रामानें आलिंगन दिलें असतां, गुह आनंद पावून स्वगृहीं गेला. दुसरे जे मोठमोठाले वानर अयोध्येस आले होते, त्यांचीही ॥ २१ ॥ रघुवीरानें अमोल वस्त्रें व भूषणें देऊन, पूजा केली. सुग्रीवप्रभृति सर्व वानर व विभीषण ह्यांचाही ॥ २२ ॥ त्या प्रभु रामचंद्रानें, ज्याच्या त्याच्या योग्यतेनुसार, सत्कार केला. तेव्हां ते सगळे आनंदित होत्साते आल्या मार्गानें परतले. ॥ २३ ॥ सुग्रीवादि वानर आनंदानें किष्किंधेस गेले. विभीषणाला तर निष्कंटक ( शत्रुरहित ) राज्य मिळालें; ॥ २४ ॥ व रामानें त्याचा सत्कार केला, तेव्हां तो संतुष्ट होऊन लंकानगरीस गेला. विभी-

इत्युक्त्वा प्रददौ तस्मै दिव्यान्याभरणानि च ॥ राज्यं च विपुलं दत्वा विज्ञानं च ददौ विभुः ॥२०॥ रामेणालिंगितो हृष्टो ययौ स्वभवनं गुहः ॥ ये चान्ये वानराः श्रेष्ठा अयोध्यां समुपागताः ॥ २१ ॥ अमूल्याभरणैर्वस्त्रैः पूजयामास राघवः ॥ सुग्रीवप्रमुखाः सर्वे वानराः सविभीषणाः ॥ २२॥ यथार्हं पूजितास्तेन रामेण परमात्मना ॥ प्रहृष्टमनसः सर्वे जग्मुरेव यथागतम् ॥ २३ ॥ सुग्रीवप्रमुखाः सर्वे किष्किन्धां प्रययुर्मुदा ॥ विभीषणस्तु संप्राप्य राज्यं निहतकण्टकम् ॥ २४ ॥

विभुः ( पू. ) प्रददौ, ॥ विपुलं ( मू. ) ॥२०॥ ( पू. ) स्वभवनं ययौ. ॥ ये च अन्ये श्रेष्ठाः (मू.), ॥ २१ ॥ राघवः [ तान् ] ( पू. ) च पूजयामास. ॥ ( मू. ) वानराः ॥२२॥ ( पू. ) रामेण यथार्हं पूजिताः. ॥ ( मू. ) एव जग्मुः. ॥२३॥ (पू.) किष्किन्धां प्रययुः. ॥( मू. ) राज्यं सम्प्राप्य, ॥२४॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

षणाच्या वर्तणुकीला कोणीही नांव ठेवीत नसे. इकडे रामचंद्र सकल राज्याचें पालन करूं लागला. त्याच्या पोटीं प्रत्येक प्राण्याविषयीं वत्सलता वसत होती. ॥ २५ ॥ रामानें लक्ष्मणाला इच्छा नव्हती तरी बळेंच यौवराज्याभिषेक केला. तो (लक्ष्मण) परमभक्तिपुरःसर रामाची सेवा करण्यांत तत्पर असे. ॥२६॥ वास्तविक ह्मटलें तर राम सर्वांतर्यामी परमात्मा, सर्व कर्में प्रत्यक्ष पाहणारा, निर्मल, कर्तृत्वादिधर्मरहित, नित्य निर्विकार व ॥ २७ ॥ स्वस्वरूपाच्यायोगें सर्वदा संतुष्ट होता. तथापि त्या परमानंदरूप प्रभूनें, लोकांना वळण लावण्यासाठीं, सर्व प्रकारच्या यज्ञांचीं अनुष्ठानें केलीं, व त्यांत विपुल दक्षिणा दिल्या. कारण, मनुष्यासारखें शरीर स्वीकारिल्यामुळें - त्याला तसें करणें भाग पडलें. - ॥ २८ ॥ राम राज्य चालवीत असतांना—

रामेण पूजितः प्रीत्या ययौ लंकामनिन्दितः ॥ राघवो राज्यमखिलं शशासाखिलवत्सलः ॥ २५ ॥ अनिच्छन्नपि रामेण यौवराज्ये ऽभिषेचितः ॥ लक्ष्मणः परया भक्त्या रामसेवापरो ऽभवत् ॥२६॥ रामस्तु परमात्मा ऽपि कर्माध्यक्षो ऽपि निर्मलः ॥ कर्तृत्वादिविहीनो ऽपि निर्विकारो ऽपि सर्वदा ॥२७॥ स्वानन्देनापि तुष्टः सन् लोकानामुपदेशकृत् ॥ अश्वमेधादियज्ञैश्च सर्वैर्विपुलदक्षिणैः ॥ अयजत्परमानन्दो मानुषं वपुराश्रितः ॥ २८ ॥ न पर्यदेवन्विधवा न च व्यालकृतं भयम् ॥

अनिन्दितः ( पू. ) [ सन् ] प्रीत्या लङ्कां ययौ. ॥ अखिलवत्सलः ( मू. ) राज्यं शशास. ॥ २५ ॥ रामेण ( मू. ). ॥ २६ ॥ ( २७ पू. ) ॥ सर्वदा ( २७ मू. ) ( २८ मू. ) रामः सर्वैः विपुलदक्षिणैः अश्वमेधादियज्ञैः अयजत्. ॥ २७ ॥ २८ ॥ रामे राज्यं प्रशासति [ सति ], विधवाः ( पू. ) च न,



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

स्त्री वैधव्य आल्यामुळें रडत आहे असें कधीं झालें नाहीं, सर्पांची भीति नव्हती, कोणाला रोगपीडा झाली नाहीं, ॥ २९ ॥ लोकांमध्यें चोरांचें भय नव्हतें, कोणताही अनर्थ उद्भवत नसे, तसेंच वंशांतील वृद्ध मनुष्यें जिवंत असतां लहान मुलाला मृत्यूनें भिवविलें नाहीं; ॥ ३० ॥ सगळे लोक रामाच्या पूजेंत तत्पर व रामाच्या चिंतनांत दक्ष असत; मेघ योग्य कालीं लोकांना पाहिजे तशी उदकवृष्टि करीत; ॥ ३१ ॥ प्रजा स्वधर्माचरणांत गुंतलेल्या आणि आपल्या वर्णाला व आश्रमाला योग्य अशा गुणांनीं संपन्न होत्या. पिता औरस पुत्रांचें पालन करितो, त्याप्रमाणें रामही प्रजांचें रक्षण करीत असे. ॥ ३२ ॥ राम सर्वगुणसंपन्न व सर्वधर्मपरायण होता. त्यानें दहासहस्र वर्षेंपर्यंत राज्य चालविलें. ॥ ३३ ॥ हें अध्यात्म नांवाचें पवित्र

न व्याधिजं भयं चासीद्रामे राज्यं प्रशासति ॥ २९ ॥ लोके दस्युभयं नासीदनर्थो नास्ति कश्चन ॥ वृद्धेषु सत्सु बालानां नासीन्मृत्युभयं तथा ॥३०॥ रामपूजापराः सर्वे सर्वे राघवचिन्तकाः ॥ ववर्षुर्जलदास्तोयं यथाकालं यथारुचि ॥३१॥ प्रजाः स्वधर्मनिरता वर्णाश्रमगुणान्विताः ॥औरसानिव रामोऽपि जुगोप पितृवत्प्रजाः ॥ ३२ ॥ सर्वलक्षणसंयुक्तः सर्वधर्मपरायणः ॥ दशवर्षसहस्राणि रामो राज्यमुपास्त सः ॥ ३३ ॥ इदं रहस्यं धनधान्यऋद्धिमद्दीर्घायुरारोग्यकरं सुपुण्यदम् ॥

( मू. ) न आसीत्. ॥ २९ ॥ ( पू. ) अनर्थः न अस्ति. ॥ तथा ( मू. ) न आसीत्. ॥ ३० ॥ सर्वे (पू.) [ आसन् ]. ॥ ( मू. ) ववर्षुः. ॥ ३१ ॥ ( पू. ) [ बभूवुः ]. ॥ रामः अपि प्रजाः ( मू. ) जुगोप. ॥ ३२ ॥ ( पू. ) ॥ सः रामः ( मू. ). ॥ ३३ ॥ आदिशम्भुना पुरा ( मू. ). ॥

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रामायण पूर्वी आदिदेव जे शंकर त्यांनीं प्रसिद्ध केलें. त्याच्या आगोदर हें गुप्त होतें. ह्या अत्यंत पुण्यकारक ग्रंथाचा आदर करणाऱ्या मनुष्याला धन, धान्य, ऐश्वर्य, पुष्कळ आयुष्य, व आरोग्य प्राप्त होतें. ॥ ३४ ॥ जो मनुष्य अंतःकरणाचें समाधान ठेवून भक्तिपूर्वक हें आख्यान ऐकतो किंवा आनंदित मनानें वाचतो, त्याचे सकल मनोरथ पूर्ण होतात व तो क्षणमात्रांत कोट्यवधि पापांतून मुक्त होतो. ॥ ३५ ॥ ज्याला द्रव्य मिळावें अशी इच्छा असेल, त्या पुरुषानें शुद्ध होऊन रामाच्या राज्याभिषेकाचें हें आख्यान ऐकावें, ह्मणजे त्याला विपुल संपत्ति प्राप्त होईल. ज्याला पुत्र व्हावा अशी इच्छा असेल, त्यानें पहिल्यापासून सर्व रामायणाचा पाठ करावा, ह्मणजे त्याला विद्वान् लोकांत मान्य असा पुत्र होईल. ॥ ३६ ॥ राजानें अध्यात्मरामायण

पवित्रमाध्यात्मिकसञ्ज्ञितं पुरा रामायणं भाषितमादिशम्भुना ॥ ३४॥ शृणोति भक्त्या मनुजः समाहितो भक्त्या पठेद्वा परितुष्टमानसः ॥ सर्वाः समाप्नोति मनोगताशिषो विमुच्यते पातककोटिभिः क्षणात् ॥३५॥ रामाभिषेकं प्रयतः शृणोति यो धनाभिलाषी लभते महद्धनम् ॥ पुत्राभिलाषी सुतमार्यसंमतं प्राप्नोति रामायणमादितः पठन् ॥ ३६ ॥ शृणोति योऽध्यात्मिकरामसंहितां प्राप्नोति राजा भुवमृद्धसंपदम् ॥ शत्रून्विजित्यारिभिरप्रधर्षितो व्यपेतदुःखो विजयी भवेन्नृपः ॥३७॥

( मू. ). ॥ ३४ ॥ [ यः ] मनुजः समाहितः [ सन् ] भक्त्या [ एतत् ] ( पू. ) पठेद् वा, ॥ [सः] सर्वाः मनोगताः आशिषः ( मू. ) विमुच्यते. ॥ ३५ ॥ यः प्रयतः [ सन् ] ( पू. ), [ सः ] धनाभिलाषी [ चेत्, तर्हि ] महत् धनं लभते. ॥ ( मू. ) आर्यसम्मतं सुतं प्राप्नोति. ॥ ३६ ॥ यः राजा ( पू. ) शृणोति, [ सः ] नृपः ऋद्धसम्पदं भुवं प्राप्नोति, ( मू. ). ॥ ३७ ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

मूळ ऐकिलें तर त्याला धनधान्यसंपन्न पृथ्वीचें राज्य मिळतें, तो शत्रूंना जिंकितो, शत्रु त्याला भिववूं शकत नाहींत, त्या राजाचीं सकल दुःखें दूर होतात व त्याला सर्वत्र जय मिळतो. ॥ ३७ ॥ स्त्रियांनीं रामचरित्रावर झालेला हा ग्रंथ ऐकिला तर त्यांचीं मुलें जगतात, व त्यांना सर्वत्र मान मिळतो. भक्तियोगानें पूर्ण भरलेली ही कथा एखाद्या वंध्येनें ऐकिली तर तिला सुस्वरूप पुत्र होतो. ॥३८॥ जो मनुष्य क्रोधाला जिंकून व मत्सरबुद्धि सोडून विश्वासपूर्वक हा ग्रंथ ऐकेल किंवा वाचील, त्याची रामावर भक्ति जडेल, ता सकल संकटांतून पार पडेल, व निर्भय आणि सुखी होईल. ॥३९॥ पहिल्यापासून शेवटपर्यंत अध्यात्मरामायण ऐकणाऱ्या मनुष्यांना सकलही देव प्रसन्न होतात, त्यांचीं सकल विघ्नें दूर होतात व त्यांना सर्व उत्तम ऐश्वर्यें मिळतात. ॥ ४० ॥

स्त्रियोऽपि शृण्वन्त्यधिरामसंहितां भवन्ति ता जीवसुताश्च पूजिताः॥वन्ध्याऽपि पुत्रं लभते सुरूपिणं कथामिमां भक्तियुतां शृणोति या॥३८॥श्रद्धान्वितो यः शृणुयात्पठेन्नरो विजित्य कोपं च तथा विमत्सरः॥दुर्गाणि सर्वाणि विजित्य निर्भयो भवेत्सुखी राघवभक्तिसंयुतः॥३९॥ सुराः समस्ता अपि यान्ति तुष्टतां विघ्नाः समस्ता अपयान्ति शृण्वताम्॥ अध्यात्मरामायणमादितो नृणां भवन्ति सर्वा अपि संपदः पराः॥४०॥

याः स्त्रियः अपि अधिरामसंहितां ( पू. ) च भवन्ति. ॥ या वन्ध्या अपि भक्तियुतां इमां कथां शृणोति, [ सा ] ( मू. ) पुत्रं लभते. ॥ ३८ ॥ ( पू. ) विजित्य, तथा विमत्सरः, राघवभक्तिसंयुतः च [ सन् ] शृणुयात्, पठेत् [वा, सः] ॥ सर्वाणि (मू.) भवेत्. ॥ ३९॥ आदितः अध्यात्मरामायणं शृण्वतां नृणां समस्ताः (पू.) यान्ति, समस्ताः विघ्नाः अपयान्ति, (मू.) सम्पदः [च] भवन्ति.॥४०॥

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

रजस्वला स्त्रीनें रामाकडे एकाग्र मन लावून हें रामायण आरंभापासून ऐकिलें तर तिच्या पोटीं चिरायुषी श्रेष्ठ पुत्र उत्पन्न होतो; ती पातिव्रत्यापासून ढळत नाहीं, अर्थात लोक तिला मोठा मान देतात.॥ ४१ ॥ जे लोक भक्तिपूर्वक पूजा करून रामायणाला नित्य वंदन कारितात, ते सर्व पापांपासून मुक्त होऊन विष्णूच्या श्रेष्ठ पदास पावतात. ॥ ४२ ॥ जे पुरुष सगळें अध्यात्मरामायण भक्तीनें ऐकितात किंवा स्वतां मुखतः पठण करितात, त्यांना राम प्रसन्न होतो. ॥ ४३ ॥ राम साक्षात् परब्रह्म होय : तो सर्वांतर्यामी ईश्वर

रजस्वला वा यदि रामतत्परा शृणोति रामायणमेतदादितः ॥ पुत्रं प्रसूते ऋषभं चिरायुषं पतिव्रता लोकसुपूजिता भवेत् ॥ ४१ ॥ पूजयित्वा तु ये भक्त्या नमस्कुर्वन्ति नित्यशः॥ सर्वैः पापैर्विनिर्मुक्ता विष्णोर्यान्ति परं पदम् ॥ ४२ ॥ अध्यात्मरामचरितं कृत्स्नं शृण्वन्ति भक्तितः ॥ पठन्ति वा स्वयं वक्त्रात्तेषां रामः प्रसीदति ॥४३॥ राम एव परं ब्रह्म तस्मिंस्तुष्टे ऽखिलात्मनि ॥ धर्मार्थकाममोक्षाणां यद्यदिच्छति तद्भवेत् ॥ ४४ ॥

( पू. ) [ सती ] यदि एतत् रामायणं आदितः शृणोति, ॥ [तर्हि] ऋषभं चिरायुषं ( मू. ) पतिव्रता [ च ] भवेत्. ॥ ४१ ॥ ये [ पुस्तकं ] ( पू. ) नमस्कुर्वन्ति, ॥ [ ते ] ( मू. ) [ सन्तः ] विष्णोः परं पदं यान्ति. ॥ ४२ ॥ ये कृत्स्नं ( पू. ) शृण्वन्ति, स्वयं वा वक्त्रात् ( मू. ). ॥ ४३ ॥ ( पू. ) [ रामे ] तुष्टे [ सति ], ( मू. ). ॥ ४४ ॥

१ श्रेष्ठ. २ दीर्घ आयुष्य ज्याचें, अशा. ३ प्रसवते. ४ सर्व. ५ मुखांतून.



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

...ला असतां मनुष्याला धर्म, अर्थ, काम, मोक्ष ह्यांपैकीं ज्याबद्दल इच्छा असेल, तें तें प्राप्त होतें. ...॥ हें रामायण प्रतिदिनीं खंड पडूं न देतां नियमानें ऐकत जावें. ह्यापासून मनुष्याला आयुष्य व आरोग्य मिळतें, आणि त्याचीं कोटिकल्पांत घडलेलीं पापें नाश पावतात. ॥ ४५ ॥ रामायण ऐकिलें असतां मनुष्याला सर्व देव, ग्रह, सकल ऋषि व तसेच पितर प्रसन्न होतात. ॥ ४६ ॥ ह्या अध्यात्मरामायण नांवाच्या अद्भुत प्राचीन ग्रंथांत वैराग्याच्या व तत्त्वज्ञानाच्या गोष्टी भरलेल्या आहेत. जे लोक ह्या जन्मांत हा ग्रंथ वाचतात, ऐकितात, किंवा लिहितात, त्यांना पुन्हां जन्म घ्यावा लागत नाहीं. ॥ ४७ ॥ (पार्वतीबरोबर रामायण ऐकत

श्रोतव्यं नियमेनैतद्रामायणमखण्डितम् ॥ आयुष्यमारोग्यकरं कैल्पकोट्यघनाशनम् ॥४५॥ देवाश्च सर्वे तुष्यन्ति ग्रहाः सर्वे महर्षयः ॥ रामायणस्य श्रवणे तुष्यन्ति पितरस्तथा ॥ ४६ ॥ अध्यात्मरामायणमेतदद्भुतं वैराग्यविज्ञानयुतं पुरातनम् ॥ पठन्ति शृण्वन्ति लिखन्ति ये नरास्तेषां भवेऽस्मिन्न पुनर्भवो भवेत् ॥४७॥ आलोड्याखिलवेदराशिमसकृद्यत्तारकं ब्रह्म तद्रामो विष्णुरहस्यमूर्तिरिति यो विज्ञाय भूतेश्वरः ॥

( मू. ) रामायणं नियमेन अखण्डितं श्रोतव्यं. ॥४५॥ रामायणस्य श्रवणे [कृते सति], सर्वे ( पू. ) ग्रहाः, तथा पितरः च तुष्यन्ति. ॥ ४६ ॥ ये नराः (पू.) एतत् अध्यात्मरामायणं ( मू. ) [ च ], तेषां अस्मिन् भवे पुनः भवः न भवेत्. ॥४७॥ यः भूतेश्वरः भवः अखिलवेदराशिं असकृत् (पू.),॥

१ खंड पडूं न देतां. २ ऐकावें. ३ कोटि कल्पांत केलेल्या पापाचा नाश करणारें. ४ संतुष्ट होतात. ५ पुनर्जन्म. ६ सगळ्या वेदसमूहास. ७ वारंवार. ८ ढवळून. ९ तारणारें.

CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

-रा-बो.
मू-सान्व.
टिप्पण.
१४८॥

युद्धकाण्ड-
सर्ग १६
ग्रंथकर्त्याला
वंदन.

बसलेला एक शंकराचा शिष्य ह्मणाला :- ) ' भूतपति शंकरानें सगळ्या वेदराशीचें अनेक वेळां आलोडन केलें ( विचार केला ), तेव्हां त्याला निश्चयात्मक ज्ञान झालें कीं, राम हाच तारक ब्रह्मरूपी असून विष्णूची गूढ मूर्ति होय. शेवटीं त्यानें ( शंकरानें ) सर्व ज्ञानाचें एकत्र काढिलेलें सार संक्षेपानें आपल्या प्रिय पत्नीला सांगितलें. तो हा ग्रंथ होय. ह्यांत रामाच्या गूढ तत्त्वाचें स्पष्ट वर्णन आहे. - त्या शंकराला माझा नमस्कार असो. ' - ॥ ४८ ॥ इति युद्धकाण्डे षोडशः सर्गः ॥ १६ ॥ श्रीरामचंद्राचा विजय असो. ॥

उद्धृत्याखिलसारसंग्रहमिदं संक्षेपतः प्रस्फुटं श्रीरामस्य निगूढतत्त्वमखिलं प्राह प्रियायै भवः ॥ ४८ ॥ इति श्रीम॰ युद्धकाण्डे षोडशः सर्गः ॥ १६ ॥ इति युद्धकाण्डं समाप्तम् ॥६॥ काण्डे युद्धात्मके सर्गा नव सप्त नीलकण्ठोक्ताः ॥ सार्धैकादशशतश्लोकामनुसंख्यायुताः ॥ जयति रघुवंशतिलकः इति ॥

अखिलसारसङ्ग्रहं ( मू. ) इदं श्रीरामस्य निगूढतत्त्वं प्रियायै प्राह, [ तस्मै नमः ]. ॥ ४८ ॥
॥ इति श्रीमदध्यात्मरामायणान्वये युद्धकाण्डे षोडशः सर्गः ॥ १६ ॥

१ सगळें तत्व सांठविलें ज्यांत, असें. २ उद्धृत्य बहिर काढून.

॥ इति श्रीमदध्यात्मरामायणार्थबोधे युद्धकाण्डः समाप्तः ॥



CC-0. In Public Domain.Kavikulguru Kalidas Sanskrit University Ramtek Collection

